॥ ॐ तत्सत् ॥

भाग २ रा

श्रीमद्भगवद्गीतार्थ—

# रहस्यदीपिका

[ मूळ श्लोक, पदशः अन्वय, मराठी अर्थ आणि
विस्तृत विवरण यांसह ]


लेखक

गीतावाचस्पति सदाशिवशास्त्री भिडे



आवृत्ति दुसरी

सन १९२८ | कागदी २॥ रु. | कापडी ३ रु. | शके १८५०.

# सप्तमोऽध्यायः।

कर्मयोगमार्गांत उपासनेचें महत्त्व किती आहे, हें पूर्वींच्या अध्यायांतून वारंवार श्रीभगवंतांनीं संक्षेपतः सांगितलें आहे. तथापि ह्या उपासनेचें व्यक्त व अव्यक्त अशा दोन्ही प्रकारांनीं विस्तृत विवेचन झाल्याखेरीज, कर्मयोगाचें प्रतिपादन पूर्ण होत नाहीं. म्हणून मागील अध्यायाच्या शेवटीं 'प्रेमळ अंतःकरणानें केलेली भगवदुपासना कर्मयोगास अधिकच श्रेष्ठत्व आणिते' असें सांगितलें **आहे.** तदनुसार ह्या अध्यायांत बुद्धियोगांतील '**आत्मवान्**' ह्या अंशाचें म्हणजे **ज्ञानविज्ञानाचें** विवेचन केलें आहे. हें **ज्ञानविज्ञान** अध्याय २, श्लोक ४६ यांत '**ब्राह्मणस्य विजानतः**' ह्या पदानें पूर्वीं दाखविलें आहे व अध्याय २, श्लोक ७२ यांत '**ब्राह्मी स्थिती**'च्या वर्णनानेंही ज्ञानविज्ञानाचाच उल्लेख आलेला आहे.

अध्याय ३, श्लोक ३७ ते ४३ यांत बुद्धियोगाच्या पांच अंशांपैकीं **निर्द्वंद्व** या अंशाचें स्पष्टीकरण झालें आहे. अध्याय ४, श्लोक १८ ते २३ अखेर **निस्त्रैगुण्य** या अंशाचें वर्णन आलें असून अध्याय पांचमध्यें श्लोक १८ ते २५ अखेर **नित्यसत्त्वस्थ** या अंशाचें विवेचन झालें आहे. सहाव्या अध्यायांत श्लोक ४० ते ४४ अखेर **निर्योगक्षेम** या अंशाचें स्वरूप सांगितलें आहे. आतां बुद्धियोगांतील फक्त **आत्मवान्** या अंशाचेंच प्रतिपादन व्हावयाचें आहे. ह्रा अंश इतरांपेक्षां मुख्य असून बुद्धियोगाचें **जीवन** आहे. हें ज्ञानविज्ञानाचें प्रतिपादन वर सांगितल्याप्रमाणेंच क्रमप्राप्त आहे, म्हणून अर्जुनाच्या प्रश्नाची मार्गप्रतीक्षा न करतांच भगवंतांनीं क्रमप्राप्त विषयाचें प्रतिपादन करण्यास सुरुवात केली आहे.

आतां प्रथम उपासनेचें स्वरूप वर्णन करितातः—

**श्रीभगवानुवाच**

**मय्यासक्तमनाः पार्थ योगं युंजन्मदाश्रयः**
**असंशयं समग्रं मां यथा ज्ञास्यसि तच्छृणु** १

**पार्थ ! मयि आसक्तमनाः मदाश्रयः, योगम् युंजन् (त्वम्) माम् असंशयम् समग्रम् यथा ज्ञास्यसि, तत् श्रृणु।**

श्रीभगवान् म्हणाले–अर्जुना ! माझ्या (परमेश्वराच्या) ठिकाणीं ज्याचें मन तल्लीन झालें आहे, व मी (परमेश्वरप्राप्ति) हाच, ज्याचा उद्देश आहे अशा, कर्मयोगाचरण करणाऱ्या तुला, ज्या रीतीनें माझें (परमेश्वराचें) संपूर्ण व निःसंशय ज्ञान होईल तें ऐक.

[ अध्याय २, श्लोक ६१ यांतील '**युक्त आसीत मत्परः**' व अध्याय ३, श्लोक ९ यांतील '**तदर्थं कर्म कौंतेय मुक्तसंगः समाचर**' ह्या वाक्यास अनुसरून येथें '**मदाश्रय**' म्हणजे परमेश्वरप्राप्तीच्या उद्देशानें कर्मयोग आचरण करीत असतांच परमेश्वराच्या स्वरूपाचें ज्ञान निःसंशय व पूर्णत्वानें होतें. त्याला कर्मयोगाचरण हेंच साधन आहे, त्या व्यतिरिक्त निराळ्या साधनांची अपेक्षा नाहीं; आणि परमेश्वराच्या व्यक्त व अव्यक्त स्वरूपाचें ज्ञान संपादन करणें हीच परमेश्वराची श्रेष्ठ उपासना होय, असें सांगितलें आहे.]

**ज्ञानं तेऽहं सविज्ञानमिदं वक्ष्याम्यशेषतः**
**यज्ज्ञात्वा नेह भूयोऽन्यज्ज्ञातव्यमवशिष्यते** २

**अहम् ते इदम् सविज्ञानम् ज्ञानम् अशेषतः वक्ष्यामि । यत् ज्ञात्वा इह भूयः अन्यत् ज्ञातव्यम् न अवशिष्यते ।**

मी तुला हें विज्ञानासह (विविध सृष्टिज्ञान म्हणजे व्यक्त स्वरूपासह) ज्ञान (आत्मज्ञान म्हणजे अव्यक्त स्वरूपाचें ज्ञान) पूर्णपणें सांगतों. जें (हें) जाणल्यावर, ह्या लोकीं आणखी दुसरें जाणावयाचें (कांहीं) शिल्लक उरत नाहीं.

[ सृष्टि म्हणजेच परमेश्वराचें व्यक्त स्वरूप होय. त्याचें सोपपत्तिक ज्ञान झाल्याशिवाय, आत्मज्ञानाची पूर्णता होत नाहीं. यावरून, आधिभौतिक शास्त्रांची जसजशी जास्त प्रगति होत जाईल तसतसें आध्यात्मिक ज्ञान अधिक सुबोध होईल असें ह्या श्लोकावरून उघड होतें. '**द्वे विद्ये अधीतव्ये**' इत्यादि वाक्यांवरून उपनिषदांसही हा सिद्धान्त मान्य आहे, असें दिसून येतें.]

ह्याप्रमाणें श्लोक १ व २ यांत, उपासनापूर्वक कर्मयोगाचरणानें संपादन होणारें ज्ञानविज्ञान हेंच पूर्ण ज्ञान होय असें भगवंतांनीं येथें विधान केलें आहे.

हें उभयविधज्ञान किती दुर्लभ आहे तें सांगतातः—

**मनुष्याणां सहस्रेषु कश्चिद्यतति सिद्धये**
**यततामपि सिद्धानां कश्चिन्मां वेत्ति तत्त्वतः** ३

सिद्धये, मनुष्याणाम् सहस्रेषु कःचित् यतति। यतताम् सिद्धानाम् अपि कःचित् माम् तत्त्वतः वेत्ति।

(ज्ञानविज्ञानाच्या) सिद्धीकरितां हजारों माणसांपैकीं एखादाच प्रयत्न करितो. (आणि अशा) प्रयत्न करणाऱ्या सिद्धांपैकीं (परोक्ष-ज्ञान्यांपैकीं) एखाद्यालाच माझें (परमेश्वराचें) यथार्थ ज्ञान (साक्षात्कार) होतें.

श्रीभगवान् आपलें व्यक्त स्वरूप थोडक्यांत सांगतातः—

**भूमिरापोऽनलो वायुः खं मनो बुद्धिरेव च**
**अहंकार इतीयं मे भिन्ना प्रकृतिरष्टधा** ४

भूमिः, आपः, अनलः, वायुः, खम्, मनः, बुद्धिः, एव च अहंकारः, इति इयम् अष्टधा भिन्ना मे प्रकृतिः।

पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश, मन बुद्धि आणि त्याचप्रमाणें अहंकार अशी ही आठ प्रकारांनीं भिन्न भिन्न (दिसणारी) माझी प्रकृति होय.

[ परमेश्वराची मूळ प्रकृति हेंच जड सृष्टीचें मूलतत्त्व आहे. प्रकृतीपासून, तिच्यांतील त्रिगुणांच्या विषम मिश्रणानें, सर्व सृष्टि उत्पन्न झालेली आहे. वरील आठ जडद्रव्यांपैकीं पहिलीं पांच **स्थूल** म्हणजे **इंद्रियगोचर** व बाकीचीं तीन **सूक्ष्म** म्हणजे **बाह्येंद्रियांस अगोचर** आहेत. हीं आठ जड द्रव्यें अत्यंत स्थूल अशा पृथ्वीपासून, अत्यंत सूक्ष्म अशा अहंकारापर्यंत उलटक्रमानें सांगितलीं आहेत. ह्यावरून सृष्टि हें परमेश्वराचेंच व्यक्तस्वरूप होय, असें सिद्ध होतें.]

**अपरेयमितस्त्वन्यां प्रकृतिं विद्धि मे पराम्**
**जीवभूतां महाबाहो ययेदं धार्यते जगत्** ५

महाबाहो ! इयम् मे अपरा ( प्रकृतिः )। तु इतः अन्याम्, यया इदम् जगत् धार्यते, जीवभूताम् प्रकृतिम् पराम् विद्धि।

अर्जुना! ही (वरील श्लोकांत सांगितलेली) माझी (परमेश्वराची) अपरा-प्रकृति होय आणि हिच्याहून वेगळी, जिच्या योगानें हें जग धारण केलें जात आहे अशी जीवस्वरूप ही माझी (परमेश्वराची) परा-प्रकृति होय, असें समज.

[ जीवतत्त्व सर्व सृष्ट पदार्थांत विद्यमान असून तेंच पदार्थमात्राचें नियामक असतें. म्हणजे पदार्थमात्रांत दिसून येणारी शक्ति ह्या जीवतत्त्वामुळेंच उत्पन्न झालेली असते. हें जीवतत्त्व प्रत्येक पदार्थांत भिन्न भिन्न नसून, सर्व सृष्टींत एकच आहे, असें आधुनिक शोधावरूनदेखील सिद्ध झालें आहे.]

**एतद्योनीनि भूतानि सर्वाणीत्युपधारय**
**अहं कृत्स्नस्य जगतः प्रभवः प्रलयस्तथा** ६

**सर्वाणि भूतानि एतत् योनीनि। अहम् कृत्स्नस्य जगतः प्रभवः तथा प्रलयः, इति उपधारय।**

(अर्जुना!) सर्व सृष्ट पदार्थ ह्यांपासून ( पर व अपर अशा दोन प्रकृति म्हणजे स्वरूपांपासून ) उत्पन्न होत असल्यामुळें, मी (परमात्मा) सर्व (जड चैतन्यात्मक) जगताचें उत्पत्तिस्थान व त्याचप्रमाणें प्रलयस्थान आहे असें समज.

[ सर्व जग परमात्म्यापासूनच उत्पन्न होतें. व परमात्म्याचे ठिकाणींच लय पावतें. स्थावरजंगमात्मक सर्व सृष्टीचीं मूलतत्त्वें, जीवप्रकृति व जडप्रकृति हीं दोन असून, तीं दोन्हीही एकाच परमात्मतत्त्वापासून उत्पन्न झालीं असल्यामुळें, त्या दोहोंनीं बनलेलें हें सर्व जगत् परमात्म्यापासूनच उत्पन्न होतें, व परमात्म्यामध्येंच लय पावतें, असें एथें भगवंतांनीं स्पष्ट सांगितलें आहे.]

**मत्तः परतरं नान्यत्किंचिदस्ति धनंजय**
**मयि सर्वमिदं प्रोतं सूत्रे मणिगणा इव** ७

**धनंजय! मत्तः परतरम् अन्यत् किंचित् न अस्ति। सूत्रे मणिगणाः इव इदम् सर्वम् मयि प्रोतम्।**

अर्जुना! माझ्याहून (परमात्म्याहून) तत्त्वतः भिन्न दुसरें कांहींच

नाहीं. तारेंत (ओविलेल्या) मण्यांच्या समूहाप्रमाणें, हें सर्व (जग) माझ्यामध्यें (परमात्म्यामध्यें) ओविलेलें आहे.

[ सोन्याच्या मण्यांच्या माळेंतील सोन्याचीच तार जशी प्रत्येक मण्याच्या अंतर्यामीं असून त्याला आधारभूत असते, आणि ते सर्व मणि एकत्र राहण्यासही कारण असते, त्याप्रमाणें प्रत्येक सृष्ट पदार्थांत चैतन्यतत्त्व असून तेंच त्यांचें नियामकही असतें. यावरून, जड व चैतन्य हीं दोन्ही तत्त्वें सृष्टीच्या उत्पत्तीला जरी सारखींच कारणीभूत असलीं, तथापि त्यांपैकीं चैतन्याचेंच जडावर प्रभुत्व असतें, हेंही सिद्ध होतें.]

प्रत्येक सृष्टपदार्थांत आत्मतत्त्व सूत्ररूपानें कसें असतें, हें दाखविण्याकरितां कांहीं उदाहरणें सांगतातः—

**रसोऽहमप्सु कौंतेय प्रभाऽस्मि शशिसूर्ययोः**
**प्रणवः सर्ववेदेषु शब्दः खे पौरुषं नृषु** ८

**कौंतेय! अप्सु रसः, शशिसूर्ययोः प्रभा, सर्ववेदेषु प्रणवः, खे शब्दः, नृषु पौरुषम् अहम् अस्मि।**

अर्जुना! जलामध्यें रस (रसरूपी तत्त्व) मी आहें. सूर्य व चंद्र यांमधील प्रभा (कांति) मी आहें. सर्व वेदांमध्यें प्रणव (ॐ) मी आहें. आकाशांतील शब्द (ध्वनि) मी आहें. मनुष्यांमध्यें पौरुष (कर्तृत्व-शक्ति) मी आहें.

[ पाण्यामध्यें सर्व सजीव पदार्थांचें पोषण करणारें जें तत्त्व असतें, तेंच **'रसतत्त्व'** होय.]

**पुण्यो गंधः पृथिव्यां च तेजश्चास्मि विभावसौ**
**जीवनं सर्वभूतेषु तपश्चास्मि तपस्विषु** ९

**पृथिव्याम् पुण्यः गंधः, विभावसौ तेजः च अस्मि। सर्वभूतेषु जीवनम् तपस्विषु तपः च अस्मि।**

पृथ्वीमधील शुद्ध (अकृत्रिम) गंध (वास) आणि अग्नींतील तेज (उष्णता) मी आहें. सर्व पदार्थांतील जीवन (जीवनकला) आणि तपस्व्यांमधलि तप (तितिक्षा-सामर्थ्य) मी आहें.

**बीजं मां सर्वभूतानां विद्धि पार्थ सनातनम्**
**बुद्धिर्बुद्धिमतामस्मि तेजस्तेजस्विनामहम्** १०

**पार्थ ! सर्वभूतानाम् सनातनम् बीजम् माम् विद्धि । बुद्धिमताम् बुद्धिः तेजस्विनाम् तेजः अहम् अस्मि ।**

अर्जुना ! सर्व पदार्थांचें अनादि बीज (उत्पादक तत्त्व) मी आहें, असें समज. बुद्धिमान् प्राण्यांची बुद्धि (सदसद्विवेकशक्ति) मी आहें. तेजस्वी (पाणीदार) लोकांचें तेज (पाणीदारपणा) मी आहें.

**बलं बलवतामस्मि कामरागविवर्जितम्**
**धर्माविरुद्धो भूतेषु कामोऽस्मि भरतर्षभ** ११

**भरतर्षभ ! बलवताम् कामरागविवर्जितम् बलम् अस्मि । भूतेषु धर्माविरुद्धः कामः अस्मि ।**

अर्जुना ! बलवंतांचें, वासना व आसक्तिरहित बल (सामर्थ्य) मी आहें व प्राण्यांचे ठिकाणीं असलेली, धर्माला (शास्त्राला) विरुद्ध नव्हे अशी इच्छा मी आहें.

[ **काम** म्हणजे हेतु कोणत्याही प्रकारचा असला तरी तो मोक्षास प्रतिबंधकच असतो, असा संन्यासमार्गांत सामान्य नियम मानण्यांत येतो, परंतु तो गीताशास्त्रास संमत नाहीं. शुद्ध हेतु मोक्षास प्रतिबंधक नसून अनुकूलच होतो, म्हणून येथें भगवंतांनीं, धर्माला अनुसरून असणारा हेतु हें माझें स्वरूप आहे असें सांगितलें आहे. अध्याय ३, श्लोक ९ येथेंही ह्याच नियमाचा उल्लेख आलेला आहे. त्याचप्रमाणें आध्यात्मिक उन्नतीला शारीरिक बळ निरुपयोगी किंवा विरुद्ध आहे अशी कित्येकांची समजूत असते. पण ती समजूत देखील गीताशास्त्रास अमान्य आहे असें या श्लोकाच्या पहिल्या वाक्यावरून कोणाच्याही लक्षांत येईल. शारीरिक बळाचा विकारवशतेनें उपयोग करणें गीताशास्त्राच्या दृष्टीनें निषिद्ध आहे. पण निर्विकार चित्तानें अन्यायाचें निवारण व न्यायाचें संरक्षण करण्यांत उपयोगी पडणारें शारीरिक बळ हा ईश्वरी अंश आहे असें स्पष्ट सांगून गीताशास्त्रानें परमार्थामध्यें देखील शारीरिक बळाचें महत्त्व मान्य केलें आहे; हें प्रत्येकानें लक्षांत ठेवलें पाहिजे.

**ये चैव सात्त्विका भावा राजसास्तामसाश्च ये**
**मत्त एवेति तान्विद्धि नत्वहं तेषु ते मयि** १२

**ये ये सात्त्विकाः च, राजसाः, तामसाः एव च भावाः तान् मत्तः एव, इति विद्धि। अहम् तेषु न, तु ते मयि।**

जे जे सात्त्विक आणि त्याचप्रमाणें राजस व तामस पदार्थ आहेत. ते (सर्व) माझ्यापासूनच उत्पन्न झाले आहेत, असें समज. मी त्यांच्या आश्रयानें नाहीं, परंतु ते (मात्र) माझ्या आश्रयानें आहेत.

[ सृष्टींतील सर्व भौतिक पदार्थांचे (मग ते सजीव असोत वा निर्जीव असोत) सात्त्विक, राजस व तामस असे तीन वर्ग होतात. हे भौतिक पदार्थ परमात्म्यापासूनच उत्पन्न झाले असून त्यांच्या अस्तित्वाला परमेश्वराचाच आधार असतो. परमेश्वर शुद्ध स्वतंत्र असल्यामुळें त्याला ह्या पदार्थांचा आधार आहे असें म्हणतां यावयाचें नाहीं. यावरून परा व अपरा या दोन प्रकृतींच्या योगानें परमेश्वरच सर्व सृष्टीचा उत्पादक (प्रभव) व लय करणारा (प्रलय) आहे असें येथें सिद्ध होतें.]

ही सृष्टि उत्पन्न करण्यांत परमेश्वराचा कोणता हेतु आहे तें सांगतातः—

**त्रिभिर्गुणमयैर्भावैरेभिः सर्वमिदं जगत्**
**मोहितं नाभिजानाति मामेभ्यः परमव्ययम्** १३

**एभिः त्रिभिः गुणमयैः भावैः मोहितम् इदम् सर्वम् जगत् एभ्यः। अव्ययम् परम् माम् न अभिजानाति।**

(सत्त्व, रज व तम) ह्या तीन गुणांनीं बनलेल्या भावांनीं (आकारांनीं) भुललेलें हें सर्व जग ह्या (पदार्थां)वरून अव्यय (अविक्रिय) व श्रेष्ठ अशा मला (परमात्म्याला) ओळखीत नाहीं.

[ सृष्टपदार्थांवरून परमात्म्याचें ज्ञान व्हावें हाच सृष्टि उत्पन्न करण्यांत परमेश्वराचा हेतु आहे. असें असतां, सृष्टपदार्थांच्या बाह्य स्वरूपास भुललेले लोक ह्या सृष्टीला ज्ञानसाधन न मानतां उपभोगसाधन मानतात. त्यामुळें त्यांना सृष्टिनिरीक्षणानें परमेश्वराचें ज्ञान होत नाहीं. सृष्टीची मोहक रचना हेंच मायेचें स्वरूप होय. अर्थात् परमात्मस्वरूपाच्या अज्ञानास त्रिगुणात्मक माया कारण असते.]

सृष्टचमत्कारांची भूल टाळण्याचा उपाय सांगतातः—

**दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया**
**मामेव ये प्रपद्यंते मायामेतां तरंति ते** १४

**हि, एषा दैवी, गुणमयी मम माया दुरत्यया। ये माम् एव प्रपद्यंते, ते एताम् मायाम् तरंति।**

ही माझी त्रिगुणात्मक दैवी (अलौकिक) माया पार होण्यास कठिण आहे, (परंतु) जे मजकडेच (परमेश्वराकडेच) येतात, ते ह्या मायेंतून तरून जातात.

[ परमात्मतत्त्वज्ञानाची उत्कंठा ज्यांच्या अन्तःकरणांत पूर्णपणें जागृत झालेली असते, ते ह्या मायामय बाह्य स्वरूपाच्या अनिवार मोहांतून पार पडतात. यावरून सृष्टपदार्थांच्या बाह्य चमत्कारांचा मोह अन्तःकरणांत उत्पन्न होऊं देतां कामा नये, असें जरी ठरतें, तथापि जडसृष्टि हें माझेंच स्वरूप आहे. असें पूर्वी सांगितलें आहे. म्हणून सृष्टिज्ञान म्हणजे विज्ञान हें आत्मज्ञानाचें साधन असल्यामुळें त्याकडे दुर्लक्ष करणें योग्य नाहीं. अर्थात् सृष्टीला निव्वळ उपभोगाचें साधन न समजतां सृष्टिशास्त्राचा अभ्यास करणाऱ्या मनुष्यानें हें परमात्मज्ञानाचें साधन आहे ही गोष्ट नेहमीं डोळ्यांपुढें ठेवावयास पाहिजे.]

सृष्टपदार्थांच्या बाह्य स्वरूपास भुलणाऱ्यांचा परिणाम सांगतातः—

**न मां दुष्कृतिनो मूढाः प्रपद्यंते नराधमाः**
**माययाऽपहृतज्ञाना आसुरं भावमाश्रिताः** १५

**मायया अपहृतज्ञानाः मूढाः आसुरम् भावम् आश्रिताः दुष्कृतिनः नराधमाः माम् न प्रपद्यन्ते।**

मायेनें ज्यांचें (विवेक) ज्ञान नष्ट झालें आहे, (असे) विवेकहीन व आसुरी (उपभोग–) कल्पनेचा आश्रय केलेले दुराचारी नीच लोक मजकडे (परमेश्वराकडे) येत नाहींत.

[ सृष्टीच्या बाह्य स्वरूपास भुलून मनुष्य विवेकशून्य झाला म्हणजे त्याच्या अंतःकरणांत उपभोगवासनाच प्रबळ होत जातात आणि जग हें केवळ आपल्या उपभोगाचें साधन आहे, ह्या आसुरी कल्पनेस बळी पडून कोणतींही दुष्कृत्यें करावयास तयार होतात व तेणेंकरून त्यांचा अधःपात होतो.

जे लोक परमात्मतत्त्वाकडे दुर्लक्ष करून केवळ आधिभौतिक तत्त्वांच्याच विचारांत गढून गेलेले असतात, त्यांच्यावर शेवटीं सृष्टीचें मूलभूत तत्त्व समजेनासें झाल्यामुळें, तें अज्ञेय ठरवून, निराश होण्याची पाळी येते. किंवा ते निरीश्वरवादी बनतात. ह्या निरीश्वरमार्गानें आधिभौतिक शास्त्रांची कितीही प्रगति झाली तरी तिचें पर्यवसान आसुरी संपत्तींतच होतें. परंतु ह्याच आधिभौतिक प्रगतीस आध्यात्मिक ज्ञानाची जोड मिळेल तर, ती अखिल मानव जातींस कल्याणकारकच होईल.]

ह्याच्या उलट आस्तिक्य बुद्धीनें उपासना करणाऱ्यांचे निरनिराळे प्रकार सांगतात:—

**चतुर्विधा भजंते मां जनाः सुकृतिनोऽर्जुन**
**आर्तो जिज्ञासुरर्थार्थी ज्ञानी च भरतर्षभ　　१६**

**भरतर्षभ अर्जुन ! आर्तः, जिज्ञासुः, अर्थार्थी, ज्ञानी च, चतुर्विधाः सुकृतिनः जनाः माम् भजंते ।**

हे भरतश्रेष्ठा अर्जुना ! दुःखग्रस्त, ज्ञानाची इच्छा करणारे, विषयेच्छु व ज्ञानी, असे चार प्रकारचे सदाचरणी लोक माझें भजन करितात.

[ परमेश्वराची उपासना करणारे लोक कोणत्याही सद्धेतूनें ती उपासना करीत असले तरी ते सदाचरणीच होत. आर्त व अर्थार्थी यांची उपासना जरी काम्य असते, तरी ती जगाच्या धारणपोषणास विघातक नसेल तर तेही सदाचरणीच होत.]

ह्या लोकांपैकीं श्रेष्ठ कोणते तें सांगतातः—

**तेषां ज्ञानी नित्ययुक्त एकभक्तिर्विशिष्यते**
**प्रियो हि ज्ञानिनोऽत्यर्थमहं स च मम प्रियः　　१७**

**तेषाम् ज्ञानी, नित्ययुक्तः, एकभक्तिः, विशिष्यते । हि, ज्ञानिनः अहम् अत्यर्थम् प्रियः, सः च मम प्रियः ।**

त्या (उपासना करणाऱ्या)पैकीं जो ज्ञानी नेहमीं कर्मयोगयुक्त व अनन्य भक्तिमान् असतो, तो श्रेष्ठ होय. कारण अशा ज्ञानी पुरुषाला मी (परमात्मा) अत्यंत प्रिय असतों. आणि तोही मला (तसाच) प्रिय असतो.

[ केवळ आत्मज्ञानी हा १६ व्या श्लोकांतील चतुर्विध उपासकांपैकींच एक असतो. परंतु तोच जर कर्मयोगी व अनन्यभक्त असेल तर तो त्या सर्वांत श्रेष्ठ व भगवंताला अत्यंत प्रिय असतो.]

**उदाराः सर्व एवैते ज्ञानी त्वात्मैव मे मतम्**
**आस्थितः स हि युक्तात्मा मामेवानुत्तमां गतिम्** १८

**एते सर्वे उदाराः एव। तु, ज्ञानी मे आत्मा एव ( इति ) मतम्।**
**हि, युक्तात्मा सः अनुत्तमाम् गतिम् माम् एव आस्थितः।**

हे ( १६ व्या श्लोकांत सांगितलेले चतुर्विध उपासक ) सर्वही थोरच होत. परंतु ( १७ व्या श्लोकांत वर्णन केलेल्या प्रकारचा) ज्ञानी हा माझा प्राणच असें मला वाटतें. कारण तो कर्मयोगयुक्त असून सर्वोत्कृष्ट गतिस्वरूप (अमृतत्वस्वरूप) अशा माझ्या (परमात्मस्वरूपाच्या ठिकाणीं) स्थिर झालेला असतो. म्हणजे अनन्य भक्त असतो.

१३ व्या श्लोकांत सांगितलेला केवळ आत्मज्ञानी परमात्मस्वरूपाला केव्हां पोंचतो तें सांगतातः—

**बहूनां जन्मनामंते ज्ञानवान्मां प्रपद्यते**
**वासुदेवः सर्वमिति स महात्मा सुदुर्लभः** १९.

**ज्ञानवान् बहूनाम् जन्मनाम् अंते माम् प्रपद्यते। ( यः ) सर्वम्**
**वासुदेवः इति (जानाति) सः महात्मा सुदुर्लभः।**

( भक्तिरहित केवल ) आत्मज्ञानवान् (पुरुष) अनेक जन्मांच्या शेवटीं मला ( परमात्मस्वरूपाला ) प्राप्त होतो. ( परंतु ) सर्व वासुदेवमय ( आहे असें जाणणारा ) महात्मा फारच दुर्लभ ( विरळ ).

[ अध्याय ६, श्लोक ४५ यांत सांगितल्याप्रमाणेंच ह्या श्लोकाच्या पूर्वार्धांत केवळ सांख्यनिष्ठित ज्ञानपरिपाकास लागणाऱ्या दीर्घ कालावधीचा पुन्हा उल्लेख केला आहे. व उत्तरार्धांत ब्रह्मज्ञान व भगवद्भक्ति यांचें साहचर्य अत्यंत महत्त्वाचें व परम दुर्लभ आहे असें सांगितलें आहे. यावरून ज्ञानाला भगवद्भक्तीची जोड मिळाली असतां तें शीघ्र फलदायक होतें, हें उघड आहे.]

परमात्मा सर्व फल देण्यास समर्थ असतां आर्त व अर्थार्थी लोक इतर देवतांची उपासना कां करितात, तें सांगतातः—

**कामैस्तैस्तैर्हृतज्ञानाः प्रपद्यंतेऽन्यदेवताः**
**तं तं नियममास्थाय प्रकृत्या नियताः स्वया** २०

**तैः तैः कामैः हृतज्ञानाः स्वया प्रकृत्या नियताः तम् तम् नियमम् आस्थाय, अन्यदेवताः प्रपद्यंते ।**

( आर्त व अर्थार्थी पुरुष ) अनेक ( उत्कट ) विषयवासनांनीं विवेकशून्य झाल्यामुळें आपापल्या स्वभावांच्या आधीन होऊन व तीं तीं ( इष्टफलदायक ) व्रतें स्वीकारून, अन्य देवतांची उपासना करितात.

**यो यो यां यां तनुं भक्तः श्रद्धयार्चितुमिच्छति**
**तस्य तस्याचलां श्रद्धां तामेव विदधाम्यहम्** २१

**यः यः भक्तः श्रद्धया याम् याम् तनुम् आर्चितुम् इच्छति । तस्य तस्य ताम् एव श्रद्धाम् अचलाम् अहम् विदधामि ।**

जो जो भक्त ( उपासक ) श्रद्धेनें ( विश्वासानें ) ज्या ज्या स्वरूपाची उपासना करूं इच्छितो, त्याची त्याची तीच श्रद्धा मी स्थिर करितों.

मी त्याच देवतेवर श्रद्धा स्थिर कशी करितों, तें सांगतातः—

**स तया श्रद्धया युक्तस्तस्याराधनमीहते**
**लभते च ततः कामान्मयैव विहितान्हि तान्** २२

**सः तया श्रद्धया युक्तः तस्याः राधनम् ईहते । हि, ततः कामान् लभते । तान् मया एव विहितान् ( विद्धि ) ।**

तो त्या ( स्थिर ) श्रद्धेनें युक्त होऊन त्या देवतेचें आराधन करितो. कारण, त्या देवतेपासून त्याचे मनोरथ पूर्ण होतात. ( पण ) तीं ( मनोरथाचीं ) फलें मींच ( परमेश्वरानेंच ) निर्माण केलेलीं असतात ( असें समज ). म्हणजे मनोरथ पूर्ण करण्याचें सामर्थ्य देवतांना परमेश्वरसत्तेनेंच प्राप्त झालेलें असतें.

**अंतवत्तु फलं तेषां तद्भवत्यल्पमेधसाम्**
**देवान्देवयजो यांति मद्भक्ता यांति मामपि** २३

**तेषाम् तु अल्पमेधसाम् तत् फलम् अंतवत् भवति। देवयजः देवान् यांति अपि मद्भक्ताः माम् यान्ति।**

परंतु त्या अल्पबुद्धि लोकांचें तें फळ नाशिवंत असतें. (ह्याप्रमाणें) देवतांची आराधना करणारे देवतांना प्राप्त होतात (देवतांचा त्यांच्यावर पूर्ण प्रसाद होतो) व माझे (परमात्म्याचे) भक्त (उपासक) मला (परमात्म्याला) प्राप्त होतात (त्यांच्यावर परमात्म्याचा पूर्ण प्रसाद होतो).

**अव्यक्तं व्यक्तिमापन्नं मन्यन्ते मामबुद्धयः**
**परं भावमजानंतो ममाव्ययमनुत्तमम्** २४

**मम अव्ययम् अनुत्तमम् परम् भावम् अजानंतः अबुद्धयः, माम् अव्यक्तम्, व्यक्तिम् आपन्नम् मन्यंते।**

माझ्या (परमात्म्याच्या) अविकार्य व सर्वांत उत्तम पर (व्यक्ताव्यक्ताहून पलीकडच्या) शुद्ध स्वरूपाचें ज्ञान नसल्यामुळें, बुद्धिहीन झालेले लोक, मी (प्रथम) अव्यक्त (मूल प्रकृतिस्वरूप जड तत्त्व) असून, (नंतर) स्थूल रूपाला प्राप्त झालों असें समजतात.

[ परमात्मा व्यक्त व अव्यक्त ह्या दोहोंहून वेगळा असल्यामुळें, त्याला व्यक्त मानणें हें जसें अज्ञान आहे तसेंच अव्यक्त मानणें हेंही अज्ञानच आहे. कारण, व्यक्त व अव्यक्त हीं दोन्हींही स्वरूपें परमात्म्याचींच असलीं तरी त्याचें शुद्ध स्वरूप ह्या दोहोंहून वेगळें आहे.]

परमात्म्याचें शुद्ध स्वरूप अज्ञ लोकांस कां कळत नाहीं तें सांगतातः—

**नाहं प्रकाशः सर्वस्य योगमायासमावृतः**
**मूढोऽयं नाभिजानाति लोको मामजमव्ययम्** २५

**अहम् सर्वस्य प्रकाशः न। योगमायासमावृतः मूढः अयम् लोकः, माम् अजम् अव्ययम् न अभिजानाति।**

मी सर्वांना उघड (इंद्रियगोचर) नाहीं. कारण, योग-(त्रिगुणाची विशेष रचना) रूपमायेनें आच्छादित, अतएव मोहित झालेले लोक

मी (परमात्मा) जन्मरहित व अविकार्य (आहें) हें ओळखीत नाहींत.

[ परमात्मस्वरूपाच्या अज्ञानास योगमायेचें आवरण हेंच कारण आहे.]

**वेदाऽहं समतीतानि वर्तमानानि चार्जुन**
**भविष्याणि च भूतानि मां तु वेद न कश्चन २६**

**अर्जुन! अहम् समतीतानि, वर्तमानानि, भविष्याणि च भूतानि वेद। तु माम् कश्चन न वेद।**

अर्जुना! मी भूतकाळीं झालेले, वर्तमानकाळीं असणारे व भविष्यकाळीं होणारे सर्व पदार्थ जाणतों, परंतु मला कोणीही जाणत नाहीं.

[ यावरून योगमायेचें आवरण परमात्म्यास नसून तें मूढ जीवांस असतें हें उघड सिद्ध होतें.]

**इच्छाद्वेषसमुत्थेन द्वंद्वमोहेन भारत**
**सर्वभूतानि संमोहं सर्गे यांति परंतप २७**

**परंतप, भारत! सर्वभूतानि इच्छाद्वेषसमुत्थेन द्वंद्वमोहेन सर्गे संमोहम् यांति।**

अर्जुना! सर्व प्राणिमात्र रागद्वेषामुळें उत्पन्न झालेल्या सुखदुःखादि द्वंद्वजन्य मोहानें (अज्ञानानें) सृष्टीविषयीं मोह पावतात (सृष्टीचें यथार्थ ज्ञान त्यांना होत नाहीं).

**येषां त्वंतगतं पापं जनानां पुण्यकर्मणाम्**
**ते द्वंद्वमोहनिर्मुक्ता भजंते मां दृढव्रताः २८**

**येषाम् तु पुण्यकर्मणाम् जनानाम् पापम् अंतगतम्, ते द्वंद्वमोहनिर्मुक्ताः दृढव्रताः मां भजंते।**

परंतु, ज्या सत्कर्माचरणी लोकांचें (अज्ञानरूपी) पातक नष्ट झालेलें असतें, ते द्वंद्वजन्य मोहापासून मुक्त होऊन; एकनिष्ठेनें माझी (परमात्म्याची) उपासना करितात.

[ परमात्मस्वरूपाचें यथार्थ ज्ञान संपादन झालें तरच त्याच्या व्यक्त स्वरूपाची उपासना पूर्णपणें करतां येते, कारण विश्व किंवा तदंतर्गत राष्ट्र हीं परमात्म-

स्वरूपाचीं प्रतीकें लक्षांत आणून त्याची उपासना करण्यास अन्तःकरणाची जी तयारी लागते, ती होण्यास सत्कर्माचरण व ज्ञानविज्ञान हींच खरीं साधनें होत. या साधनांनीं मनाची तयारी झाली तरच एकनिष्ठपणानें परमेश्वराची पूर्ण उपासना करतां येते.]

**जरामरणमोक्षाय मामाश्रित्य यतंति ये**
**ते ब्रह्म तद्विदुः कृत्स्नमध्यात्मं कर्म चाखिलम्** २९

**जरामरणमोक्षाय ये माम् आश्रित्य यतंति, ते तत् ब्रह्म, कृत्स्नम् अध्यात्मम् अखिलम् कर्म च विदुः।**

वार्धक्य व मृत्यु इत्यादिकांपासून मुक्त होण्याकरितां जे माझ्या (परमात्म्याच्या) आश्रयानें प्रयत्न करितात, ते तें (अज, अव्यय, इत्यादि पूर्वोक्त) ब्रह्म सर्व अध्यात्म व सर्व कर्म जाणतात.

**साधिभूताधिदैवं मां साधियज्ञं च ये विदुः**
**प्रयाणकालेऽपि च मां ते विदुर्युक्तचेतसः** ३०

**साधिभूताधिदैवम् साधियज्ञम् च माम् ये विदुः ते युक्तचेतसः प्रयाणकाले अपि माम् विदुः।**

आणि अधिभूतांसह ( अधिभूतविशिष्ट ) अधिदैवविशिष्ट व अधियज्ञविशिष्ट अशा मला (परमात्म्याला) जे जाणतात, ते योग-युक्त अंतःकरणाचे (स्थितप्रज्ञ) होत्साते, अंतकाळीं देखील मला जाणतात (माझें ज्ञान जागृत ठेवितात).

[ श्लोक २९ यांत ज्ञानाचे व ३० यांत विज्ञानाचे जे भिन्न भिन्न सहा अंश सांगितले आहेत ते ज्ञानविज्ञानाच्या पूर्णतेचे दर्शक म्हणून सांगितले आहेत. त्यांतील शब्दांचे स्पष्टार्थ पुढील अध्यायांत भगवंतांनींच सांगितले आहेत. विज्ञाना सह ज्ञानयुक्त कर्मयोगी स्थितप्रज्ञाचें अंतःकरण नित्य योगयुक्त असल्यामुळें, अंत-काळीं देखील त्याचें ज्ञान कायम राहातें. तसें इतरांचें रहात नाहीं. ह्याप्रमाणें उपासनापूर्वक कर्मयोगाचरणानें संपादन झालेलें ज्ञानविज्ञान हेंच **पूर्ण ज्ञान** म्हणजे **आत्मतत्त्व** होय असें येथें भगवंतांनीं श्लोक १।२ यांतील विधानाचें निगमन केलें आहे.]

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे ज्ञानविज्ञानयोगो नाम सप्तमोऽध्यायः।**

ह्याप्रमाणें श्रीभगवंतांनीं गाइलेल्या उपनिषदांतील ब्रह्मविद्यांतर्गत कर्मयोगशास्त्राविषयींच्या श्रीकृष्ण व अर्जुन ह्यांच्या संवादांतील 'ज्ञानविज्ञानप्रकरण' या नांवाचा सातवा अध्याय समाप्त झाला.

# रहस्यदीपिकेच्या सातव्या अध्यायाचा उपसंहार

## सातव्या अध्यायाची विषयानुक्रमणिका



दुसऱ्या अध्यायांतील ४६ व्या श्लोकांत सांगितलेल्या ज्ञानविज्ञानाचें विवेचन या अध्यायांत केलें आहे. विज्ञान म्हणजे सृष्टिज्ञानासह ज्ञान, म्हणजे आत्मज्ञान संपादन केल्याशिवाय ज्ञानाची पूर्णता होत नाहीं. म्हणजे ज्ञानाची पूर्णता होण्यास आत्मज्ञान ( पराविद्या ) व सृष्टिज्ञान ( अपराविद्या ) ह्या दोहोंचीही सारखीच आवश्यकता आहे, असें श्लोक १।२।३ यांत सांगितलें आहे. मुंडकोपनिषदांत आंगीरस ऋषींनीं शौनकास असेंच सांगितलें आहे. नंतर भगवंतांनीं आपल्या अपरा व परा अशा दोन प्रकृति सांगून, त्यांपासूनच सर्व सृष्टि उत्पन्न होते, व त्यांमध्येंच लय पावते, असें सांगून प्रत्येक सृष्ट पदार्थांत परमात्म्याचीं हीं दोन्हींही स्वरूपें दिसून येतात, ह्याविषयीं अनेक उदाहरणें (विभूति) सांगून १२व्या श्लोकांत सर्व सृष्टपदार्थ माझ्यापासून उत्पन्न होत असून, त्यांना आधारही माझाच आहे, अर्थात् त्यांचा लयही माझेच ठिकाणीं होतो, असें सिद्ध केलें आहे. ह्या सर्व सृष्टपदार्थांत दिसून येणारें त्रिगुणाचें मोहक रचनावैचित्र्य हीच माया होय. ह्या मायेनें मानवी प्राणी मोहित होत असल्यामुळें, परमात्मतत्त्वाचें ज्ञान संपादन

करण्याचें त्यांना विस्मरण होतें. त्यामुळें, ते ह्या सृष्टीच्या ज्ञानांतच म्हणजे विज्ञानांतच गुरफटून राहातात. ह्या विज्ञानास आत्मज्ञानाचा आधार नसेल, तर त्यांत सत्त्वगुणाचें प्राधान्य राहात नसल्यामुळें, त्याचें आसुरी संपत्तींत पर्यवसान होतें. अर्थात् ह्या आसुरी संपत्तीनें दुराचाराचीच प्रवृत्ति वाढते. ह्यावरून विज्ञानाचें पर्यवसान सत्त्वगुणप्रधान दैवीसंपत्तींत होण्यास त्याला आत्मज्ञानाची जोड असणें अत्यंत अवश्य आहे असें सिद्ध होतें. ह्या उपासनेचे म्हणजेच उपासकांचे चार प्रकार स्थूल मानानें पुढें भगवंतांनीं सांगून, त्यांपैकीं ज्ञानवान असून अनन्यभक्तियुक्त कर्मयोगाचरण करणारा पुरुष सर्वांत श्रेष्ठ व परमेश्वरास अत्यंत प्रिय असतो, असें सांगितलें आहे. नंतर, भक्तियुक्त कर्मयोगविरहित इतर उपासकांना फलप्राप्ति कशी होते, याचें विवरण केलें आहे. त्यांत १६ व्या श्लोकांतील केवळ मोक्षप्राप्ति होण्यास कालावधि किती लागतो हें सांगितलें आहे. नंतर आर्त व अर्थार्थी हे वासनांच्या नादीं लागल्यामुळें विवेकशून्य होऊन इतर देवतांचें आराधन करीत असले तथापि, त्यांचीं इष्ट फलें त्या देवतांच्या द्वारें मीच देऊन त्यांची त्या देवतांच्या ठिकाणची श्रद्धा दृढ करितों. कारण, त्यांची उपासना स्वार्थपर असली तरी जगाच्या धारण-पोषणास विरुद्ध नसते, असें श्लोक २० ते २३ अखेर सांगितलें आहे. पुढें २४ व्या श्लोकांत, परमात्मा हा व्यक्त व अव्यक्त ह्या दोहोंहूनही **पर** म्हणजे **वेगळा** आहे असें सांगून, २५ व्या श्लोकांत, परमात्मा अज व अव्यय आहे, तथापि प्राणिमात्रांची दृष्टि योगमायेनें आच्छादित व मोहित झाली असल्यामुळें तो त्यांना ओळखितां येत नाहीं असें सिद्ध केलें आहे. पुढील दोन श्लोकांत ह्याच सिद्धांताचें स्पष्टीकरण करून २८ व्या श्लोकांत जिज्ञासूंचा मोह नाहींसा होऊन त्यांची दृष्टि परमात्मतत्त्वज्ञानावर स्थिर होते, व व्यापक ईश्वरोपासनेला ते कसे समर्थ होतात हें सांगितलें आहे. व शेवटीं २९ व्या श्लोकांत ज्ञानाचे व ३० व्या श्लोकांत विज्ञानाचे निरनिराळे अंश दाखवून, विज्ञानासह ज्ञानानेंच ब्रह्मज्ञानाची पूर्णता होते, म्हणजे तो पुरुष आत्मवान् होतो असा उपसंहार केला आहे. सारांश, आत्मज्ञान हेंच अमृतत्त्वाचें एकांतिक साधन आहे, तथापि त्याच्या पूर्णतेस इतिहास, गणित, पदार्थविज्ञान, सृष्टिज्ञान, भूगोल-खगोलज्ञान इत्यादि भौतिक व व्यावहारिक शास्त्रांची म्हणजे विज्ञानाची अत्यंत आवश्यकता आहे, असें भगवंतांनीं या अध्यायांत स्पष्ट सांगितलें आहे.

( '**आत्मवदधिकरण**' ह्या शब्दापेक्षां '**ज्ञानविज्ञानाधिकरण**' हा शब्द त्याच अर्थाचा बोधक असून अधिक सोपा असल्यामुळें ह्या अधिकरणास '**ज्ञानविज्ञानाधिकरण**' हेंच नांव दिलें आहे.)

२९ व्या श्लोकांतील ब्रह्म, अध्यात्म व कर्म हे ज्ञानाचे तीन अंश व ३० व्या श्लोकांतील अधिभूत, अधिदैव व अधियज्ञ हे विज्ञानाचे तीन अंश भगवंतांनीं येथें नवीनच सांगितलेले नसून, ह्या अध्यायांत पूर्वी आलेल्या विषयांचें तें वर्गीकरण आहे; आणि त्याचा खुलासा पुढील अध्यायांत क्रमानें यावयाचा आहे.



# अष्टमोऽध्यायः ।

सातव्या अध्यायांतील ज्ञानविज्ञानाचेंच विवेचन ह्या अध्यायांत पुढें चालू असून, ज्ञानविज्ञानाच्या योगानें अंतकालीं परमेश्वरस्मरण कसें होतें, हें प्रथम सांगून, नंतर तदनुषंगानें सृष्टीची उत्पत्ति व प्रलय, त्यांची कालगणना, देवयान व पितृयाणमार्ग आणि कर्मयोगाचें महत्त्व असे विषय ह्या अध्यायांत ज्ञानविज्ञाना-च्या स्पष्टीकरणासाठीं प्रतिपादन केले आहेत.

मागील अध्यायाच्या शेवटीं भगवद्वाक्यांत आलेल्या संज्ञांचे अर्थ समजून घेण्याकरितां अर्जुन विचारितोः—

**अर्जुन उवाच**

**किं तद्ब्रह्म किमध्यात्मं किं कर्म पुरुषोत्तम**
**अधिभूतं च किं प्रोक्तमधिदैवं किमुच्यते** १
**अधियज्ञः कथं कोऽत्र देहेऽस्मिन्मधुसूदन**
**प्रयाणकाले च कथं ज्ञेयोऽसि नियतात्मभिः** २

पुरुषोत्तम, मधुसूदन! तत् ब्रह्म किम्? अध्यात्म किम्? कर्म किम्? अधिभूतम् किम् प्रोक्तम्? च अधिदैवम् किम् उच्यते? अत्र अस्मिन् देहे अधियज्ञः कथम् कः? च नियतात्मभिः प्रयाणकाले कथम् ज्ञेयः असि?

अर्जुन म्हणाला—हे पुरुषोत्तमा, मधुसूदना! ब्रह्म म्हणजे काय, अध्यात्म कशाला म्हणतात, कर्म म्हणजे काय, अधिभूत कशाला म्हणतात, अधिदैव कशाला म्हणतात, अधियज्ञ अत्र म्हणजे ह्या जगांत व ह्या देहांत कोण व कसा असतो, त्याचप्रमाणें, मनोनिग्रही पुरुषांनीं अंतकालीं तुला कसें जाणावें?

**श्रीभगवानुवाच**

**अक्षरं ब्रह्म परमं स्वभावोऽध्यात्ममुच्यते**
**भूतभावोद्भवकरो विसर्गः कर्मसंज्ञितः** ३

ब्रह्म परमम् अक्षरम्, अध्यात्मम् स्वभावः उच्यते। भूतभावोद्भवकरः विसर्गः कर्मसंज्ञितः।

श्रीभगवान् म्हणाले—ब्रह्म म्हणजे श्रेष्ठ, शुद्ध व अविनाशी तत्त्व, अध्यात्म म्हणजे (जीवात्म्याची उपाधिरूप) प्रकृति असें म्हणतात. पदार्थांना उत्पन्न करणारा आणि त्यांची वृद्धि करणारा सृष्टि-व्यापार, यास कर्म अशी संज्ञा आहे.

**अधिभूतं क्षरो भावः पुरुषश्चाधिदैवतम्**
**अधियज्ञोऽहमेवात्र देहे देहभृतां वर ४**

**देहभृताम् वर ! अधिभूतम् क्षरः भावः, अधिदैवतम् पुरुषः, अत्र देहे च अधियज्ञः अहम् एव ।**

हे नरश्रेष्ठा (अर्जुना)! अधिभूत म्हणजे नाशिवंत कार्यरूप पदार्थ, अधिदैवत म्हणजे पदार्थमात्रांत असलेली सामर्थ्योत्पादक देवता ह्या सृष्टींत यज्ञफलदाता व देहांत यज्ञफलभोक्ता म्हणजे अधियज्ञ मीच आहें.

**अंतकाले च मामेव स्मरन्मुक्त्वा कलेवरम्**
**यः प्रयाति स मद्भावं याति नास्त्यत्र संशयः ५**

**यः अंतकाले माम् स्मरन् कलेवरम् मुक्त्वा प्रयाति सः मद्भावम् याति । अत्र संशयः न अस्ति ।**

जो पुरुष मरणसमयीं माझें (परमात्म्याचें) स्मरण करीत हा देह सोडून जातो, तो माझ्या (परमात्म्याच्या) स्वरूपास प्राप्त होतो, यांत संशय नाहीं.

**यं यं वापि स्मरन्भावं त्यजत्यंते कलेवरम्**
**तं तमेवैति कौंतेय सदा तद्भावभावितः ६**

**कौंतेय ! अंते यम् यम् भावम् स्मरन् कलेवरम् त्यजति, तम् तम् एव एति; सदा तद्भावभावितः ।**

अर्जुना ! अथवा शेवटीं ज्या ज्या पदार्थाचें स्मरण करीत, हा देह (मनुष्य) सोडितो, तो त्या त्या स्वरूपास प्राप्त होतो. (कारण,) नेहमीं त्या पदार्थाचीच भावना त्याच्या अंतःकरणांत जागृत असते.

[ मरणसमयीं जी भावना जागृत असेल, तदनुसार मरणोत्तर गति प्राप्त होते. हा सामान्य नियम येथें सांगितला आहे. यावरून अशी शंका येण्याचा संभव आहे कीं, एखाद्याच्या अंतःकरणांत जन्मभर ईश्वरी भावना जागृत असतां अंतकालीं त्याच्या तोंडांतून ईश्वराचें नांव आलें नाहीं, किंवा जन्मभर विषयोपभोगांतच लोळत असलेल्या मनुष्याच्या तोंडांतून काक–तालीयन्यायानें ईश्वराचें नांव आलें, तर पहिल्यानें जन्मभर केलेली उपासना व्यर्थ जाईल, व दुसऱ्यानें कांहींच न करितां त्याला आयती सद्गति मिळेल कीं काय ? याचें उत्तर भगवंतांनीं वरील दोन्ही श्लोकांत '**स्मरन्**' ह्या महत्त्वाच्या शब्दानें दिलें आहे. कारण, अनुभव-संस्कारानें उत्पन्न झालेल्या ज्ञानासच '**स्मरण**' अशी संज्ञा आहे. म्हणजे ज्या गोष्टींचें पूर्वीं ज्ञान झालेले असतें, त्याच गोष्टींचें पुढें केव्हां तरी स्मरण होतें. ज्ञानावांचून स्मरण होणें शक्य नाही, ही अनुभव–सिद्ध गोष्ट आहे. ज्या गोष्टीची मनाला आवड उत्पन्न झालेली असते, तिच्या विषयींचीच भावना अंतःकरणांत नेहमीं जागृत रहाते; अर्थात् तीच प्रिय भावना अंतकाळींही जागृत असणें स्वाभाविक आहे. ह्यावरून ज्यानें जन्मभर भक्तिपूर्वक भगवदुपासना केली असेल, त्याची ईश्वरी भावना अंतकालींही कायमच राहणार. मग त्याच्या तोंडून भगवन्नामोच्चार झाला नाहीं किंवा भलताच उच्चार झाला, तरी तेवढ्यावरून त्याची भावना म्हणजे ईशस्मरण नष्ट झालें असें म्हणतां येत नाहीं, अर्थात् त्याच्या सद्गतीस व्यत्यय येण्याचें ( **कृतहानि** होण्याचें) कारण नाहीं. शिवाय योगभ्रष्टाचा पुढील क्रम पूर्वीं ६ व्या अध्यायांत सांगितलेला आहे. त्याचप्रमाणें ज्याला परमात्म्याचें ज्ञान कधींच झालेलें नाहीं व तदनुसार उपासनाही घडलेली नाहीं, त्याच्या तोंडून मृत्युसमयीं आकस्मिक रीतीनें ईश्वराचें नांव आलें, तथापि तें '**स्मरण**' ह्या सदरांत येत नसल्यामुळें, व त्याच्या अंतःकरणांतील भावनाही तदनुकूल नसल्यामुळें, त्याला नुसत्या अक्षरोच्चाराचा फायदा (**अकृताभ्यागम**) होणें शक्य नाहीं.]

**तस्मात्सर्वेषु कालेषु मामनुस्मर युद्ध्य च**
**मय्यर्पितमनोबुद्धिर्मामेवैष्यस्यसंशयम्** ७

**तस्मात् सर्वेषु कालेषु माम् अनुस्मर, युद्ध्य च असंशयम्,**
**मय्यर्पितमनोबुद्धिः माम् एव एष्यसि।**

म्हणून तूं सर्वकाल माझें (परमेश्वराचें) स्मरण ठेव आणि युद्ध

कर (कर्तव्यतत्पर रहा). संशयरहित होऊन माझ्या ठिकाणीं मन व बुद्धि अर्पण केलीस, म्हणजे मलाच प्राप्त होशील (परमेश्वरस्वरूप होशील.)

[ व्यावहारिक कामांचा परमार्थांत समावेश होतो किंवा नाहीं अशी कित्येकांच्या मनांत शंका येते. प्रस्तुत श्लोकांत या शंकेचें उत्तर आहे. युद्ध नुसतें व्यावहारिक कार्य पण तें दिसण्यांत देखील अत्यंत घोर असें कर्म आहे. हें सुद्धां पवित्र अन्तःकरणानें व कर्तव्यबुद्धीनें केल्यास परमार्थांत समाविष्ट होतें. त्याचप्रमाणें प्रतीकाराकरितां करावें लागणारें कर्म—मग तें हिंसामय असलें तरी देखील—ईश्वरोपासनेच्या बुद्धीनें केल्यास त्याचा परमार्थांत समावेश होतो. असें या श्लोकांतील "**माम् अनुस्मर युद्धय च**" या पदानें स्पष्ट दाखविलें आहे. किंबहुना कर्तव्यतत्परतेनें केलेलें युद्ध सुद्धां परमेश्वरप्राप्तीचें साधन आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. याच अभिप्रायानें सर्वकाल परमेश्वराचें स्मरण ठेवून कर्तव्यतत्पर असावें, म्हणजे परमेश्वरप्राप्ति होते असें येथें विधान केलें आहे.]

यापुढें अभ्यासयोग व कर्मयोग ह्या दोन्ही दृष्टींनीं ईशस्मरणाचें प्रतिपादन आहेः—

**अभ्यासयोगयुक्तेन चेतसा नान्यगामिना**
**परमं पुरुषं दिव्यं याति पार्थानुचिंतयन्** ८

**पार्थ! अभ्यासयोगयुक्तेन, नान्यगामिना चेतसा अनुचिंतयन् दिव्यम् परमम् पुरुषम् याति।**

अर्जुना! (आसन-प्राणायामादि) अभ्यासयोगानें युक्त असल्यामुळें एकाग्र चित्तानें ध्यान करणारा पुरुष दिव्य परम पुरुषाला म्हणजे परमेश्वराला प्राप्त होतो. (परमेश्वरस्वरूप होतो.)

अभ्यासयोगी प्रयाणकालीं दिव्य पुरुषाचें स्मरण कसें करितो तें सांगतातः—

**कविं पुराणमनुशासितार-**
**मणोरणीयांसमनुस्मरेद्यः**
**सर्वस्य धातारमचिंत्यरूप-**
**मादित्यवर्णं तमसः परस्तात्** ९
**प्रयाणकाले मनसाऽचलेन**
**भक्त्या युक्तो योगबलेन चैव**

भ्रुवोर्मध्ये प्राणमावेश्य सम्यक्
स तं परं पुरुषमुपैति दिव्यम् १०

कविम् पुराणम् अनुशासितारम् अणोः अणीयांसम् सर्वस्य धातारम्
अचिंत्यरूपम् तमसः परस्तात् आदित्यवर्णम्, दिव्यम् परमम् पुरुषम्
यः प्रयाणकाले अचलेन मनसा, भक्त्या युक्तः योगबलेन च एव
भ्रुवोः मध्ये प्राणम् सम्यक् आवेश्य अनुस्मरेत् सः तम् उपैति ।

सर्वज्ञ, सनातन, नियामक, सूक्ष्माहून सूक्ष्म (अत्यंत विरळ) सर्वाधार, अतर्क्यस्वरूप, अंधकाराहून पलीकडचा व सूर्याप्रमाणें देदीप्यमान अशा परम पुरुषाचें जो (अभ्यासयोगी) अंतकाळीं एकाग्र चित्तानें, भक्तिपूर्वक योगसामर्थ्यानें आपला प्राण दोन भ्रुकुटींच्या मध्यभागीं पूर्णपणें प्रविष्ट करून, सारखें स्मरण म्हणजे ध्यान करितो, तो त्या परम दिव्य पुरुषास (परमेश्वरास) प्राप्त होतो. (परमेश्वर-स्वरूप होतो.)

यदक्षरं वेदविदो वदन्ति
विशन्ति यद्यतयो वीतरागाः
यदिच्छंतो ब्रह्मचर्यं चरन्ति
तत्ते पदं संग्रहेण प्रवक्ष्ये ११

वेदविदः यत् अक्षरम् वदंति, वीतरागाः यतयः यत् विशंति,
यत् इच्छंतः ब्रह्मचर्यम् चरंति, तत् पदम् ते संग्रहेण प्रवक्ष्ये ।

वेदवेत्ते ज्याला अक्षर ब्रह्म म्हणतात, वैराग्यसंपन्न यति म्हणजे प्रयत्नशील अभ्यासयोगी ज्यांत प्रवेश करितात, (तद्रूप होतात) व ज्याची इच्छा करणारे ब्रह्मचर्यव्रताचें आचरण करितात तें पद (अर्थपूर्ण शब्द म्हणजे ॐकार) तुला थोडक्यांत सांगतों.

सर्वद्वाराणि संयम्य मनो हृदि निरुध्य च
मूर्ध्न्याधायात्मनः प्राणमास्थितो योगधारणाम् १२
ओमित्येकाक्षरं ब्रह्म व्याहरन्मामनुस्मरन्
यः प्रयाति त्यजन्देहं स याति परमां गतिम् १३

**सर्वद्वाराणि संयम्य, मनः हृदि निरुध्य च, आत्मनः प्राणम् मूर्ध्नि आधाय, योगधारणाम् आस्थितः, ॐ इति एकाक्षरम् ब्रह्म व्याहरन् माम् अनुस्मरन् यः देहम् त्यजन् प्रयाति, सः परमाम् गतिम् याति।**

(देहाचीं) सर्व द्वारें बंद करून, मन हृदयामध्यें एकाग्र करून, व आपला प्राण मस्तकांत स्थापन करून, ध्यानयोग स्थिर करणारा (योगी) ॐ ह्या एकाक्षर ब्रह्म मंत्राचा उच्चार करीत व माझें स्मरण करीत जो देहाचा त्याग करून जातो, तो परमश्रेष्ठ गति (मोक्षाला) पावतो.

[ श्लोक ८ ते १३ अखेर ६ श्लोकांत, अभ्यासयोगी अंतकालीं आपल्या सामर्थ्यानें म्हणजे ध्यानधारणेनें मस्तकांत प्राण नेऊन प्रणवोच्चारपूर्वक परमात्म्याचें स्मरण करीत परम गतीला कसा जातो हें सांगितलें आहे. ॐकाराचें माहात्म्य उपनिषदादि अनेक ग्रंथांत वर्णन केलेलें आहे व पतंजलींनींही योगसूत्रांत ॐकार हें परमेश्वरवाचक प्रतीक आहे असें सांगितलें आहे. येथेंही ॐकाराचा उच्चार व परमेश्वराचें स्मरण करावयास सांगितलें आहे, त्यावरून त्यांचा वाच्य-वाचक-संबंध व्यक्त होतो. अभ्यासयोगी पुरुष अव्यक्तोपासक असले तरी त्यांना हा ॐकाराचा जप व परमात्म्याचें ध्यान अवश्य असतें, असें येथें सांगितलें आहे.]

ह्याप्रमाणें अभ्यासयोगदृष्टीनें विवेचन करून, आतां कर्मयोगदृष्टीनें त्याचें विवेचन करितातः—

**अनन्यचेताः सततं यो मां स्मरति नित्यशः**
**तस्याहं सुलभः पार्थ नित्ययुक्तस्य योगिनः १४**

**पार्थ! यः सततम् अनन्यचेताः नित्यशः माम् स्मरति। तस्य नित्ययुक्तस्य योगिनः अहम् सुलभः।**

अर्जुना! जो सतत एकाग्रचित्त असून नेहमीं माझें (परमेश्वराचें) स्मरण ठेवितो, त्या नित्य कर्तव्यतत्पर असलेल्या कर्मयोग्याला मी सुलभ असतों (अभ्यासयोगापेक्षां कर्मयोगानें माझी प्राप्ति अल्पायासानें होते.)

[ कर्तव्यतत्पर राहून परमेश्वराचें स्मरण ठेवल्यानें परमेश्वरप्राप्ति सुलभ रीतीनें होते, असें येथें ७ व्या श्लोकांतील विधानाचें निगमन केलें आहे. त्याचप्रमाणें

अभ्यासयोगमार्गापेक्षां कर्मयोगमार्गानें ईशप्राप्ति सुलभ रीतीनें होते, असेंही दाखविलें आहे.]

याप्रमाणें परमेश्वरप्राप्ति झाल्यावर काय होतें तें सांगतातः—

**मामुपेत्य पुनर्जन्म दुःखालयमशाश्वतम्**
**नाप्नुवंति महात्मनः संसिद्धिं परमां गताः** १५

**माम् उपेत्य परमाम् संसिद्धिम् गताः महात्मानः अशाश्वतम् दुःखालयम् पुनर्जन्म न आप्नुवंति ।**

मला (परमेश्वराला) प्राप्त झाल्यावर, पूर्ण सिद्धीला पोंचलेले महात्मे, क्षणभंगुर व दुःखाचें आगर असा पुनर्जन्म पावत नाहींत. (जन्ममरणादि दुःखांपासून मुक्त होतात.)

[ परमेश्वरप्राप्ति झाल्यावर पुनरावृत्ति नाहीं असें येथें विधान केलें आहे.]

**आब्रह्मभुवनाँल्लोकाः पुनरावर्तिनोऽर्जुन**
**मामुपेत्य तु कौंतेय पुनर्जन्म न विद्यते** १६

**अर्जुन ! आब्रह्मभुवनात् लोकाः पुनरावर्तिनः । तु कौंतेय ! माम् उपेत्य, पुनर्जन्म न विद्यते ।**

अर्जुना ! ब्रह्मलोकापर्यंत सर्व लोक पुनः पुन्हा उत्पन्न होणारे आहेत. परंतु, हे कुंतीपुत्रा ! मला (परमेश्वराला) प्राप्त झाल्यावर मात्र पुन्हा जन्म होत नाहीं.

[ ब्रह्मलोकापर्यंत कोणतेंही श्रेष्ठ पद प्राप्त झालें, तरी तें पुनरावृत्ति असल्यामुळें शाश्वत नाहीं. परमात्मपद मात्र शाश्वत आहे. म्हणून परमात्म्याची प्राप्ति झाल्याखेरीज **शाश्वतगति (मुक्ति)** मिळणें शक्य नाहीं.]

ब्रह्मलोकापासून सर्वच सृष्टि पुनरावर्तनशील असल्यामुळें, सृष्टीच्या उत्पत्ति-प्रलयांची कालमर्यादा, तत्कालीं प्रसिद्ध असल्याप्रमाणें सांगतातः—

**सहस्रयुगपर्यंतमहर्यद्ब्रह्मणो विदुः**
**रात्रिं युगसहस्रांतां तेऽहोरात्रविदो जनाः** १७

**ब्रह्मणः यत् सहस्रयुगपर्यंतम् अहः युगसहस्राम् ताम् रात्रिम् ते अहोरात्रविदः जनाः विदुः ।**

एक हजार युगांचा कालावधि हा ब्रह्मदेवाचा एक दिवस व

तसाच एक हजार युगांचा काल ही त्याची रात्र होय, असें **अहोरात्रवेत्ते (कालज्ञानी)** मानितात.

**अव्यक्ताद्व्यक्तयः सर्वाः प्रभवंत्यहरागमे**
**रात्र्यागमे प्रलीयंते तत्रैवाव्यक्तसंज्ञके** १८

**अहरागमे अव्यक्तात् सर्वाः व्यक्तयः प्रभवंति । रात्र्यागमे तत्र एव अव्यक्तसंज्ञके प्रलीयंते ।**

(ब्रह्मदेवाचा) दिवस सुरू झाला म्हणजे अव्यक्त (प्रकृती)पासून सर्व व्यक्त स्थावरजंगम पदार्थ उत्पन्न होतात. व (त्याची) रात्र सुरू झाली म्हणजे, ते सर्व पदार्थ त्याच अव्यक्त प्रकृतींत लय पावतात.

**भूतग्रामः स एवायं भूत्वा भूत्वा प्रलीयते**
**रात्र्यागमेऽवशः पार्थ प्रभवत्यहरागमे** १९

**पार्थ ! सः एव अयम् अवशः भूतग्रामः भूत्वा भूत्वा रात्र्यागमे प्रलीयते, अहरागमे प्रभवति ।**

अर्जुना ! तोच हा प्रकृतिपरतंत्र पदार्थसमुदाय वारंवार उत्पन्न होऊन (ब्रह्मदेवाची) रात्र झाली म्हणजे, लय पावतो व (त्याचा) दिवस उगवला म्हणजे पुन्हा उत्पन्न होतो.

[ प्रलयकालीं जीवांना मोक्ष मिळत नसून ते प्रकृतींत लीन होऊन राहिलेले असतात व पुनः सृष्टीच्या उत्पत्तिकालीं स्वकर्मानुसार उत्पन्न होत असतात. यावरून कितीही दीर्घ काल लोटला तरी कोणालाही आपोआप मोक्ष मिळणें शक्य नाहीं. हें उघड आहे.]

**परस्तस्मात्तु भावोऽन्योऽव्यक्तोऽव्यक्तात्सनातनः**
**यः स सर्वेषु भूतेषु नश्यत्सु न विनश्यति** २०

**तस्मात् अव्यक्तात् परः, अव्यक्तः, अन्यः, सनातनः यः भावः, सः सर्वेषु भूतेषु नश्यत्सु न विनश्यति ।**

त्या अव्यक्ताहून (मूल प्रकृतीहून) श्रेष्ठ, स्वतः अव्यक्त पण (अव्यक्त प्रकृतीहून) वेगळा, अनादि असा जो भाव (म्हणजे सत्तत्त्व,) तो सर्व भूतें नाश पावलीं तरीदेखील नाश पावत नाहीं.

**अव्यक्तोऽक्षर इत्युक्तस्तमाहुः परमां गतिम्**
**यं प्राप्य न निवर्तंते तद्धाम परमं मम** २१

**अव्यक्तः अक्षरः इति उक्तः । तम् परमाम् गतिम् आहुः । यम् प्राप्य न निवर्तंते, तत् मम परमम् धाम ।**

ह्या (प्रकृतीहून वेगळ्या व श्रेष्ठ) अव्यक्ततत्त्वास **अक्षर** (**अविनाशी**) असें म्हणतात. व त्यालाच परम (श्रेष्ठ) गति म्हणतात. ज्याला प्राप्त झाल्यावर पुनरावृत्ति होत नाहीं, तें माझें (परमात्म्याचें) श्रेष्ठ स्थान होय.

[ हें अक्षर म्हणजे अविनाशी परब्रह्म होय. त्याची प्राप्ति झाल्यावर मात्र पुनरावृत्ति होत नाहीं. असें येथें १५ व्या श्लोकांतील विधानाचें निगमन केलें आहे.]

**पुरुषः स परः पार्थ भक्त्या लभ्यस्त्वनन्यया**
**यस्यांतस्थानि भूतानि येन सर्वमिदं ततम्** २२

**पार्थ ! यस्य अंतस्थानि भूतानि, येन इदम् सर्वम् ततम्, सः परः पुरुषः अनन्यया भक्त्या तु लभ्यः ।**

अर्जुना ! ज्याच्या अंतर्गत हीं सर्व भूतें आहेत, आणि ज्यानें सर्व जग विस्तारिलें आहे, तो परम पुरुष (परमात्मा) अनन्य भक्तीनें मात्र प्राप्त होणें शक्य आहे.

अशा अनन्यभक्त कर्मयोग्यांचा क्रममुक्तिमार्ग व योगभ्रष्टांचा पुनर्जन्म मार्ग सांगतातः—

**यत्र काले त्वनावृत्तिमावृत्तिं चैव योगिनः**
**प्रयाता यांति तं कालं वक्ष्यामि भरतर्षभ** २३

**भरतर्षभ ! योगिनः तु यत्र काले प्रयाताः अनावृत्तिम् एव च आवृत्तिम् यांति, तम् कालम् वक्ष्यामि ।**

अर्जुना ! कर्मयोगी ज्या (कोणत्या) कालांत मरण पावले असतां मोक्षास जातात, व (कोणत्या काळीं मृत्यु आला असतां) पुनर्जन्म पावतात, तो काळ (देवतारूपमार्ग) मी तुला सांगतों.

**अग्निर्ज्योतिरहः शुक्लः षण्मासा उत्तरायणम्**
**तत्र प्रयाता गच्छंति ब्रह्म ब्रह्मविदो जनाः** २४

अग्निः ज्योतिः, अहः शुक्लः, षण्मासाः उत्तरायणम्, तत्र प्रयाताः ब्रह्मविदः जनाः ब्रह्म गच्छंति ।

अग्नि, तेज, दिवस, शुक्लपक्ष, व उत्तरायणाचे सहा महिने ह्या अवधींत मृत्यु पावलेले ब्रह्मवेत्ते (कर्मयोगी) ह्या देवतारूप मार्गानें ब्रह्मपदाला प्राप्त होतात.

[ अग्नि, तेज, इत्यादिकांवरून, त्या त्या वस्तूंच्या अभिमानी देवता येथें विवक्षित आहेत. त्या मार्गाला अर्चिरादि मार्ग किंवा देवयान म्हणतात.]

**धूमो रात्रिस्तथा कृष्णः षण्मासा दक्षिणायनम्**
**तत्र चांद्रमसं ज्योतिर्योगी प्राप्य निवर्तते** २५

धूमः रात्रिः, तथाः कृष्णः, षण्मासाः दक्षिणायनम्, तत्र योगी चांद्रमसम् ज्योतिः प्राप्य निवर्तते ।

धूर, रात्र, त्याचप्रमाणें कृष्णपक्ष, व दक्षिणायनाचे सहा महिने ह्या कालांत मृत्यु पावलेला (साधक किंवा तपस्वी) योगी (ह्या देवता-मार्गानें) चंद्राच्या तेजांत म्हणजे चंद्रलोकांत जाऊन परत (ह्या लोकीं) येतो.

[ या मार्गाला धूम्रादि मार्ग किंवा पितृयाण म्हणतात.]

**शुक्लकृष्णे गती ह्येते जगतः शाश्वते मते**
**एकया यात्यनावृत्तिमन्ययाऽऽवर्तते पुनः** २६

जगतः एते शुक्ल–कृष्णे गती शाश्वते मते । एकया अनावृत्तिम् याति, अन्यया पुनः आवर्तते ।

जगाचे हे प्रकाशमय व अंधारमय असे दोन मार्ग निश्चित मानले जातात. कारण, एका (पहिल्या) मार्गानें जीव मोक्षास जातो व दुसऱ्या मार्गानें पुनर्जन्म पावतो.

**नैते सृती पार्थ जानन्योगी मुह्यति कश्चन**
**तस्मात्सर्वेषु कालेषु योगयुक्तो भवार्जुन** २७

पार्थ ! कश्चन योगी एते सृती जानन् न मुह्यति । तस्मात्, अर्जुन ! सर्वेषु कालेषु योगयुक्तः भव ।

अर्जुना ! कोणत्याही स्थितप्रज्ञ कर्मयोगी पुरुषास ह्या दोन्ही मार्गांचें ज्ञान असल्यामुळें, तो मोह पावत नाहीं. (त्याची स्मृति नष्ट होत नाहीं.) म्हणून, तूं नेहमीं कर्मयोगयुक्त हो.

[ ह्या श्लोकांत वर्णन केलेला कर्मयोगी व २४ व्या श्लोकांत सांगितलेले ब्रह्मवेत्ते कर्मयोगी हे एकच होत. ( त्यांचा मार्ग एकच असतो.) ]

**वेदेषु यज्ञेषु तपःसु चैव**
**दानेषु यत्पुण्यफलं प्रदिष्टम्**
**अत्येति तत्सर्वमिदं विदित्वा**
**योगी परं स्थानमुपैति चाद्यम्** २८

**योगी इदम् विदित्वा, वेदेषु, तपःसु, दानेषु एव च प्रदिष्टम् यत् पुण्यफलम् तत् सर्वम् अत्येति, आद्यम् परम् स्थानम् च उपैति।**

(स्थितप्रज्ञ) कर्मयोगी, हें सर्व (ज्ञानविज्ञान) प्राप्त झाल्यामुळें, वेदांत, यज्ञांत तपश्चर्येंत व दानांत जें पुण्यरूप फल सांगितलें आहे, त्या सर्वांच्या पलीकडे जातो आणि श्रेष्ठ अशा परम पदाला प्राप्त होतो.

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे 'अक्षरब्रह्मयोगो नाम' अष्टमोऽध्यायः**

ह्याप्रमाणें श्रीभगवंतांनीं गाइलेल्या उपनिषदांतील ब्रह्मविद्यांतर्गत कर्मयोग-शास्त्राविषयींच्या श्रीकृष्ण व अर्जुन ह्यांच्या संवादांतील **'अक्षरब्रह्म प्रकरण'** नांवाचा आठवा अध्याय समाप्त झाला.

## रहस्यदीपिकेच्या आठव्या अध्यायाचा उपसंहार

### आठव्या अध्यायाची विषयानुक्रमणिका

ह्या अध्यायांत प्रथम अर्जुनास सात प्रश्नांची श्रीभगवंतांनीं थोडक्यांत उत्तरें देऊन, नंतर प्रयाणकालीन स्मरणाचें महत्त्व व तदनुषंगिक विषय सांगितले आहेत. हें स्मरण अभ्यासयोग व कर्मयोग ह्या दोन्ही मार्गांनीं निश्चित होण्यासारखें आहे. तथापि अभ्यासयोगमार्गानें प्रयाणकालीं ईशस्मरण करणें किती आयासाचें आहे हें दाखवून त्यापेक्षां नेहमीं उपासनामय कर्मयोगाचरण करणाऱ्या कर्मयोग्यास अंतकालीही ईशस्मरण किती सुलभ असतें, हें दाखविलें आहे. या प्रकरणांत आलेल्या अभ्यासयोगाचें वर्णन व ६ व्या अध्यायांतील श्लोक १० ते २३ अखेर आलेलें वर्णन एक असून तें अभ्यासयोगमार्गांत अन्तर्भूत होणारें आहे हें लक्षांत ठेविलें पाहिजे. श्लोक ७ पासून सुरू झालेलें हें ईशस्मरणाधिकरण श्लोक १४ अखेर पूर्ण केलें आहे. अभ्यासयोगाच्या उलट सांगितलेला योग अध्याय ६ श्लोक २४ ते ३२ पर्यंत आला असून तो कर्मयोगांत अन्तर्भूत होतो व त्याचीच महती या अध्यायाच्या शेवटीं सांगितली आहे. पुढें १५ व्या श्लोकापासून २१ व्या श्लोकाच्या अखेरपर्यंत अनावृत्त्यधिकरणांत जन्ममरणांतून मुक्त होण्यास परमेश्वरप्राप्तीखेरीज इतर कोणतेंही साधन उपयोगी पडत नाहीं हें सिद्ध करण्यासाठीं ब्रह्मदेवापर्यंत स्थावरजंगमात्मक सर्व सृष्टि उत्पत्तिविनाशशाली असून, तिची उत्पत्ति व लय केव्हां व कसे होतात याचें तत्कालीन प्रचलित कालगणनेसह विवरण केलें आहे. नंतर योग्यांना प्राप्त होणारे देवयान व पितृयाण मार्ग ( यांसच शुक्ल व कृष्ण गति असें म्हटलें आहे ) श्लोक २३ ते २६ अखेर सांगून शेवटीं, ज्ञानविज्ञानसंपन्न कर्मयोगी हे मार्ग जाणत असल्यामुळें, केव्हांही मोह पावत नाहीं, व त्याला इतर सर्व पुण्यफलांपेक्षां अत्यंत श्रेष्ठ परम पद प्राप्त होतें, म्हणून तूं नेहमीं ईशस्मरणपूर्वक कर्मयोगी हो, असा अर्जुनास उपदेश करून अध्यायाची समाप्ति केली आहे.

सारांश, ह्या अध्यायांत अर्जुनाच्या सात प्रश्नांपैकीं प्रयाणकालीन ईशस्मरणाचें महत्त्व सांगून त्याचें फल अनावृत्ति म्हणजे मोक्षप्राप्ति असें सांगितलें आहे. अंतकालीं ईशस्मरण निश्चयानें होण्याचें साधन सतत परमेश्वरस्मरणाचा अभ्यास ठेवणें हेंच होय, असें सांगून तो अभ्यास ठेवण्याच्या दोन मार्गांपैकीं, ध्यानयोग-मार्गापेक्षां कर्मयोगमार्गच अधिक सुलभ आहे असेंही दाखविलें आहे. पुढील कालगणना व देवयान पितृयाण इत्यादि उल्लेख ह्या अंतकालीन ईशस्मरणाच्या स्पष्टीकरणार्थच आलेले आहेत.

ह्याप्रमाणें ह्या अध्यायांत प्रयाणकालीन ईशस्मरणाच्या प्रश्नाचें विवेचन पूर्ण केलें आहे व ह्या पुढील अध्यायांत बाकीच्या सहा प्रश्नांचें विस्तृत विवेचन आलेलें आहे. ह्या सात प्रश्नांचें पूर्ण विवेचन म्हणजेच ज्ञानविज्ञान होय.



# नवमोऽध्यायः ।

सातव्या अध्यायांत सुरू केलेल्या ज्ञानविज्ञानाचें विवरण आठव्या अध्यायांतील अर्जुनाच्या प्रश्नावरून पुढें चालवून त्यांतील प्रयाणकालीन ईशस्मरणाचें विवेचन त्याच अध्यायांत पूर्ण करून '**अधियज्ञः कथं कोऽत्र देहे**', म्हणजे ह्या सृष्टींत व मानवी देहांत अधियज्ञ कोण व कसा ओळखावयाचा हा, सृष्टिशास्त्राच्या व उपासनेच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचा प्रश्न असल्यामुळें, त्याचें सांगोपांग विवेचन ह्या अध्यायांत केलें आहे.

कर्मयोगाच्या पूर्णतेस अवश्य असलेल्या उपासनेचे (यज्ञाचे) व्यक्त व अव्यक्त असे दोन प्रकार होतात, त्यांपैकीं राजमार्गाप्रमाणें सर्वांस सुलभ अशी व्यक्तोपासना प्रथम सांगण्यास भगवान् आरंभ करितातः—

श्रीभगवानुवाच

**इदं तु ते गुह्यतमं प्रवक्ष्याम्यनसूयवे**
**ज्ञानं विज्ञानसहितं यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात्** १

**इदम् विज्ञानसहितम् ज्ञानम् गुह्यतमम् तु अनसूयवे ते प्रवक्ष्यामि। यत् ज्ञात्वा अशुभात् मोक्ष्यसे ।**

श्रीभगवान् म्हणाले—(अर्जुना!) हें विज्ञानयुक्त ज्ञान जरी अत्यंत गुह्य आहे तरी, तूं सरलहृदयी (श्रद्धावान् भक्त) आहेस म्हणून तुला तें मी सविस्तर सांगतों. जें (हें) तुला समजलें म्हणजे तूं अशुभापासून (कर्मबंधापासून) मुक्त होशील.

[ अ. ३, श्लोक ३१ यांत सांगितल्याप्रमाणें अनसूया ह्या शब्दाबरोबर श्रद्धाही येथें अभिप्रेत आहे. ब्रह्मज्ञानाप्रमाणें उपासना नुसत्या उपपत्तीवरच अवलंबून नसते. तिचा आरंभ प्रेमपूर्वक श्रद्धेतून होत असतो. अशी सप्रेम श्रद्धा ज्याच्या अंतःकरणांत असेल त्यालाच हा उपासनामार्ग बरोबर पटतो. परंतु **प्रेमविघातक मत्सर** व **श्रद्धाविघातकसंशय** ह्या दोन दोषांनीं ज्यांचें अंतःकरण कलुषित झालेलें असतें, तो उपासनामार्गास सर्वथैव अपात्र होय. कारण हा मार्ग त्याच्या स्वतःच्या संशयखोर बुद्धीला तर पटतच नाहीं; पण आपल्या मत्सरी स्वभावास

अनुसरून, तो सामान्य जनांचा बुद्धिभेद करून, आपल्या बरोबर इतरांच्याही अधःपातास कारण होतो. म्हणून पात्रापात्रतेचा विचार केल्यावांचून ह्या मार्गाचा उपदेश कोणीं कोणास करूं नये असें सुचविण्याकरितां भगवंतांनीं ह्या मार्गास गुह्यतम (अत्यंत गुह्य) असें म्हटलें आहे. तथापि हा उपासनामार्ग नुसता अंधभक्तीचा नसून, तो ज्ञानविज्ञानमय आहे असें भगवंतांनीं ह्या श्लोकांत स्पष्ट सांगितलें आहे. ह्यावरून ह्या मार्गाच्या मुळाशीं असणारी श्रद्धा ही जिज्ञासाशून्य अंधश्रद्धा नव्हे, हें उघड आहे.]

**राजविद्या राजगुह्यं पवित्रमिदमुत्तमम्**
**प्रत्यक्षावगमं धर्म्यं सुसुखं कर्तुमव्ययम्** २

**इदम् राजविद्या, राजगुह्यम् उत्तमम् पवित्रम् प्रत्यक्षावगमम् धर्म्यम् कर्तुम् सुसुखम् अव्ययम् ( अस्ति )।**

हें ( उपासनांतर्गत ज्ञानविज्ञान ) सर्व विद्यांमध्यें श्रेष्ठ व सर्व गुह्यांमध्यें श्रेष्ठ, त्याचप्रमाणें, पवित्र, अनुभवसिद्ध धर्मविहित, (ज्यांत स्वधर्माचरण अवश्य आहे असें ) आचरण करण्यास सुखकारक व अक्षय फल—( अमृतत्व ) दायक आहे.

ह्या उपासनामार्गांत असणारी श्रद्धा ज्याच्या अंतःकरणांत नसेल त्यांची स्थिति सांगतातः—

**अश्रद्दधानाः पुरुषा धर्मस्यास्य परंतप**
**अप्राप्य मां निवर्तंते मृत्युसंसारवर्त्मनि** ३

**परंतप ! अस्य धर्मस्य अश्रद्दधानाः पुरुषाः माम् अप्राप्य मृत्युसंसारवर्त्मनि निवर्तंते ।**

अर्जुना! ( ज्यांच्या अंतःकरणांत ) ह्या ( उपासनारूप ) धर्मावर श्रद्धा ( दृढविश्वास ) नसते, त्या पुरुषांना माझी प्राप्ति होत नसल्यामुळें ते जन्ममृत्युरूप संसारमार्गांत फिरत राहतात.

उपास्य परमात्माच जगाच्या उत्पत्तिस्थितिलयास कारण असतो हें दाखवून त्याच्या स्वरूपाचें संक्षिप्त वर्णन करतातः—

**मया ततमिदं सर्वं जगदव्यक्तमूर्तिना**
**मत्स्थानि सर्वभूतानि न चाहं तेष्ववस्थितः** ४

**मया अव्यक्तमूर्तिना इदम् सर्वम् जगत् ततम्। सर्वभूतानि मत्स्थानि। च अहम् तेषु न अवस्थितः।**

मीं (परमात्म्यानें) अव्यक्त मूर्तीच्या (प्रकृतीच्या) योगानें हें सर्व जगत् विस्तारिलें आहे. सर्व सृष्ट पदार्थ माझ्या ठिकाणीं आहेत. आणि मी त्यांचे ठिकाणीं अवस्थित नाहीं म्हणजे त्यांचे आधारावर अधिष्ठित नाहीं.

[ परमात्मा आपल्याच अव्यक्त प्रकृतिद्वारां सृष्टीचें कारण आहे असें येथें विधान केलें आहे ( अ. २, श्लोक १६ यावरील विवरणाप्रमाणें ) अव्यक्त प्रकृति हें परमात्म्याचेंच विवर्तरूप असून व्यक्त सृष्टि हें त्या प्रकृतीचें विकाररूप कार्य आहे. म्हणून अव्यक्त प्रकृतीसह सर्व सृष्टीला परमात्मा हेंच अधिष्ठान (आधार) आहे. परमात्मा हा व्यापक असून अव्यक्तासह सर्व सृष्टि व्याप्य असल्यामुळें सृष्टि हें परमात्म्याचें अधिष्ठान होऊं शकत नाहीं.]

**न च मत्स्थानि भूतानि पश्य मे योगमैश्वरम्**
**भूतभृन्न च भूतस्थो ममात्मा भूतभावनः ५**

**भूतानि मत्स्थानि न च। मे ऐश्वरम् योगम् पश्य। मम आत्मा भूतभृत् भूतभावनः च भूतस्थः न।**

(तथापि) भूतसृष्टि (साक्षात्) माझ्या (परमात्म्याच्या) ठिकाणीं नाहीं. हें माझें ईश्वरी म्हणजे अचिंत्य सामर्थ्य पहा ( आहे असें समज ). माझें तत्त्व ( परमात्मतत्त्व ) सृष्टीला धारक व सृष्टीचें पोषक असूनही तें सृष्टीवर अधिष्ठित नाहीं. म्हणजे सृष्टि हा त्याचा आधार ( अधिष्ठान ) नव्हे.

[ सृष्टि हा मूळ प्रकृतीचा विकार असल्यामुळें, त्या विकाररूप कार्याचें साक्षात् कारण म्हणजे आधार किंवा आधिष्ठान अव्यक्त प्रकृतीच होय. परमात्मा नव्हे हें उघड आहे. सच्चिदानंदरूप परमात्म्यावर विवर्तरूपानें त्रिगुणात्मक प्रकृति कां व कशी उत्पन्न झाली, ह्या प्रश्नाचें उत्तर **परमात्म्याचें अतर्क्य सामर्थ्य** एवढेंच आहे असें येथें सांगितलें आहे.]

**यथाऽऽकाशस्थितो नित्यं वायुः सर्वत्रगो महान्**
**तथा सर्वाणि भूतानि मत्स्थानीत्युपधारय ६**

**यथा सर्वत्रगः महान् वायुः। नित्यम् आकाशस्थितः। तथा सर्वाणि भूतानि मत्स्थानि इति उपधारय।**

ज्याप्रमाणें सर्वत्र संचार करणारा व महत् परिमाणाचा वायु म्हणजे वातावरण नेहमीं आकाशांतच असतें त्याप्रमाणेंच ही सर्व पंचमहाभूतात्मक सृष्टि माझे ठिकाणीं (परमात्म्याच्या ठिकाणीं) असते असें समज.

[ आकाश हें वायूचें सूक्ष्म व अव्यक्त स्वरूप आहे. ज्या वेळीं वायूमध्यें चलनादि क्रिया नसते तेव्हां तेंच आकाश होय. म्हणजे आकाश हें वायूला उत्पन्न करणारें पण वायूपेक्षां अत्यंत विरळ असें सूक्ष्म द्रव्य आहे. कांहीं शास्त्रकार आकाशाला शून्यरूप किंवा अभावरूप मानतात पण तें वेदांतशास्त्रास मान्य नाहीं. वायु आकाशांत असूनही आकाश त्यापासून अलिप्त असतें; म्हणजे वातावरणांत कितीही खळबळ उडाली तरी आकाशावर त्याचा कांहींच परिणाम होत नाहीं. त्याप्रमाणें ह्या पंचमहाभूतांत कितीही फेरबदल झाला तरी त्याचा परमात्मतत्त्वावर कांहीं परिणाम होत नाहीं. ]

**सर्वभूतानि कौंतेय प्रकृतिं यांति मामिकाम्**
**कल्पक्षये पुनस्तानि कल्पादौ विसृजाम्यहम्** ७

**कौंतेय! कल्पक्षये सर्वभूतानि मामिकाम् प्रकृतिम् यांति। तानि अहम् पुनः कल्पादौ विसृजामि।**

अर्जुना! कल्पक्षयाचे वेळीं सर्व भूतें (सृष्टि) माझ्या (परमात्म्याच्या) अव्यक्त प्रकृतींत लीन होतात. तीं मी पुन्हा दुसऱ्या कल्पाचे प्रारंभीं उत्पन्न करितों.

**प्रकृतिं स्वामवष्टभ्य विसृजामि पुनः पुनः**
**भूतग्राममिमं कृत्स्नमवशं प्रकृतेर्वशात्** ८

**स्वाम् प्रकृतिम् अवष्टभ्य, प्रकृतेः वशात् अवशम् इमम् कृत्स्नम् भूतग्रामम् पुनः पुनः विसृजामि।**

मी आपल्या प्रकृतीला वश करून घेऊन, प्रकृतीच्या आधीन झाल्यामुळें, परतंत्र असलेल्या ह्या संपूर्ण भूतवर्गास (सृष्टीस) पुनः पुन्हा उत्पन्न करितों.

**न च मां तानि कर्माणि निबध्नंति धनंजय**
**उदासीनवदासीनमसक्तं तेषु कर्मसु** ९

**धनंजय ! तेषु कर्मसु असक्तम् उदासीनवत् आसीनम् माम् तानि कर्माणि च न निबध्नंति।**

अर्जुना ! ह्या (जगदुत्पत्तिरूप) कर्माविषयीं माझ्या ठिकाणीं आसक्ति नसल्यामुळें, मी उदासीन म्हणजे तटस्थ असल्यासारखा असतों. म्हणून त्या कर्मांचा बंध (लेप) मला (परमात्म्याला) लागत नाहीं.

[ कर्में स्वरूपतः बंधक नसून, त्याविषयींच्या आसक्तीमुळेंच तीं बंधक होतात. म्हणून ज्याला कर्मबंधनांतून मुक्त व्हावयाचें असेल, त्यानें फलाचा त्याग केला पाहिजे, कर्माचा त्याग करणें योग्य नाहीं. असें परमात्म्याच्या सृष्टयुत्पत्तीच्या दृष्टांतानें भगवंतांनीं येथें दर्शविलें आहे.]

**मयाऽध्यक्षेण प्रकृतिः सूयते सचराचरम्**
**हेतुनाऽनेन कौंतेय जगद्विपरिवर्तते** १०

**कौंतेय ! प्रकृतिः मया अध्यक्षेण सचराचरम् सूयते। अनेन हेतुना जगत् विपरिवर्तते।**

अर्जुना ! ही अव्यक्त प्रकृति माझ्या अध्यक्षत्वाखालीं (माझ्या नियंत्रणाखालीं) स्थावरजंगमात्मक (सर्व सृष्टि) प्रसवते (उत्पन्न करिते). ह्या कारणास्तव (प्रकृति ह्या जगाची साक्षात् उत्पादक असून, विकार हा प्रकृतीचा स्वाभाविक धर्म असल्यामुळें,) जगाचें परिवर्तन (रूपांतर) चाललें आहे.

[ विकार हा प्रकृतीचा स्वाभाविक धर्म असला तरी कर्मानुसार नियमबद्धता येण्यास परमात्म्याचें नियंत्रण कारण असतें. ह्यावरून सर्व स्थावरजंगमात्मक सृष्टि प्रकृतिद्वारां परमात्मा उत्पन्न करितो असें येथें चौथ्या श्लोकांतील विधानाचें निगमन केलें आहे.]

ह्याप्रमाणें मी परमात्मा सर्वाधार, सर्वनियामक, सर्वांतर्यामी असतां, ज्ञानशून्य लोकांची कशी भलतीच भावना असते, तें सांगतातः—

**अवजानंति मां मूढा मानुषीं तनुमाश्रितम्**
**परं भावमजानंतो मम भूतमहेश्वरम्** ११

**मम परम् भावम्** अजानंतः मूढाः भूतमहेश्वरम् माम् मानुषीम् तनुम् आश्रितम् (मत्वा) अवजानंति ।

माझें म्हणजे परमात्म्याचें श्रेष्ठ स्वरूप न जाणणारे मूर्ख लोक सर्व सृष्टीचा प्रभु व नियंता अशा मला (आत्म्याला) मानवी देहाचा आश्रित, म्हणजे जड द्रव्याच्या संयोगामुळें उत्पन्न झालेला जीवरूप धर्म मानून माझी अवज्ञा करतात (परमात्मा किंवा आत्मा स्वतंत्र नाहीं असें म्हणतात)

[ या श्लोकांतील वर्णन श्रीकृष्ण या व्यक्तीला अनुलक्षून आहे; असें समजण्याची रूढीच पडली आहे. परंतु ही कल्पना शास्त्रदृष्ट्या सदोष आहे, कारण गीताशास्त्रामध्यें भगवान् श्रीकृष्णांनीं, मी या अर्थाचा जो शब्द अनेक ठिकाणीं उपयोगांत आणला आहे, तो मी, " वसुदेवाचा पुत्र " " कृष्ण " अशा वैयक्तिक कल्पनेचा नव्हे, हें निर्विवाद आहे. असें असतां या श्लोकाचा अर्थ वैयक्तिक कल्पनेनें लावणें अगदींच अप्रशस्त होय. अर्थात् हा श्लोक नास्तिकांच्या मताचें स्वरूप दाखवण्याकरितां तदनुरोधानेंच आहे असें समजलें पाहिजे. अशा दृष्टीनें अर्थ पूर्ण निर्दोष होतो तो असाः—ज्याप्रमाणें निरनिराळया जड द्रव्यांच्या संयोगानें एकादा नवीनच गुण उत्पन्न होतो ( उदाहरणार्थ चुना व हळद यांच्या मिश्रणानें तांबडा रंग येतो) त्याप्रमाणेंच, पृथ्वी, आप, तेज व वायु यांच्या ठराविक मिश्रणानें प्राण्याच्या देहांत आत्मा हा एक संयोगजन्य धर्म उत्पन्न होतो असें नास्तिक मानतात. आत्मा एका देहाचाच काय पण अखिल ब्रह्मांडाचा उत्पादक, चालक, व नियामक असून त्याला जड द्रव्याच्या आश्रयानें राहणारा गुण किंवा धर्म समजणें म्हणजे त्याची अवज्ञा करणें होय. ईश्वरी तत्त्वाचें खरें ज्ञान किंवा जिज्ञासा देखील नसल्यामुळें हे अज्ञानी लोक पक्के निरीश्वरवादी (अनात्मवादी) बनतात.]

ह्या निरीश्वरभावनेमुळें, पुनर्जन्म, पापपुण्य व धर्माधर्म इत्यादि गोष्टी निरर्थक भासूं लागतात व त्यामुळें ह्या निरीश्वरभावनेचे दुष्परिणाम कसे होतात, तें सांगतातः—

**मोघाशा मोघकर्माणो मोघज्ञाना विचेतसः**
**राक्षसीमासुरीं चैव प्रकृतिं मोहिनीं श्रिताः** १२

**मोघाशाः, मोघकर्माणः, मोघज्ञानाः, विचेतसः । राक्षसीम् आसुरीम् च मोहिनीम् प्रकृतिम् एव श्रिताः ।**

(ते) विफलमनोरथ, निरर्थक कर्में करणारे, निरुपयोगी ज्ञानवान् म्हणजे पढतमूर्ख व विवेकशून्य होऊन, क्रूर व विषयलंपट अशा मोहकारक स्वभावाचाच आश्रय करितात. (क्रूर व दुष्ट स्वभावी बनतात.)

[ द्वेषबुद्धीनें सूड घेण्याकरितां किंवा दुष्टबुद्धीच्या करमणुकीकरितां हिंसादि क्रूर कर्में करणें हा राक्षसी स्वभाव होय, व केवळ स्वतःची चैन चालविण्यासाठीं नीति अनीतीचा विचार न करितां वाटेल तें करण्यास तयार होणें हा आसुरी-स्वभाव होय.]

परंतु ईश्वरावर श्रद्धा ठेवणारे सेश्वरवादी कसे असतात तें, सांगतातः—

**महात्मानस्तु मां पार्थ दैवीं प्रकृतिमाश्रिताः**
**भजंत्यनन्यमनसो ज्ञात्वा भूतादिमव्ययम्** १३

**पार्थ ! तु दैवीम् प्रकृतिम् आश्रिताः महात्मानः, माम् भूतादिम् अव्ययम् ज्ञात्वा, अनन्यमनसः भजंति ।**

परंतु, अर्जुना ! दैवी स्वभावाचा आश्रय केलेले ( पुण्यशील ) महात्मे मी ( परमात्मा ) सर्वभूतांचें आदिकारण व अव्यय आहें असें जाणून, अनन्यभक्तियुक्त अंतःकरणानें माझी (परमात्म्याची) उपासना करितात.

उपासनेचे निरनिराळे प्रकार सांगतातः—

**सततं कीर्तयंतो मां यतंतश्च दृढव्रताः**
**नमस्यंतश्च मां भक्त्या नित्ययुक्ता उपासते** १४

**नित्ययुक्ताः माम् सततम् कीर्तयंतः, दृढव्रताः यतंतः च, भक्त्या माम् नमस्यंतः च उपासते ।**

नेहमीं कर्मयोगयुक्त असलेले पुरुष माझें (परमात्म्याचें) गुणवर्णन करून (भाषणद्वारां किंवा ग्रंथद्वारां परमात्मतत्त्वाचा उपदेश करून) किंवा दृढ निश्चयपूर्वक व्रतस्थ राहून, तपश्चर्या करून किंवा प्रेम-पूर्वक मला शरण येऊन माझी उपासना करितात.

**ज्ञानयज्ञेन चाप्यन्ये यजंतो मामुपासते**
**एकत्वेन पृथक्त्वेन बहुधा विश्वतोमुखम्** १५

**अपि च, अन्ये ज्ञानयज्ञेन एकत्वेन पृथक्त्वेन यजंतः, विश्वतोमुखम् माम् बहुधा उपासते।**

तसेंच दुसरे (कर्मयोगी) ज्ञानमय यज्ञानें (उपासनेनें) परमात्मतत्त्व एकच आहे अशा भावनेनें किंवा (त्याच परमात्म्याची) वेगवेगळ्या प्रतीकरूपानें आराधना करणारे, माझी (विश्वरूप परमात्म्याची) अनेक प्रकारें उपासना करितात.

[परमेश्वर अविनाशी व सर्व सृष्टीचें आदिकारण असें जाणणारे दैवीसंपत्तिमान् कर्तव्यनिष्ठ महात्मे, कीर्तन, तपश्चर्या, सेवा, भक्ति व ब्रह्मविचार इत्यादि प्रकारांनीं ज्या उपासना करितात त्या सर्व परमेश्वराच्याच उपासना होतात. ह्यावरून सर्व उपासनांमध्यें (यज्ञामध्यें) उपास्यरूपानें व आत्मस्वरूपानें असणारा परमेश्वर हाच अधियज्ञ होय असें येथें भगवंतानीं विधान केलें आहे.]

विश्वरूपत्व दाखविण्याकरितां कांहीं विभूति सांगतातः—

**अहं क्रतुरहं यज्ञः स्वधाहमहमौषधम्**
**मंत्रोऽहमहमेवाज्यमहमग्निरहं हुतम्** १६

**क्रतुः अहम्, यज्ञः अहम्, स्वधा अहम्, औषधम् अहम्, मंत्रः अहम्, आज्यम् अहम् एव, अग्निः अहम् हुतम् अहम्, अस्मि।**

हवनरूप यज्ञ मी, (पूजादि) उपासनारूप यज्ञ मी, पितरांच्या उद्देशानें केलेला द्रव्यत्याग अर्पण मी, वनस्पतिरूप अन्न मी, मंत्र मी, तूप इत्यादि होमद्रव्य मी, अग्नि मी, व हवनकर्मही मी (परमेश्वर) आहें.

[अध्याय ४ श्लोक २४ यांत जसा ब्रह्ममययज्ञ सांगितला आहे तसाच येथील परमेश्वरमययज्ञ वर्णन केला आहे.]

**पितामहस्य जगतो माता धाता पितामहः**
**वेद्यं पवित्रमोंकार ऋक्सामयजुरेव च** १७

**अहं अस्य जगतः पिता, माता, धाता पितामहः एव च पवित्रम् वेद्यम् ॐ कारः ऋक्, साम यजुः।**

मी (परमेश्वर) ह्या जगाचा पिता म्हणजे जनक (निमित्तकारण) माता म्हणजे उत्पत्तिस्थान (उपादानकारण), धारक, आणि पितामह म्हणजे (आजा) (पिता माता धाता इत्यादि सर्वांचें आदिकारण) आहे, त्याचप्रमाणें पवित्र व वेद्य (जें जाणावयाचें तें ब्रह्म), ॐकार, ऋग्वेद, सामवेद व यजुर्वेद मीच (परमेश्वरच) आहें.

**गतिर्भर्ता प्रभुः साक्षी निवासः शरणं सुहृत्**
**प्रभवः प्रलयः स्थानं निधानं बीजमव्ययम्** १८

गतिः, भर्ता, प्रभुः, साक्षी, निवासः शरणम्, सुहृत्, प्रभवः, प्रलयः, स्थानम्, निधानम्, अव्ययम् बीजम्।

(मी परमेश्वरच) प्राप्तव्य, (फल) पोषक, अधिपति, अध्यक्ष, निवासस्थान, संरक्षक, हितकर्ता, उत्पत्तिस्थान, लयस्थान, व अविनाशी (असें सर्व सृष्टीचें) मूळ बीज मी (परमेश्वरच) आहें.

**तपाम्यहमहं वर्षं निगृह्णाम्युत्सृजामि च**
**अमृतं चैव मृत्युश्च सदसच्चाहमर्जुन** १९

अर्जुन! अहम् तपामि, अहम् वर्षम् निगृह्णामि उत्सृजामि च।
अमृतम् च, मृत्युः च, सदसत् च, अहम् एव।

मी (परमेश्वरच) सूर्यरूपानें तपतों, (प्रकाश व उष्णता देतों) (बाष्परूपानें) जलाचें आकर्षण करितों आणि (पर्जन्यरूपानें) सोडितों. त्याचप्रमाणें मी अमृतही आहें व मृत्युही आहें. आणि अर्जुना! स्थूल व सूक्ष्म किंवा व्यक्त व अव्यक्तही मीच आहें.

ह्याप्रमाणें मी विश्वतोमुख परमेश्वर असून तशा भावनेनें माझी उपासना न करितां काम्य व संकुचित भावनेनें उपासना करणाऱ्या लोकांचा परिणाम सांगतातः—

**त्रैविद्या मां सोमपाः पूतपापा**
**यज्ञैरिष्ट्वा स्वर्गतिं प्रार्थयंते**
**ते पुण्यमासाद्य सुरेंद्रलोक-**
**मश्नंति दिव्यान्दिवि देवभोगान्** २०

**सोमपाः पूतपापाः त्रैविद्याः माम् यज्ञैः इष्ट्वा स्वर्गतिम् प्रार्थयंते। ते पुण्यम् सुरेंद्रलोकम् आसाद्य दिवि दिव्यान् देवभोगान् अश्नंति।**

सोम (यज्ञांतील सोमरस) प्राशनानें निष्पाप व पवित्र झालेले, तीन वेदांचें अध्ययन करणारे (कर्मठ) पुरुष, अनेक प्रकारच्या श्रौत यज्ञांनीं माझें (परमेश्वराचें) यजन करून स्वर्गप्राप्तिरूप फल मागतात (त्यामुळें) ते पुण्यमय इंद्रलोकाला जाऊन स्वर्गांत (तेथें) दिव्य भोगांचा उपभोग घेतात.

[ सोमपानाचें माहात्म्य वेदांत अतिशय वर्णन केलें आहे.]

**ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं**
**क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशंति**
**एवं त्रयी धर्ममनुप्रपन्ना**
**गतागतं कामकामा लभंते २१**

**ते तम् विशालम् स्वर्गलोकम् भुक्त्वा पुण्ये क्षीणे मर्त्यलोकम् विशंति। एवम् कामाकामाः त्रयीधर्मम् अनुप्रपन्नाः गतागतम् लभंते।**

ते (कर्मठ याज्ञिक) विस्तृत स्वर्गलोकाचा उपभोग घेऊन पुण्य कमी झाल्यावर मृत्युलोकीं परत येतात. ह्याप्रमाणें उपभोगाची इच्छा करणारे (उपभोगाच्या इच्छेनेंच) तीन वेदांनीं प्रतिपादन केलेल्या (श्रौतयज्ञकर्मरूप) धर्माचेंच पुनः पुन्हा आचरण करीत राहून (स्वर्गाच्या) येरझारा प्राप्त करून घेतात. (त्यांना अमृतत्व कधींच प्राप्त होत नाहीं.)

[ईश्वरोपासनारूप कोणतेंही कर्म निष्कामबुद्धीनें केलें असतां तेणेंकरून आध्यात्मिक उन्नति व अमृतत्व प्राप्ति होते व हेंच उपासनारूप निष्काम कर्माचें प्रधानफल होय असें असतां उपभोगाच्या नादीं लागलेले लोक मोक्ष देण्यास समर्थ असलेल्या परमेश्वरापाशीं यःकश्चित् व अनित्य स्वर्गप्राप्तीची (विषयसुखाची) प्रार्थना करितात. आत्मज्ञान व परमात्म्याची भक्ति यांचा या कर्मठांचे ठिकाणीं अभाव असल्यामुळें इंद्रियतर्पणापलीकडील श्रेष्ठ आध्यात्मिक सुखाची त्यांना कल्पनाच नसते. सुखाच्या या संकुचित कल्पनेमुळें ध्येय ठरविण्याच्या बाबतींतच त्यांची

चूक होते. त्यामुळें ते जन्ममरणाच्या चक्रांतून सुटत नाहींत व त्यांची आध्यात्मिक उन्नति कधींच होत नाहीं, शिवाय त्यांच्या केवळ स्वार्थपरायणतेमुळें, त्यांचीं कर्में लोकहितकारक होत नाहींत.]

ह्याप्रमाणें सर्वच कर्में निष्कामबुद्धीनें करूं लागल्यास, स्वतःच्या धारणपोषणाची तरी तजवीज कशी होणार तें सांगतातः—

**अनन्याश्चिंतयंतो मां ये जनाः पर्युपासते**
**तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम्** २२

अनन्याः चिंतयंतः ये जनाः माम् पर्युपासते तेषाम् नित्याभि-युक्तानाम् योगक्षेमम् अहम् वहामि ।

अनन्यभावानें माझें ( परमेश्वराचें ) चिंतन करणारे जे पुरुष उपासना ( ईश्वराराधनार्थ कर्में ) करितात, त्या नित्य कर्तव्यनिष्ठ कर्मयोग्यांचा योगक्षेम ( परमेश्वर ) चालवितो.

[ भगवज्ज्ञानपूर्वक म्हणजे ज्ञानविज्ञानयुक्त भगवद्भक्तिपूर्वक स्वकर्तव्याचरण हीच ईश्वराची उपासना होय. अशी उपासना करणाऱ्या पुरुषांचा योगक्षेम परमेश्वर चालवितो. म्हणजे भगवद्भक्त कर्मयोगी पुरुषांचें ऐश्वर्य व योग्यता वाढत असल्यामुळें त्यांच्या योगक्षेमास कधींही वाण पडत नाहीं. त्याला कोणत्याही गोष्टीची कमतरता नसते त्यामुळें त्याला **संपादन-संरक्षण** करण्याकरितां म्हणून निराळें कांहीं करण्याची आवश्यकताच उरत नाहीं.]

इतर देवतांच्या आराधनेचें पर्यवसान सांगतातः—

**येऽप्यन्यदेवताभक्ता यजंते श्रद्धयाऽन्विताः**
**तेऽपि मामेव कौंतेय यजंत्यविधिपूर्वकम्** २३

**कौंतेय ! ये भक्ताः श्रद्धया अन्विताः अन्यदेवताः अपि यजंते ते अपि माम् एव अविधिपूर्वकम् यजंति ।**

अर्जुना ! जे भक्त श्रद्धापूर्वक इतर देवतांची आराधना करितात. त्यांची ती आराधना विधिपूर्वक म्हणजे प्रवृत्तिपूर्वक नसली तरी, मला ( परमेश्वरालाच ) पोंचते.

[ अ. ७, श्लोक २०।२१।२२ यांत सांगितल्याप्रमाणें सर्व उपासनांचा फलदाता म्हणजे अधियज्ञ परमेश्वरच असल्यामुळें कोणत्याही देवतेच्या पूजेचें पर्यवसान परंपरेनें परमेश्वराच्या ठिकाणींच होतें. परंतु कर्त्याची प्रवृत्ति परमेश्वराकडे नसल्यास ती आराधना तत्त्वतः जरी परमेश्वरास पोंचत असली तथापि हें त्या कर्त्याला ज्ञान नसल्यामुळें त्याला परमेश्वराराधनेचें फल मिळत नाहीं. ह्यावरून ज्ञानविज्ञानरहित अंधभक्ति निरुपयोगी आहे असें ठरतें.]

**अहं हि सर्वयज्ञानां भोक्ता च प्रभुरेव च**
**न तु मामभिजानंति तत्त्वेनातश्च्यवंति ते २४**

**हि अहम् एव सर्वयज्ञानाम् भोक्ता च प्रभुः च । माम् तु तत्त्वेन न अभिजानंति । अतः ते च्यवंति ।**

कारण मी (परमेश्वरच) सर्व उपासनांचा (फल) भोक्ता व प्रभु (फलदाता) आहें परंतु मला तत्त्वतः जाणत नाहींत (त्यांना ईश तत्त्वाचें यथार्थ ज्ञान नसतें) म्हणून ते घसरतात (त्यांची आध्यात्मिक उन्नति बंद पडते).

[ काम्यबुद्धीनें केलेली कोणत्याही देवतेची उपासना परंपरेनें परमेश्वराचीच उपासना होते व निरनिराळ्या देवतांकडून मिळणारीं फलें, त्या त्या देवतांच्या द्वारें परमेश्वराकडूनच मिळत असतात. कारण सर्व उपासनांचा (यज्ञांचा) प्रभु म्हणजे उपास्य व फलदाता परमेश्वरच असतो म्हणून तो परमेश्वरच सृष्टींतलि अधियज्ञ होय. त्याचप्रमाणें यज्ञाचा फलभोक्ता जीवात्मस्वरूपानें परमेश्वरच असल्यामुळें देहांतील अधियज्ञही तोच होय, असें येथें १५व्या श्लोकांतील विधानाचें भगवंतांनीं निगमन केलें आहे. परंतु काम्य उपासना करणारांना, हें ईश्वरीस्वरूपाचें यथार्थ ज्ञान नसल्यानें त्यांना ईश्वरोपासनेचें योग्य फल मिळत नाहीं.]

अशा लोकांच्या उपासनेचीं फलें त्यांच्या बुद्धीला अनुरूप अशींच मिळतात हें सांगतातः—

**यांति देवव्रता देवान् पितॄन्यांति पितृव्रताः**
**भूतानि यांति भूतेज्या यांति मद्याजिनोऽपि माम् २५**

**देवव्रताः देवान् यांति । पितृव्रताः पितॄन् यांति । भूतेज्याः भूतानि यांति । मद्याजिनः अपि माम् यांति ।**

देवतांच्या उद्देशानें उपासना करणारे देवलोकास जातात. पितरांची उपासना करणारे पितृलोकाला जातात. देवतांची आराधना करणारे त्या त्या स्थानाला जातात. आणि माझी (परमेश्वराची) यथार्थज्ञानपूर्वक उपासना करणारे परमात्मस्वरूपाला प्राप्त होतात.

स्वर्गादि फलदायक उपासनेची पद्धति व सामग्री शास्त्रतः निश्चित झालेली आहे. परंतु हे नियम परमात्म्याच्या उपासनेला कितपत लागू पडतात तें सांगतातः—

**पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति**
**तदहं भक्त्युपहृतमश्नामि प्रयतात्मनः** २६

**यः भक्त्या मे पत्रम् पुष्पम् फलम् तोयम् प्रयच्छति, प्रयतात्मनः भक्त्युपहृतम् तत् अहम् अश्नामि ।**

जो कोणी भक्तीनें (यथार्थ ज्ञानपूर्वक प्रेमानें) मला (परमात्म्याला) पान, फूल, फळ, पाणी (इत्यादिकांपैकीं कांहींही) अर्पण करितो, त्या शुद्धबुद्धिनियत अंतःकरणाच्या पुरुषानें भक्तिपूर्वक अर्पण केलेलें तें (कांहीं असलें तरी) मी (परमेश्वर) सेवन करितों (आनंदानें ग्रहण करितों ).

[ परमेश्वराचें यथार्थ ज्ञान म्हणजे विज्ञानासह ज्ञान, अनन्य भक्ति म्हणजे शुद्ध प्रेम व शुद्धबुद्धीचें मनासह सर्व इंद्रियांवर नियमन हीच परमेश्वराच्या निष्काम उपासनेची सामग्री, आणि स्वकर्तव्यनिष्ठा ( श्लो. २२ यांत सांगितल्याप्रमाणें ) म्हणजे कर्मयोग हीच त्या उपासनेची पद्धति होय. ]

**यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत्**
**यत्तपस्यसि कौंतेय तत्कुरुष्व मदर्पणम्** २७

**कौंतेय ! यत् करोषि, यत् अश्नासि, यत् जुहोषि, यत् ददासि, यत् तपस्यसि, तत् मदर्पणम् कुरुष्व ।**

(म्हणून) अर्जुना ! तूं जें जें कर्म करशील, जें जें सेवन करशील, जें जें हवन करशील, जें जें देशील किंवा जें जें तप म्हणजे व्रताचरण करशील, तें तें (वर सांगितल्याप्रमाणें) मला [परमेश्वराला] अर्पण कर.

[ या श्लोकांत स्थूल मानानें कर्मांचे सर्व प्रकार दाखविले आहेत. हीं सर्वं कर्मे वर्णधर्म व आश्रमधर्म किंवा राष्ट्रधर्म व व्यक्तिधर्म या दोन प्रकारच्या वर्गांत समाविष्ट करतां येतात. तात्पर्य, मनुष्याचें कर्म वैयक्तिक म्हणजे आश्रमधर्माचें असो किंवा सार्वजनिक म्हणजे वर्णधर्माचें असो, तें ईश्वरसेवेच्या बुद्धीनेंच केल्यास मोक्षदायक होतें. कर्मयोगांत अंतर्भूत होणाऱ्या यज्ञ, दान, तप, व उपभोग म्हणजे अशनपानादि शारीरिक व्यवहार या चारी प्रकारचा उल्लेख करून एतत्स्वरूप सर्वकर्म पूर्वोक्त रीतीनें ( यथार्थज्ञानपूर्वक प्रेमानें व शुद्धांतःकरणानें ) परमेश्वराला अर्पण करावें असें भगवंतांनीं येथें विधान केलें आहे.]

अशा रीतीनें ईश्वरार्पण केलेल्या कर्मांचें फल सांगतातः—

**शुभाशुभफलैरेवं मोक्ष्यसे कर्मबंधनैः**
**संन्यासयोगयुक्तात्मा विमुक्तो मामुपैष्यसि** २८

एवम् शुभाशुभफलैः कर्मबंधनैः मोक्ष्यसे । विमुक्तः संन्यासयोगयुक्तात्मा माम् उपैष्यसि ।

ह्या योगानें शुभाशुभ ( इष्टानिष्ट ) फलरूपी कर्मबंधनांतून तूं मुक्त होशील. आणि असा मुक्त झालास म्हणजे, संन्यास म्हणजे फलत्याग व योग म्हणजे कर्तव्यतत्परता अर्थात् (ह्या त्याग व ग्रहणरूप) कर्मयोगानें युक्त होत्साता मला (परमात्मस्वरूपाला) प्राप्त होशील.

**समोऽहं सर्वभूतेषु न मे द्वेष्योऽस्ति न प्रियः**
**ये भजंति तु मां भक्त्या मयि ते तेषु चाप्यहम्** २९

सर्वभूतेषु अहम् समः । मे न द्वेष्यः न प्रियः अस्ति । तु ये माम् भक्त्या भजंति । ते मयि, अहम् अपि तेषु च ।

सर्व प्राणिमात्रांच्या अंतर्यामीं मी (परमेश्वर) सारखाच (भरलेला) आहें. (अर्थात्) माझा नावडता किंवा आवडता कोणी असणें शक्य नाहीं. तथापि जे (पूर्वोक्तरीतीनें) भक्तिपूर्वक माझी (परमेश्वराची) उपासना करितात, ते माझ्या ठिकाणीं असतात. आणि त्याचप्रमाणें मी (परमेश्वर) त्यांच्या ठिकाणीं असतों.

[ परमेश्वर सर्व सृष्टीला व्यापून राहिला आहे तथापि हें तत्त्व ओळखून जे

त्याची उपासना करितात ते मात्र तत्स्वरूप होतात. इतरांना परमेश्वराची प्राप्ति होत नाहीं, याचें कारण ते इंद्रियाधीन झाल्यामुळें, त्यांची बुद्धि भ्रष्ट होऊन त्यांच्या प्रेमाचा विषयवासनातृप्तीकडे दुरुपयोग होतो व तेणेंकरून त्यांच्या अंतर्यामीं असणाऱ्या परमेश्वरास ते पराङ्मुख होतात हेंच होय. अर्थात् या बाबतींत परमेश्वराच्या ठिकाणीं रागलोभादिविकारांचें अस्तित्व मानणें हें अज्ञान होय.]

स्वर्गादिफलदायक कर्मांची पद्धति व सामग्री जशी निश्चित असते, तसेंच त्या कर्मांचे अधिकारीही निश्चित असतात. परंतु हा अधिकाराचा नियमही ईश्वरोपासनेच्या बाबतींत कितपत लागू पडतो, तें सांगतातः—

**अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक्**
**साधुरेव स मंतव्यः सम्यग्व्यवसितो हि सः ३०**

**सुदुराचारः अपि चेत्, अनन्यभाक् माम् भजते, सः साधुः एव मंतव्यः। हि सः सम्यक् व्यवसितः।**

(प्रथम) अत्यंत दुराचारी असतांही (दुराचाराचा पश्चात्ताप होऊन) जर अनन्य भक्तीनें माझी (परमेश्वराची) उपासना करील तर तो शुद्धच समजावा, कारण (पश्चात्तापानें) त्याची प्रवृत्ति सन्मार्गाकडे निश्चित झालेली असते.

[ अत्यंत घोर कर्म करणाऱ्या मनुष्यास देखील प्रसंगविशेषीं कृतकर्मांचा पश्चात्ताप होऊन, त्याला परमार्थाची इच्छा उत्पन्न होते. अशा स्थितींत आपलीं पापकर्में अत्यंत घोर असल्यामुळें आपण परमार्थसाधनास सर्वथैव अनधिकारी आहों, अशी कल्पना करून निराश होण्याचें कारण नाहीं. कारण पश्चात्ताप व सदिच्छा उत्पन्न होतांच तो शुद्ध म्हणजे ईश्वरोपासनेस अधिकारी होतो.]

ईश्वरोपासनेची प्रवृत्ति उत्पन्न झाल्यावर पूर्वींचें दुराचरण तसेंच चालू राहतें कीं काय, म्हणजे ईश्वरोपासना व दुराचरण एकदम चालूं शकतात कीं नाहीं, तें सांगतातः—

**क्षिप्रं भवति धर्मात्मा शश्वच्छांतिं निगच्छति**
**कौंतेय प्रतिजानीहि न मे भक्तः प्रणश्यति ३१**

**क्षिप्रम् धर्मात्मा भवति, शश्वत् शांतिम् निगच्छति। कौंतेय! मे भक्तः न प्रणश्यति [ इति ] प्रतिजानीहि।**

(उपासनेची निश्चित प्रवृत्ति उत्पन्न झालेला पुरुष) लौकर (तत्काल) धर्मात्मा म्हणजे पवित्र अंतःकरणाचा होतो, आणि (क्रमानें) अविनाशी समाधानास म्हणजे मोक्षास खचित जातो. अर्जुना! माझ्या (परमेश्वराच्या) भक्ताचा नाश (कधींही) होत नाहीं हें प्रतिज्ञेनें (निश्चयानें) समज.

[ भगवदुपासनेची आवड अंतःकरणांत उत्पन्न होतांच दुराचाराविषयीं तिटकारा येऊं लागतो. म्हणजे अंतःकरण पवित्र होतें. अशा शुद्ध व भक्तियुक्त अंतःकरणांत दुराचरणाची वासनाही उत्पन्न होणें शक्य नाहीं. अ. ४ श्लो. ३६ व ३७ यांत सांगितल्याप्रमाणें ज्ञानविज्ञानयुक्त भक्तीचें सामर्थ्य देखील तसें दिव्य आहे. अर्थात् मद्यपानासारखीं दुर्व्यसनें किंवा व्यभिचारासारखीं घोर कर्मे ईश्वरोपासनेबरोबर चालू राहाणें अगदींच असंभवनीय आहे. यावरून जेथें असले दुराचार चालू असतील तेथें उपासनेचें केवळही अवडंबर दिसलें तरी ती खरी उपासना नसून, दुराचरणावर पांघरूण घालून भोळ्या लोकांच्या डोळ्यांत धूळ फेंकण्याकरितां माजविलेलें निवळ ढोंग होय, असें उघड सिद्ध होतें. ज्याच्या अंतःकरणांत भगवद्भक्तीचा खरोखर उदय झाला असेल, तो योग्य क्रमानें अखेरीस अमृतत्वापर्यंत पोंचल्यावांचून कधींही राहात नाहीं. म्हणूनच (अ० ६ श्लोक ४० यांतील नियमांच्या दृढीकरणार्थ ) माझा भक्त कधींही नाश पावत नाहीं. अशी भगवंतांनीं तेथें प्रतिज्ञा केली आहे.]

ईश्वरोपासनेचा अधिकार जातीवर अवलंबून आहे कीं काय, तें सांगतात:—

**मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः**
**स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम् ३२**

**पार्थ! अपि हि ये माम् व्यपाश्रित्य स्युः ते पापयोनयः स्त्रियः वैश्याः तथा शूद्राः अपि पराम् गतिम् यांति।**

अर्जुना ! ज्याअर्थी असें आहे त्याअर्थी, जे लोक माझा (परमेश्वराचा) आश्रय करून राहतील, ते पापयोनि म्हणजे चांडालादि अस्पृश्य लोक, किंवा स्त्रिया किंवा वैश्य अथवा शूद्रं कोणीही असले तरी परम (श्रेष्ठ) गतीला जातात.

[ श्रौत स्मार्त आचारधर्म पाळणें एवढाच परमार्थाचा मार्ग नसून, ईश्वरो-

पासना इतर रीतीनें केली असतांही परमार्थ साध्य होतो. म्हणून कांहीं विशिष्ट आचारधर्मांत अनधिकारी मानलेल्या स्त्रीशूद्रचांडालादिकांसही ईश्वरोपासना स्वतंत्रपणें करण्याचा अधिकार आहे. ह्या उपासनामार्गांत जातिभेद वगैरेंचा प्रश्न उत्पन्न होण्याचें कारण नाहीं. वैश्य हे त्रैवर्णिकांपैकींच असल्यामुळें, त्यांना क्षत्रियांसारखेच वैदिक कर्मांचे अधिकार होते. त्याचप्रमाणें, त्रैवर्णिक स्त्रियांसही प्राचीन काळीं अनधिकारी मानीत नसत असे आधार मिळतात. परंतु गीताकाळीं स्त्रिया व वैश्य यांचे हे अधिकार लुप्त झाले असावेत असें वरील श्लोकांतील उल्लेखावरून अनुमान होतें.]

**किं पुनर्ब्राह्मणाः पुण्या भक्ता राजर्षयस्तथा**
**अनित्यमसुखं लोकमिमं प्राप्य भजस्व माम्** ३३

**किं पुनः पुण्याः ब्राह्मणाः तथा भक्ताः राजर्षयः ? इमम् अनित्यम् असुखम् लोकम् प्राप्य माम् भजस्व ।**

मग पवित्र उच्चप्रतीचे आनुवंशिक संस्कार ज्यांना मिळाले आहेत असे व भगवद्भक्त ब्राह्मण आणि क्षत्रियश्रेष्ठ (ह्या ईश्वरोपासनेनें) मुक्त होतील हें निराळें सांगावयास नको. (अर्जुना) तू ह्या नाशिवंत व सुखरहित मृत्युलोकांत जन्मला आहेस म्हणून माझी (परमेश्वराची) उपासना कर (म्हणजे तू नित्यसुख प्राप्त करून घेशील)

**मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु**
**मामेवैष्यसि युक्त्वैवमात्मानं मत्परायणः** ३४

**मन्मनाः, मद्भक्तः मद्याजी भव । माम् नमस्कुरु । एवम् आत्मानम् माम् युक्त्वा मत्परायणः सन् माम् एव एष्यसि ।**

माझ्या (परमेश्वराच्या) ठिकाणीं मन स्थापन करणारा हो, माझा भक्त हो, माझी उपासना कर, मला नमस्कार कर, (शरण ये) आपला आत्मा माझ्याशीं एकरूप करून ईश्वरनिष्ठ झालास म्हणजे मलाच प्राप्त होशील (ईश्वरस्वरूपांत मिळून जाशील).

[ यज्ञ, भक्ति, उपासना इत्यादि कायिक, वाचिक व मानसिक सर्वकर्मं अनन्य-भावानें परमेश्वराला अर्पण करावीं म्हणजे परमेश्वरप्राप्ति होते, असें येथें २७ व्या श्लोकांतील विधानाचें भगवंतांनीं निगमन केलें आहे.]

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे राजविद्याराजगुह्ययोगोनाम नवमोऽध्यायः ।**

याप्रमाणें श्रीभगवंतांनीं गाइलेल्या उपनिषदांतील ब्रह्मविद्यांतर्गत कर्मयोगशास्त्राविषयींच्या श्रीकृष्णार्जुनसंवादांतील **राजविद्याराजगुह्य प्रकरण** नांवाचा नववा अध्याय समाप्त झाला.

## रहस्यदीपिकेच्या नवव्या अध्यायाचा उपसंहार

### नवव्या अध्यायाची विषयानुक्रमणिका

| विषय | श्लोक |
|---|---|
| प्रस्तावना ... ... ... ... ... | १–३ |
| जगत्कारणाधिकरण ... ... ... ... | ४–१० |
| निरीश्वरवाद ... ... ... ... ... | ११–१२ |
| सेश्वरवाद ... ... ... .... .... | १३–१४ |
| अधियज्ञाधिकरण ... ... ... ... | १५–२४ |
| इतर देवतांचा उपासना .... ... ... ... | २५ |
| उपासनेंत सामग्रीची अट नाहीं ... ... ... | २६ |
| ईश्वरार्पणाधिकरण... ... ... ... ... | २७–३४ |

सातव्या अध्यायांतील श्लोक १५ ते २३ पर्यंतचा संक्षिप्त विषय नवव्या अध्यायांत विस्तारानें आला आहे. अधियज्ञाचें आणि त्याला लाग्र असणाऱ्या इतर विषयांचें विस्तृतविवेचन प्रस्तुत अध्यायांत आलें आहे.

यांत प्रथम भक्तिमार्गाच्या विवेचनास सुरुवात होते. अधियज्ञ हा भक्तिमार्गाचा आत्मा आहे. अधियज्ञ म्हणजे काय? याचें उत्तर गीता अध्याय ८ श्लोक ४ यांत भगवंतांनीं दिलें आहे. जो यज्ञाचें म्हणजे उपासनेचें अधिष्ठान म्हणजे केंद्र होऊन राहातो, तो अधियज्ञ असा याचा शब्दार्थ आहे. यावरून उपास्य परमात्मा म्हणजेच अधियज्ञ होय, हा भगवंतांचा अभिप्राय सहजच व्यक्त होतो. ईश्वर आणि त्याची उपासना यांचेंच मुख्यत्वेंकरून या अध्यायांत प्रतिपादन आहे, हें वर सांगितलेंच आहे. आजपर्यंतच्या बहुतेक टीकाकारांनीं नवव्या अध्यायाची फारच महती गाइली आहे आणि ती यथार्थ आहे. आमचे मतें या महतीचें

मुख्य कारण असें आहे कीं, उपासनाशास्त्रांतील महत्त्वाचे सामान्य नियम या अध्यायांत अगदीं थोडक्यांत आले आहेत

गीताशास्त्रांतील भक्तिमार्गाच्या सामान्य नियमांचें आणि पूर्वी येऊन गेलेल्या कर्म-योगांतील सामान्य नियमांचें स्वरूप सूक्ष्म दृष्टीनें पाहिल्यास तें एकच आहे, असें आढळून येतें. यावरून कर्म आणि उपासना हे दोनही मार्ग परस्परांशीं तुटक नसून एकाच योगनिष्ठेचीं तीं दोन अंगें आहेत असें ठरतें. प्रस्तुत अध्यायाच्या पहिल्या प्रास्ताविक तीन श्लोकांत अनसूया म्हणजे मत्सरशून्य सरळ हृदय व श्रद्धा म्हणजे आस्तिक्यबुद्धि ( आस्था ) हे दोन गुण भक्ति-मार्गाचा अधिकार उत्पन्न होण्यास कारणीभूत आहेत असें स्पष्ट दर्शविलें आहे. अधिकाराचा हा नियम, मागें कर्मयोगाच्या विवेचनांत जशाचा तसाच आला आहे. ( अ. ३ श्लो. ३१ पहा ) त्याचप्रमाणें अध्याय २ श्लोक ७० यांत सांगितलेला नियमच प्रस्तुत अध्यायाच्या २० ते २२ अखेर तीन श्लोकांत विस्तारानें आलेला दिसतो. शिवाय दुसऱ्या अध्यायांतील ४६ वा श्लोक आणि नवव्या अध्यायाचा २२ वा श्लोक हे एकाच तात्पर्याचे आहेत, असें विचाराअंतीं कोणासही कबूल करावें लागेल. अध्याय २ श्लोक ४० व नवव्या अध्यायांतील श्लोक २६ यांतील सामग्रीबद्दलचा नियम देखील एकच आहे. अध्याय ४ श्लोक २३ व नवव्या अध्यायांतील श्लोक २८ या दोनही श्लोकांत कर्मबंधांतून सुटण्याचा एकच मार्ग सांगितला आहे. नवव्या अध्यायांतील श्लोक ३० व ३१ आणि चौथ्या अध्या-यांतील श्लोक ३६ व ३७ हे तर समानार्थकच आहेत. सहाव्या अध्यायांतील ४० व्या श्लोकाचा "**न हि कल्याणकृत्कश्चिद्दुर्गतिं तात गच्छति**" हा उत्तरार्ध आणि नवव्या अध्यायाच्या ३१ व्या श्लोकाचा "**कौंतेय प्रति-जानीहि न मे भक्तः प्रणश्यति**" हा उत्तरार्ध एकसारखाच आहे हें निराळें सांगावयास नको. याप्रमाणें आणखीही पुष्कळच उदाहरणें दाखवितां येतील; परंतु अध्ययनशील मनुष्यानें सूक्ष्म दृष्टीनें विचार केल्यास कर्म व उपासना या दोनही मार्गांचे सामान्य नियम एकच आहेत, हें नीट समजून आल्यावर त्याला हीं अशीं पुष्कळच उदाहरणें दिसूं लागतील.

या सर्व विवेचनावरून निष्काम कर्तव्यकर्मामध्येंच ईश्वरोपासनाबुद्धि (भक्ति) राहणें आणि ईश्वरोपासनेंतच (भक्तींतच) कर्तव्यबुद्धि असणें गीताशास्त्राला पूर्ण अभिप्रेत आहे असें निर्विवाद ठरतें.

एकच विषय गीताशास्त्रांत पुनः पुन्हा आला असला तरी त्यांत संक्षेप व विस्तार हे भेद असतातच आणि म्हणूनच अशा ठिकाणीं पुनरुक्तीच्या शंकेला मुळींच जागा उरत नाहीं.

प्रेम, श्रद्धा व (आस्था) हे ईश्वरोपासनेचे मूलाधार आहेत. अश्रद्धा व असूया हे दोनही दोष कर्मयोगाप्रमाणेंच उपासनेसही बाधक आहेत. ह्या उपासनामार्गाला स्वतः भगवंतांनींच **राजविद्या व राजगुह्य**' म्हटलें असल्यामुळें त्याचें महत्त्व निराळें वर्णन करण्याचें कारण नाहीं. ज्या लोकांची बुद्धि तीव्र व कुशाग्र नसते त्यांना शास्त्रीयपद्धतीने सोपपत्तिक ब्रह्मज्ञान संपादन करणें कठिण पडतें. अशा लोकांना भगवत्प्राप्तीचा सोपा मार्ग दाखविण्याकरितां या अध्यायांत उपासनेचें विवेचन केलें आहे. तीव्र बुद्धि सर्वांनाच स्वाभाविक प्राप्त नसली तरी प्रेम हा मनोधर्म निसर्गतःच सर्व प्राणिमात्रांत विद्यमान असतो. ह्या प्रेमास इंद्रियतर्पणाच्या अनवश्यक विषयोपभोगाच्या क्षणिक मोहांत गुंतवून त्याचा दुरुपयोग न करितां, त्याला ईश्वरोपासनेचें योग्य वळण लाविल्यास, त्याचें भक्तींत रूपांतर होऊन त्या मार्गानेंही ज्ञानविज्ञानासह ईश्वरप्राप्ति झाल्यावांचून राहात नाहीं. ह्या भक्तिमार्गाच्या पूर्णतेसाठीं परमेश्वर जगताचें आदिकारण असून तो सर्वव्यापक, सर्वनियामक व सर्वाधार असूनही तो सृष्टीच्या व्यापारापासून अलिप्त असतो. कारण त्या व्यापारांचे ठिकाणीं परमेश्वराची आसक्ति असत नाहीं व ह्याप्रमाणें आसक्ति सोडून जो कर्म करितो तोही कर्मफलाच्या बंधापासून मुक्त असतो, असे भगवंतांनीं श्लोक ४ ते १० अखेर जगत्कारणाधिकरणांत सांगितलें आहे. पुढें देहात्मवादी लोक आसुरी स्वभावाचे कसे बनतात हें ११।१२ व्या श्लोकांत सांगून नंतर १३।१४।१५ या श्लोकांत दैवी स्वभावाचे कर्मयोगी महात्मे निरनिराळ्या प्रकारांनीं कशी उपासना करितात व परमेश्वर विश्वरूप असल्यामुळें ती त्यालाच कशी पोंचते, म्हणजे परमेश्वर **अधियज्ञ** कसा आहे हें सांगितलें आहे. नंतर १६।१७।१८।१९ ह्या चार श्लोकांत उपासनेच्या स्वरूपाचें स्पष्टीकरण करण्याकरितां कांहीं विभूति सांगितल्या आहेत. पुढें २०।२१ व्या श्लोकांत काम्य बुद्धीच्या कर्मठ लोकांची ध्येय ठरविण्यांत चूक झाल्यामुळें, त्यांचे जन्ममरणाचे फेरे चुकत नाहींत असें सांगून, २२ व्या श्लोकांत अनन्यभक्त कर्मयोग्याचा योगक्षेम कसा चालतो हें सांगितलें आहे. नंतर २३।२४।२५ या श्लोकांत ईश्वरस्वरूपाच्या यथार्थ ज्ञानाच्या अभावीं, केलेल्या उपासनांचें फल कर्त्याच्या संकुचित ज्ञानास अनुरूपच असतें म्हणून

ज्ञानावांचून भक्तीची पूर्णता होत नाहीं असें सिद्ध करून, परमेश्वरच सर्व उपासनांचें उपास्य, फलदाता व भोक्ता म्हणजे सृष्टींतील व देहांतील **अधियज्ञ** आहे असें सिद्ध करून, अधियज्ञाधिकरणाचा उपसंहार केला आहे. श्लोक २२ ते २६ अखेर केलेल्या सामान्य विवेचनाचा उपदेश व्यक्तिशः अर्जुनास अनुलक्षून पुढील दोन श्लोकांत केला आहे. भक्तिमार्गांत कर्तव्यनिष्ठेनें उपासनामय कर्म करून त्याचें फल ईश्वरार्पण करणें हेंच मुख्य असल्यामुळें यज्ञ, दान, तप व कर्म हें सर्व परमेश्वरास अर्पण केलें असतां उपासक त्या कर्मांच्या शुभाशुभ फलांपासून मुक्त होऊन परमेश्वरस्वरूप होतो, असें श्लोक २७।२८ यांत सांगितलें. त्यानंतर ह्या उपासनामार्गांत ठराविक पद्धति, निश्चित सामग्री, उपासकाचा अधिकार, वर्णभेद, जातिभेद, उच्चनीचता इत्यादि कोणत्याही गोष्टीचा प्रतिबंध नसून, ज्याच्या अंतःकरणांत श्रद्धा, प्रेम व दृढनिश्चय असेल अशा कोणत्याही मानवी प्राण्यास उपासना करण्याचा अधिकार आहे; इतकेंच नव्हे तर, ह्या मार्गानें त्यांला क्रमशः मोक्षप्राप्तिही खचित होते. प्रथम दुराचारी असून पुढें पश्चात्तापपूर्वक दृढनिश्चयानें भगवदुपासनेस लागेल तर त्याचे सर्व दोष जाऊन तोही उन्नतीच्या मार्गास लागतो व पुनः त्याला दुराचरणाची वासना होत नाहीं असें श्लोक २९ ते ३३ अखेर सांगून शेवटीं ३४ व्या श्लोकांत अनन्यभावानें सर्व कर्मे परमेश्वरार्पण केल्यानेंच ईश्वरप्राप्ति होते असा ईश्वरार्पणाधिकरणाचा उपसंहार करून अध्यायाची परिसमाप्ति केली आहे. सारांश **प्रेम, श्रद्धा,** ईश्वरस्वरूपाचें यथार्थ ज्ञान म्हणजे **ज्ञानविज्ञान, दृढनिश्चय** व **कर्तव्यनिष्ठा** हीं **भक्तिमार्गाचीं अंगें** आहेत असें ह्या अध्यायांत प्रतिपादन करून, **अधियज्ञः कथं कोऽत्र देहेऽस्मिन्।** ह्या प्रश्नाचें विवेचन पूर्ण केलें आहे.



# दशमोऽध्यायः।

आठव्या अध्यायांतील अर्जुनाच्या सात प्रश्नांपैकीं **'प्रयाणकालीन ईशस्मरण'** या प्रश्नाचें विवेचन **आठव्या अध्यायांत** व **'अधियज्ञ'** ह्या प्रश्नाचें विवेचन **नवव्या अध्यायांत** पूर्ण झालें आहे. आतां व्युत्क्रमानें (उलट क्रमानें) तिसऱ्या **'अधिदैव'** ह्या प्रश्नाचें विवरण करणें हा ह्या **दहाव्या अध्यायाचा प्रतिपाद्य विषय** आहे. (हा विषय सातव्या अध्यायांत श्लोक ८ ते ११ पर्यंत संक्षेपानें आला आहे.)

सृष्टीमध्यें असणारी भिन्न शक्ति परमेश्वराचीच आहे, असें सिद्ध करण्याकरितां म्हणजे अधिदैवाचें विवेचन करण्याकरितां श्रीभगवान् म्हणतातः—

**भूय एव महाबाहो शृणु मे परमं वचः**
**यत्तेऽहं प्रीयमाणाय वक्ष्यामि हितकाम्यया** १

**महाबाहो ! यत् प्रीयमाणाय ते हितकाम्यया एव अहम् भूयः वक्ष्यामि ( तत् ) मे परमम् वचः शृणु ।**

श्रीभगवान् म्हणतात, अर्जुना! माझ्या भाषणानें संतोष पावत आहेस म्हणून तुला, [तुझ्या] कल्याणाच्या इच्छेनेंच मी (पुनः) जे सांगणार आहें, [तें] माझें श्रेयस्कर भाषण श्रवण कर.

[ भगवंतांच्या मुखांतील वचनामृत सेवन करीत असतां अर्जुनाला आनंद होत असलेला पाहून श्रीभगवंतांना आपलें प्रवचन करण्यास उल्हास वाटून, त्यांनीं अर्जुनाच्या आनंदवृत्तीचा उल्लेख केला आहे.]

**न मे विदुः सुरगणाः प्रभवं न महर्षयः**
**अहमादिर्हि देवानां महर्षीणां च सर्वशः** २

**सुरगणाः महर्षयः मे प्रभवम् न विदुः । हि सर्वशः देवानाम् महर्षीणां च अहं आदिः ।**

सर्व देव व मोठमोठे ऋषि (देखील) माझा (परमेश्वराचा) प्रभव (परमेश्वर कसा प्रगट झाला हें) जाणत नाहींत. कारण, मी (परमेश्वर) सर्व देव व ऋषि यांचें आदिकारण आहें.

[ परमेश्वराच्या अपरा प्रकृतीपासून बुद्धि म्हणजे महत्तत्त्व व त्या महतत्त्वापासून अहंकाराची उत्पत्ति आहे. सर्व ज्ञानाला बुद्धि हेंच साधन आहे. त्यामुळें बुद्धीसह अपरा प्रकृतीलाही कारण असलेला परमेश्वर केव्हां, कसा व कां प्रगट झाला, हें बुद्धीला अर्थात् बुद्धि हेंच ज्यांच्या ज्ञानाचें साधन आहे अशा देव ऋषि इत्यादिकांना समजणें शक्य नाहीं.]

**यो मामजमनादिं च वेत्ति लोकमहेश्वरम्**
**असंमूढः स मर्त्येषु सर्वपापैः प्रमुच्यते ३**

**यः माम् अजम् अनादिम् च लोकमहेश्वरम् वेत्ति। मर्त्येषु असंमूढः सः सर्वपापैः प्रमुच्यते।**

जो (पुरुष) मी (परमेश्वर) जन्मरहित (अतएव) अनादि व सर्व विश्वाचा श्रेष्ठ प्रभु आहें असें जाणतो तो सर्व मानवीप्राण्यांत मोहरहित होय (व) तोच सर्व पातकांपासून मुक्त होतो.

[ सृष्टिरूपानें परमेश्वर केव्हां, कसा व कां प्रगट झाला हें कळणें अशक्य असलें तरी, मोक्ष प्राप्त करून घेण्यासाठीं वरील प्रश्न सोडवीत बसण्याची आवश्यकता नसून, परमेश्वरस्वरूपाचें यथार्थ ज्ञान झालें म्हणजे पुरुपार्थसिद्धि होते. परमेश्वर अनादि असून सर्व शक्तिमान् म्हणजे सृष्टींतील सर्व स्थूल-सूक्ष्म शक्तींचा **उत्पादक, प्रेरक** व **नियामक** आहे. परमेश्वराहून इतर कोणतीही देवता स्वतंत्र शक्तिमान् नाहीं. अर्थात् परमेश्वरच सर्व देवशक्तींचें उगमस्थान आहे, असें येथें भगवंतांनीं विधान केलें आहे.]

ही दैवीशक्ति कोणत्या साधनांनीं व्यक्त होते, तें सांगतातः—

**बुद्धिर्ज्ञानमसंमोहः क्षमा सत्यं दमः शमः**
**सुखं दुःखं भवोऽभावो भयं चाभयमेव च ४**
**अहिंसा समता तुष्टिस्तपो दानं यशोऽयशः**
**भवंति भावा भूतानां मत्त एव पृथग्विधाः ५**

**बुद्धिः, ज्ञानम्, असंमोहः क्षमा, सत्यम्, दमः, शमः, सुखम्, दुःखम्, भवः, अभावः, भयं च अभयं एव च, अहिंसा, समता, तुष्टिः, तपः, दानम्, यशः, अयशः, भूतानाम् पृथग्विधाः भावाः, मत्तः एव भवंति।**

बुद्धि, ज्ञान, जागृति, क्षमा, सत्य, इंद्रियनिग्रह, शांति, सुख, दुःख

उत्पत्ति, लय, भय, धैर्य, अहिंसा, समता, संतोष, व्रतनियम, दानधर्म, यश व अपयश (इत्यादि) प्राणिमात्रांचे निरनिराळे धर्म माझ्यामुळें (दैवीशक्तीच्या निमित्तानें) उत्पन्न होतात.

**महर्षयः सप्त पूर्वे चत्वारो मनवस्तथा**
**मद्भावा मानसा जाता येषां लोक इमाः प्रजाः** ६

**पूर्वे सप्त, तथा चत्वारः महर्षयः, मनवः मद्भावाः मानसाः जाताः। लोके येषां इमाः प्रजाः।**

प्रारंभींचे सात महर्षि, व [ अंगिरस, कश्यप, वसिष्ठ व भृगु हे चार गोत्र ऋषी किंवा श्लोक १३ यांत उल्लेखिलेले, नारद, असित, देवल व व्यास, हे चार ऋषी, त्याचप्रमाणें मनु हे सर्व माझ्या दैवी शक्तीनें युक्त असून माझ्या इच्छामात्रें करून उत्पन्न झालेले आहेत. ह्या लोकीं असलेलें (देवादि सर्व) ह्या त्यांच्याच प्रजा आहेत.

[ ह्या श्लोकांत '**चत्वारः**' ह्या शब्दानें चार कोण मानावयाचे हें प्राचीन टीकांवरून निश्चित ठरत नाहीं. रहस्यकारांनीं बराच ऊहापोह करून **चतुर्व्यूह** मानावे असें ठरविलें आहे. परंतु पुढेंमागें चतुर्व्यूहाचा उल्लेख गीतेंत कोठेंही नाहीं. म्हणून तेच घ्यावे असें विनिगमक प्रमाण गीतेंत आढळत नाहीं, तथापि प्राचीन टीकाकारांच्या अर्थापेक्षां रहस्यकारांचा अर्थच अधिक सयुक्तिक दिसतो व गीतेंतीलच प्रमाणावरून पाहिल्यास याच अध्यायांत श्लोक १३ यांतील नारदादि चार ऋषिही घेतां येतील. त्याचप्रमाणें गीतेशिवाय महाभारतांतील वचनावरून ठरवावयाचें झाल्यास शांतिपर्वांत पुढील श्लोक आढळतोः—

मूलगोत्राणि चत्वारि समुत्पन्नानि भारत।
अंगिराः कश्यपश्चैव वसिष्ठो भृगुरेव च। शांतिपर्व अ. २९६/१७.

या श्लोकांत, **अंगिरस कश्यप, वसिष्ठ** व **भृगु** अशा ऋषींचीं नांवें मूळ गोत्रें म्हणून दिलीं आहेत. गीतेंतील '**चत्वारः**' या शब्दानें हे चार ऋषी देखील येथें विवक्षित असण्याचा संभव आहे. किंबहुना **पूर्वे** या विशेषणावरून आणि **चार** या संख्येवरून **मनु** किंवा **चतुर्व्यूह** (नारदादि ऋषि) वगैरे कल्पनेपेक्षां मूळ गोत्रें म्हणून वरील श्लोकांत जे चार ऋषी दिले आहेत, तेच गीतेला मान्य आहेत ही कल्पना अधिक सयुक्तिक ठरते.

**एतां विभूतिं योगं च मम यो वेत्ति तत्त्वतः**
**सोऽविकंपेन योगेन युज्यते नाऽत्र संशयः** ७

**एताम् मम विभूतिम् योगम् च यः तत्त्वतः वेत्ति, सः अविकंपेन योगेन युज्यते। अत्र संशयः न।**

ही माझी [दैवी] शक्ति व तिच्या प्रतीतीचीं साधनें (बुद्धि इत्यादि योग) यांचें यथार्थ ज्ञान ज्याला होतें, तो निश्चल (बुद्धि) योगानें युक्त होतो, यांत संशय नाहीं.

[ दैवीशक्ति व तिचा प्रत्यय येण्याचीं साधनें हीं परमेश्वरापासूनच उत्पन्न होतात म्हणून परमेश्वरच दैवीशक्तीचें उगमस्थान होय, असें येथें भगवंतांनीं ३ ऱ्या श्लोकांतील विधानाचें निगमन केलें आहे.]

**अहं सर्वस्य प्रभवो मत्तः सर्वं प्रवर्तते**
**इति मत्वा भजंते मां बुधा भावसमन्विताः** ८

**अहम् सर्वस्य प्रभवः। मत्तः सर्वम् प्रवर्तते। इति मत्वा, भावसमन्विताः बुधाः माम् भजंते।**

मी सर्वांचें उत्पत्तिस्थान असून माझ्यापासूनच सर्व **प्रवृत्त** होतें (**कार्यक्षम** होतें) असें जाणून भक्तियुक्त तत्त्ववेत्ते माझी (परमेश्वराची) उपासना करितात.

[ परमेश्वर सर्व जगाचा उत्पादक व प्रवर्तक आहे असें ज्ञान झालें म्हणजे त्या ज्ञानें मनुष्याच्या अंतःकरणांत परमेश्वराविषयीं अनन्यभक्ति उत्पन्न होते.]

ज्ञानविज्ञानसंपन्न अनन्यभक्त परमेश्वराची उपासना कशी करतात, तें सांगतातः—

**मच्चित्ता मद्गतप्राणा बोधयंतः परस्परम्**
**कथयंतश्च मां नित्यं तुष्यंति च रमंति च** ९

**मच्चित्ताः मद्गतप्राणाः परस्परम् बोधयंतः माम् नित्यम् कथयंतः च तुष्यंति च रमन्ति च।**

ज्यांनीं आपलें अंतःकरण मला (परमेश्वराला) समर्पण केलें आहे व ज्यांचें जीवन माझ्यावर अवलंबून आहे, असे भक्त एकमेकांना बोध करीत व वर्णन करीत (ज्ञानविज्ञानचर्चा करण्यांतच) संतुष्ट असतात आणि आनंद पावतात.

ह्या उपासनेचें फल सांगतातः—

**तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम्**
**ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयांति ते** १०

**सततयुक्तानां प्रीतिपूर्वकम् माम् भजताम् तेषाम्, तम् बुद्धियोगम्**
**ददामि। येन ते माम् उपयांति।**

अशा नेहमीं कर्तव्यनिष्ठ असून प्रेमपूर्ण भजन (ईश्वरी ज्ञानविज्ञान-चर्चा) करणाऱ्या भक्तांना ज्या योगें ते मला (परमेश्वराला) प्राप्त होतील, असा बुद्धियोग (स्थितप्रज्ञा) मी देतों.

[ प्रेमपूर्वक ईश्वराराधना व ईश्वरी ज्ञानविज्ञानाचा विचार करीत असतां, ईश्वर-कृपेनें, कर्मयोगास अवश्य असलेल्या स्थिरबुद्धीचा उदय होतो.]

**तेषामेवानुकंपार्थमहमज्ञानजं तमः**
**नाशयाम्यात्मभावस्थो ज्ञानदीपेन भास्वता** ११

**तेषाम् अनुकंपार्थम् एव, आत्मभावस्थः अहं भास्वता ज्ञानदीपेन,**
**अज्ञानजम् तमः नाशयामि।**

त्यांच्या प्रेमास्तव, आत्मस्वरूपाचे ठिकाणीं असणारा मी (परमेश्वर) तेजस्वी ज्ञानरूप दिव्यानें (त्यांचा) अज्ञानजन्य (मोहरूप) अंधकार नाहींसा करितों.

[ ज्ञानविज्ञानयुक्त प्रेमळ भक्तीनेंच भगवत्कृपा होऊन भक्तांना परमेश्वरसाक्षात्कार होतो. म्हणजे ते जीवनमुक्त होतात.]

अधिदैवाच्या विवरणाकरितां ६ व्या श्लोकांत जो आद्य विभूतींचा उल्लेख केला आहे, त्याचेंच विस्तृत विवरण ऐकण्याच्या इच्छेनें अर्जुन विचारतोः—

**अर्जुन उवाच**

**परं ब्रह्म परं धाम पवित्रं परमं भवान्**
**पुरुषं शाश्वतं दिव्यमादिदेवमजं विभुम्** १२
**आहुस्त्वां ऋषयः सर्वे देवर्षिर्नारदस्तथा**
**असितो देवलो व्यासः स्वयं चैव ब्रवीषि मे** १३

**भवान् परमम् पवित्रम्, परं धाम, परं ब्रह्म। त्वाम् शाश्वतम् दिव्यम्**
**आदिदेवम्, अजम्, विभुम्, पुरुषम्, (इति) सर्वे ऋषयः, तथा**

**देवर्षिः नारदः, असितः, देवलः व्यासः आहुः, च मे स्वयम् एव ब्रवीषि।**

अर्जुन म्हणाला—(श्रीभगवंता), तूं अत्यंत पवित्र, श्रेष्ठ तेज असें परब्रह्म आहेस. (परम श्रेष्ठ अव्यक्त ब्रह्मतत्त्व तूंच आहेस.) तुला अविनाशी दिव्य पुरुष, देवादिदेव जन्मरहित व व्यापक (परमेश्वर) असें सर्व प्राचीन ऋषि, देवर्षि नारद, असित, देवल व व्यास हे म्हणतात; आणि तूं स्वतःही मला तेंच सांगत आहेस. (व्यापक, नित्य व व्यक्त परमेश्वर तूंच आहेस.)

[ अर्जुनाच्या ह्या ईश्वरस्वरूपाच्या वर्णनावरून पहिल्या अध्यायांत दिसून आलेल्या धर्मशास्त्रज्ञानाप्रमाणेंच त्याचें अध्यात्मशास्त्राचें ज्ञानही उच्च प्रतीचें होतें, असें त्यानें प्रमाणाकरितां उल्लेखिलेल्या ऋषींच्या नांवांवरून दिसून येतें. अर्जुनानें उल्लेखिलेले नारदादि ऋषि हे तत्कालीन भागवतधर्मप्रवर्तक **तत्त्वज्ञानी** प्रसिद्ध **आचार्य** असावेत, असें दिसतें. अर्जुनाला विदित असलेलें **धर्मशास्त्र** व **अध्यात्मशास्त्र** म्हणजे **व्यवहार** व **वेदान्त** यांची संगति कशी लागते, म्हणजे धर्माधर्मनिर्णयाचे कामीं तत्त्वज्ञानाची कशी आवश्यकता असते, तत्त्वज्ञानाच्या अभावीं धर्माधर्मनिर्णय कसा लंगडा पडतो व जगताच्या धारणपोषणार्थ (लोकसंग्रहार्थ) तत्त्वज्ञानी सिद्ध पुरुषानें व्यवहाराकडे लक्ष देणें कसें अवश्य असतें, इत्यादि गोष्टी भगवंतांच्या मुखानें सोपपत्तिक ऐकल्यावर, ही संगति त्याला पूर्ण पटली आहे व श्रीकृष्ण हे साक्षात् परमेश्वर आहेत अशी त्याची भावना दृढ झाली आहे. हें अर्जुनानें येथें प्रांजलपणें कबूल केलें आहे.]

**सर्वमेतदृतं मन्ये यन्मां वदसि केशव**
**न हि ते भगवन् व्यक्तिं विदुर्देवा न दानवाः १४**

**केशव, यत्, माम् वदसि, एतत् सर्वम् ऋतम् मन्ये। भगवन्, हि ते व्यक्तिम् देवाः न विदुः दानवाः न (विदुः)।**

केशवा! जें तूं मला सांगितलेंस तें सर्व खरें आहे अशी माझी खात्री झाली. कारण, हे भगवंता! देवांना किंवा दानवांना (कोणालाही) तुझा आविर्भाव (व्यक्त होणें) कळलेला नाहीं. (तूं अव्यक्ताचा व्यक्त कां, कसा व केव्हां झालास हें कोणालाही कळणें शक्य नाहीं.)

**स्वयमेवात्मनात्मानं वेत्थ त्वं पुरुषोत्तम**
**भूतभावन भूतेश देवदेव जगत्पते** १५

**भूतभावन, भूतेश, देवदेव, जगत्पते, पुरुषोत्तम! त्वम् स्वयम् एव आत्मना आत्मानम् वेत्थ।**

सृष्टीचें धारणपोषण करणाऱ्या, व सृष्टीचें नियमन करणाऱ्या देवाधिदेवा, जगदीशा, पुरुषोत्तमा ! तूं स्वतःच स्वतःचा आविर्भाव जाणतोस.

**वक्तुमर्हस्यशेषेण दिव्या ह्यात्मविभूतयः**
**याभिर्विभूतिभिर्लोकानिमांस्त्वं व्याप्य तिष्ठसि** १६

**त्वम् याभिः विभूतिभिः इमान् लोकान् व्याप्य तिष्ठसि। दिव्याः आत्मविभूतयः अशेषेण हि वक्तुम् अर्हसि।**

(भगवंता), ज्या विभूतींनीं (दैवीशक्तींनीं) तूं ह्या सर्व लोकांस(भुवनांस) व्यापून राहिला आहेस त्या आपल्या सर्वही दिव्य विभूति मला सांगण्यास योग्य आहेस (कृपा करून मला सांग).

**कथं विद्यामहं योगिंस्त्वां सदा परिचिंतयन्**
**केषु केषु च भावेषु चिंत्योऽसि भगवन्मया** १७

**योगिन् ! त्वाम् सदा परिचिंतयन् अहम् ( त्वां ) कथम् विद्याम् ? भगवन् ! केषु केषु भावेषु च मया चिंत्यः असि ?**

हे योगेश्वरा ! नेहमीं (तुझें) चिंतन करीत असतां मीं तुला कसें जाणावें ? हे भगवंता ! कोणकोणत्या पदार्थांत मीं तुझें चिंतन करावें ? (कोणत्या पदार्थांत तुझी विभूति कशी ओळखावी ?)

**विस्तरेणात्मनो योगं विभूतिं च जनार्दन**
**भूयः कथय तृप्तिर्हि शृण्वतो नास्ति मेऽमृतम्** १८

**जनार्दन! आत्मनः योगम् विभूतिम् च विस्तरेण भूयः कथय। हि अमृतम् शृण्वतः मे तृप्तिः नास्ति।**

हे जनार्दना ! तूं आपली विभूति (दैवीशक्ति) व योग (ती ओळखण्याचें साधन) विस्तारानें पुनः सांग. कारण, (तुझें) अमृतमय [प्रवचन] श्रवण करीत असतां माझी तृप्ति होत नाहीं. (पुरेसें होत नाहीं).

**श्रीभगवानुवाच।**

**हंत ते कथयिष्यामि दिव्या ह्यात्मविभूतयः**
**प्राधान्यतः कुरुश्रेष्ठ नास्त्यंतो विस्तरस्य मे १९**

कुरुश्रेष्ठ ! हंत, ते दिव्याः विभूतयः प्राधान्यतः कथयिष्यामि। हि मे विस्तरस्य अंतः न अस्ति।

श्रीभगवान् म्हणाले—हे कुरुश्रेष्ठा (अर्जुना)! ठीक आहे, तुला मी आपल्या मुख्य मुख्य दिव्य विभूति सांगतों. (सर्व विभूति सांगतां येणें शक्य नाहीं) कारण, माझ्या विस्ताराला अंत नाहीं (माझ्या विभूति अनंत आहेत).

**अहमात्मा गुडाकेश सर्वभूताशयस्थितः**
**अहमादिश्च मध्यं च भूतानामंत एव च २०**

गुडाकेश ! सर्वभूताशयस्थितः आत्मा अहम्। भूतानां आदिः च, मध्यम् च अंतःच, अहम् एव।

अर्जुना ! सर्व पदार्थमात्रांच्या अंतर्यामीं असणारा आत्मा मी आहें. त्याचप्रमाणें सृष्टपदार्थांचा आदि, मध्य व अंतही मीच आहें.

**आदित्यानामहं विष्णुर्ज्योतिषां रविरंशुमान्**
**मरीचिर्मरुतामस्मि नक्षत्राणामहं शशी २१**

आदित्यानां विष्णुः अहम्। ज्योतिषाम् अंशुमान् रविः, मरुताम् मरीचिः, नक्षत्राणाम् शशी अहम् अस्मि।

अदितिपुत्रांमध्यें (देवांमध्यें) विष्णु मी आहें. प्रकाशमय पदार्थांमध्यें (प्रकाश) किरणयुक्त सूर्य मी आहें. मरुद्गणांमध्यें मरीचि नांवाचा (श्रेष्ठ) मरुत् मी आहें. (मरुत् हा देवांचा एक वर्ग आहे.). नक्षत्रगणांमध्यें चंद्र मी आहें.

**वेदानां सामवेदोऽस्मि देवानामस्मि वासवः**
**इंद्रियाणां मनश्चास्मि भूतानामस्मि चेतना २२**

(अहं) वेदानाम् सामवेदः अस्मि। देवानाम् वासवः अस्मि। च इंद्रियाणाम् मनः अस्मि। भूतानाम् चेतना अस्मि।

(तीन) वेदांमध्यें सामवेद मी आहें, (सर्व) देवांमध्यें इंद्र मी आहें, (सर्व) इंद्रियांमध्यें मन मी आहें व (सर्व) सचेतन पदार्थांतील चेतना मी आहें.

[ गीताकालीं **ऋग्वेद, यजुर्वेद** व **सामवेद** असे तीनच वेद मानण्यांत येत असत, असें गीतेंतील अनेक उल्लेखांवरून अनुमान होतें. हे तीन वेद म्हणजे एकाच वैदिक वाङ्मयाचे तीन भाग आहेत. ह्या वाङ्मयापैकीं, जे मंत्र नियमित चरणाचे म्हणजे छंदोबद्ध आहेत त्यांस ऋक् म्हणजे ऋचा अशी संज्ञा आहे त्यांपैकीं ज्या ऋचा विशिष्ट पद्धतीनें गावयाच्या असतात त्यांना **साम** अशी संज्ञा प्राप्त झाली. बाकीच्या यज्ञीय मंत्रांस 'यजु' अशी संज्ञा आहे. ( मीमांसासूत्र, अ० २, पान १, सूत्र ३५।३६।३७ ). सामवेद स्तुतिपर व गायनात्मक असल्यामुळें भगवद्भक्तांना तो प्रिय वाटणें साहजिकच आहे. एकाच वैदिक वाङ्मयाचे हे तिन्ही भाग असल्यामुळें त्यांत श्रेष्ठत्व कनिष्ठत्व मानण्याचें कारण नाहीं.]

**रुद्राणां शंकरश्चास्मि वित्तेशो यक्षरक्षसाम्**
**वसूनां पावकश्चास्मि मेरुः शिखरिणामहम्** २३

**रुद्राणाम् शंकरः, च यक्षरक्षसाम् वित्तेशः अस्मि। वसूनाम् पावकः, च शिखरिणाम् मेरुः अहम् अस्मि।**

(एकादश) रुद्रांमध्यें शंकर मी आहें. यक्षराक्षसांमध्यें कुबेर (धनपति) मी आहें. (अष्ट) वसूंमध्यें पावक नांवाचा (श्रेष्ठ) वसु मी आहें. पर्वतांमध्यें (उत्तरध्रुव बिंदूवर असलेला) मेरु पर्वत मी आहें.

**पुरोधसां च मुख्यं मां विद्धि पार्थ बृहस्पतिम्**
**सेनानीनामहं स्कंधः सरसामस्मि सागरः** २४

**पार्थ ! पुरोधसाम् मुख्यम् बृहस्पतिम् माम् विद्धि, च सेनानीनाम् स्कंदः, सरसाम् सागरः च अहम् अस्मि।**

अर्जुना ! पुरोहितवर्गांत (उपाध्यायांत) मुख्य बृहस्पति मी आहें. सेनानायकांत स्कंद (कार्तिकस्वामी म्हणजे देवांचा सेनापति) मी आहें. जलाशयांत समुद्र मी आहें.

**महर्षीणां भृगुरहं गिरामस्म्येकमक्षरम्**
**यज्ञानां जपयज्ञोऽस्मि स्थावराणां हिमालयः** २५

**महर्षीणां भृगुः, गिराम् एकम् अक्षरम् अहम् अस्मि । यज्ञानाम् जपयज्ञः, स्थावराणाम् हिमालयः अहम् अस्मि ।**

( सप्त ) महर्षींमध्यें भृगु मी आहें. शब्दांमध्यें एक अक्षर ॐ मी आहें यज्ञांमध्यें जपरूप यज्ञ मी आहें. अचल पदार्थांमध्यें हिमालय मी आहें.

**अश्वत्थः सर्ववृक्षाणां देवर्षीणां च नारदः**
**गंधर्वाणां चित्ररथः सिद्धानां कपिलो मुनिः** २६

**सर्ववृक्षाणाम् अश्वत्थः, देवर्षीणाम् नारदः, गंधर्वाणाम् चित्ररथः, सिद्धानाम् कपिलः मुनिः, च ( अहम् अस्मि ) ।**

सर्व वृक्षांमध्यें पिंपळ वृक्ष मी आहें. देवर्षींमध्यें नारद मी आहें. गंधर्वांमध्यें चित्ररथ गंधर्व मी आहें. सिद्ध म्हणजे जीवन्मुक्त ब्रह्मवेत्त्यांमध्यें कपिल ऋषि मी आहें.

**उच्चैःश्रवसमश्वानां विद्धिमाममृतोद्भवम्**
**ऐरावतं गजेंद्राणां नराणां च नराधिपम्** २७

**अश्वानाम् अमृतोद्भवम् उच्चैः श्रवसम् गजेंद्राणाम् ऐरावतम्, नराणाम् नराधिपम् च मां विद्धि ।**

अश्वांमध्यें ( क्षीरसागरांतून ) अमृतासह उत्पन्न झालेला उच्चैःश्रवा नांवाचा अश्व मी आहें. श्रेष्ठ हत्तींमध्यें ऐरावत मी आहें. मनुष्यांमध्यें प्रजापालक राजा मी आहें.

**आयुधानामहं वज्रं धेनूनामस्मि कामधुक्**
**प्रजनश्चास्मि कंदर्पः सर्पाणामस्मि वासुकिः** २८

**आयुधानाम् वज्रम्, धेनूनाम् कामधुक् अहम् आस्मि। प्रजनः कंदर्पः अस्मि। सर्पाणाम् वासुकिः च अस्मि ।**

शस्त्रांमध्यें वज्र नांवाचें [ इंद्राचें ] शस्त्र मी आहें. धेनूंमध्यें कामधेनु मी आहें. उत्पत्तीला कारण असलेला मदन मी आहें. सर्पांमध्यें वासुकीसर्प मी आहें.

**अनंतश्चास्मि नागानां वरुणो यादसामहम्**
**पितॄणामर्यमा चास्मि यमः संयमतामहम्** २९

**नागानाम् अनंतः, यादसाम् वरुणः च अहम् अस्मि। पितॄणाम् अर्यमा, संयमताम् यमः च अहम् अस्मि।**

नागजातीच्या सर्पांमध्यें शेष मी आहें. जलचरांमध्यें मुख्य जलदेवता वरुण मी आहें. पितॄगणांमध्यें अर्यमा नांवाचा पितॄराज मी आहें. निग्रह करणाऱ्यांत यमधर्म (प्राण्याचे प्राण हरण करणारा) मी आहें.

**प्रल्हादश्चास्मि दैत्यानां कालः कलयतामहम्**
**मृगाणां च मृगेंद्रोऽहं वैनतेयश्च पक्षिणाम्** ३०

**दैत्यानाम् प्रल्हादः, कलयताम् कालः च अहम् अस्मि। मृगाणाम् मृगेंद्रः, पक्षिणाम् वैनतेयः च अहम्।**

दैत्यांमध्यें महाभगवद्भक्त प्रल्हाद मी आहें. गणना करणाऱ्यांचा (गणनाविषय) काल मी आहें, पशूंमध्यें सिंह मी आहें व पक्ष्यांमध्यें गरुड मी आहें.

**पवनः पवतामस्मि रामः शस्त्रभृतामहम्**
**झषाणां मकरश्चास्मि स्रोतसामस्मि जान्हवी** ३१

**पवताम् पवनः, शस्त्रभृताम् रामः अहम् अस्मि। झषाणाम् मकरः अस्मि। स्रोतसाम् जान्हवी च अस्मि।**

पवित्र करणाऱ्या वस्तूंमध्यें वायु मी आहें. शस्त्र धारण करणाऱ्यांमध्यें राम (दाशरथी राम किंवा परशुराम) मी आहें. मत्स्यांमध्यें मकर (देवमासा) मी आहें. प्रवाहांमध्यें गंगाप्रवाह मी आहें.

**सर्गाणामादिरन्तश्च मध्यं चैवाहमर्जुन**
**अध्यात्मविद्या विद्यानां वादः प्रवदतामहम्** ३२

**अर्जुन ! सर्गाणाम् आदिः, मध्यम्, अंतः, च अहम् एव। विद्यानाम् अध्यात्मविद्या, प्रवदताम् वादः च अहम्।**

अर्जुना ! सृष्ट पदार्थांचा आदि, अंत व मध्यही मीच आहें. सर्व

विद्यांमध्यें अध्यात्मविद्या मी आहें. वक्त्यांचा (तत्त्वनिर्णयकारक) वाद म्हणजे चर्चा मी आहें.

**अक्षराणामकारोऽस्मि द्वंद्वः सामासिकस्य च**
**अहमेवाक्षयः कालो धाताहं विश्वतोमुखः ३३**

**अक्षराणाम् अकारः सामासिकस्य द्वंद्वः च अस्मि। अक्षयः कालः अहम् एव, विश्वतोमुखः धाता अहम्।**

वर्णमालेमध्यें 'अ' वर्ण मी आहें (अकाराच्या साह्यावांचून कोणत्याही वर्णाचा उच्चार करितां येत नाहीं.) सामासिक शब्दांमध्यें द्वंद्वसमास मी आहें, ( कारण द्वंद्वसमासांतील दोन्ही पदें प्रधान असतात ) अक्षय काल मीच आहें. व (जगाचें) धारणपोषण करणारा विश्वरूप (परमेश्वर) मीच आहें.

**मृत्युः सर्वहरश्चाहमुद्भवश्च भविष्यताम्**
**कीर्तिः श्रीर्वाक्च नारीणां स्मृतिर्मेधा धृतिः क्षमा ३४**

**सर्वहरः मृत्युः भविष्यताम् उद्भवः च नारीणाम् कीर्तिः, श्रीः, वाक्, स्मृतिः, मेधा धृतिः क्षमा च अहम्।**

सर्वांचा लय करणारा मृत्यु ( काळ ) मी आहें. पुढें होणाऱ्या पदार्थांचा उगमही मीच आहें. स्त्रियांमध्यें कीर्ति, श्री, वाणी, स्मृति, मेधा, धृति व क्षमा (इत्यादि दक्षकन्या व धर्मपत्न्या) किंवा कुलस्त्रियांमध्यें दिसून येणारे वरील सद्गुण मी आहें. (माझ्याच विभूति किंवा शक्ति आहेत.)

**बृहत्साम तथा साम्नां गायत्री छंदसामहम्**
**मासानां मार्गशीर्षोऽहमृतूनां कुसुमाकरः ३५**

**तथा साम्नाम् बृहत्साम, छंदसाम् गायत्री अहम्। मासानाम् मार्गशीर्षः, ऋतूनाम् कुसुमाकरः अहम्।**

सामसूक्तांत बृहत्साम नांवाचें सूक्त मी आहें. वैदिक छंदांमध्यें गायत्री छंद मी आहें. महिन्यांमध्यें मार्गशीर्ष महिना मी आहें व ऋतूंमध्यें वसंत ऋतु मी आहें.

[ व्यवहारांत ज्या मंत्राला गायत्री मंत्र म्हणतात त्या मंत्राचें देवतादर्शक नांव **'सावित्री मंत्र'** असें आहे. गायत्री हा त्या मंत्राचा छंद आहे. मार्गशीर्ष महिना व वसंत ऋतु ह्या पदांवरून गीताकालीं मार्गशीर्ष हा वर्षारंभ व मार्गशीर्ष पौष वसंतऋतु असावा असें दिसतें.]

**द्यूतं छलयतामस्मि तेजस्तेजस्विनामहम्**
**जयोऽस्मि व्यवसायोऽस्मि सत्त्वं सत्त्ववतामहम्** ३६

**छलयताम् द्यूतम्, तेजस्विनाम् तेजः अहम् अस्मि। जयः, व्यवसायः, अस्मि, सत्त्ववताम् सत्त्वम् अस्मि ।**

कपटाचरण करणाऱ्यांचा जुगार (कपटी लोकांचें सर्वस्व हरण करणारा) मी आहें. पाणीदार लोकांतील पाणीदारपणा मी आहें, (किंवा तेजस्वी वस्तूंमधील तेज मी आहें.) जय मी आहें, निश्चय मी आहें, व सात्त्विकांतील सत्त्वगुण मी आहें.

**वृष्णीनां वासुदेवोऽस्मि पांडवानां धनंजयः**
**मुनीनामप्यहं व्यासः कवीनामुशना कविः** ३७

**वृष्णीनाम् वासुदेवः, पांडवानाम् धनंजयः अहम् अस्मि । मुनीनाम् व्यासः, कवीनाम् उशना कविः अपि अहम् ।**

वृष्णिकुलामध्यें वासुदेव मी आहें. पांडवांमध्यें अर्जुन मी आहें. (स्थितप्रज्ञ तत्त्ववेत्या) मुनींमध्यें व्यास मी आहें. त्याचप्रमाणें चतुर पुरुषांमध्यें चतुर असा शुक्राचार्य मी आहें.

**दंडो दमयतामस्मि नीतिरस्मि जिगीषताम्**
**मौनं चैवास्मि गुह्यानां ज्ञानं ज्ञानवतामहम्** ३८

**दमयताम् दंडः अस्मि । जिगीषताम् नीतिः अस्मि । गुह्यानाम् मौनम्, ज्ञानवताम् ज्ञानम् च अहम् एव अस्मि ।**

बंदोबस्त ठेवणारांची शासनसत्ता (बंदोबस्त करण्याचें साधन) मी आहें. विजयेच्छु लोकांची नीति (मुत्सद्दीपणा) मी आहें. गुप्त गोष्टींचें गोपन (अपरिस्फोट) मी आहें आणि ज्ञानी पुरुषांचें ज्ञानही मीच आहें.

**यच्चापि सर्वभूतानां बीजं तदहमर्जुन**
**न तदस्ति विना यत्स्यान्मया भूतं चराचरम्** ३९

**अर्जुन ! अपि च, सर्वभूतानाम् यत् बीजम् तत् अहम् । मया विना यत् स्यात् तत् चराचरम् भूतम् न अस्ति ।**

अर्जुना ! सर्व पदार्थांचें जें बीज (मूळ कारण) असतें तेंही मीच होय. माझ्याशिवाय जी असूं शकेल अशी एकही वस्तु ह्या स्थावर-जंगम सृष्टींत नाहीं.

**नांतोऽस्ति मम दिव्यानां विभूतीनां परंतप**
**एष तूद्देशतः प्रोक्तो विभूतेर्विस्तरो मया ४०**

**परंतप ! एषः तु विभूतेः विस्तरः मया उद्देशतः प्रोक्तः । मम दिव्या - नाम् विभूतीनाम् अंतः न अस्ति ।**

अर्जुना ! हा माझा विभूतींचा विस्तार तुला उपलक्षणार्थ मीं सांगितला. माझ्या दिव्य विभूतींना अंतच नाहीं.

विभूति सांगून संपणार नाहींत म्हणून, आपल्या विभूति ओळखण्याच्या सामान्य खुणा भगवान् सांगतातः—

**यद्यद्विभूतिमत्सत्त्वं श्रीमदूर्जितमेव वा**
**तत्तदेवावगच्छ त्वं मम तेजोंऽशसंभवम् ४१**

**यत् यत् विभूतिमत्, श्रीमत् वा ऊर्जितम् एव सत्त्वम् तत् तत् मम तेजोंऽशसंभवमेव त्वम् अवगच्छ ।**

जो जो पदार्थ ऐश्वर्यवान्, प्रकाशमान् किंवा तेजस्वी असेल, तो तो माझ्या (परमेश्वराच्या) तेजाच्या (शक्तीच्या) अंशापासून उत्पन्न झाला आहे असें समज.

**अथवा बहुनैतेन किं ज्ञातेन तवार्जुन**
**विष्टभ्याहमिदं कृत्स्नमेकांशेन स्थितो जगत् ४२**

**अथवा, अर्जुन ! एतेन बहुना ज्ञातेन तव किम् ? अहम् इदम् कृत्स्नम् जगत् एकांशेन विष्टभ्य स्थितः ।**

अथवा अर्जुना ! ह्या पुष्कळ गोष्टी ध्यानांत ठेवून काय करावयाच्या ? मी हें संपूर्ण विश्व (आपल्या) एका अंशानें व्यापून व धारण करून राहिलों आहें.

[ परमेश्वराच्या एका अंशमात्रानेंच सर्व ब्रह्मांडें व्यापून गेलीं आहेत.]

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे 'विभूतियोगो नाम' दशमोऽध्यायः ।**

यांप्रमाणें श्रीभगवंतांनीं गाइलेल्या उपनिषदांतील ब्रह्मविद्यांतर्गत कर्मयोग-शास्त्राविषयींच्या श्रीकृष्ण व अर्जुन ह्यांच्या संवादांतलि **'विभूति प्रकरण'** नांवाचा दहावा अध्याय समाप्त झाला.

---

# रहस्यदीपिकेच्या दहाव्या अध्यायाचा उपसंहार

## दहाव्या अध्यायाची विषयानुक्रमणिका



परमेश्वराचा अविर्भाव (व्यक्त होणें) कोणालाही कळणें शक्य नाहीं. तथापि त्यामुळें परमेश्वराचें यथार्थ ज्ञान होण्यास प्रतिबंध होत नाहीं. परमेश्वर अज, अनादि व सर्व विश्वाचा प्रभु आहे असें ज्ञान ज्याला होतें, तो सर्व पातकांतून मुक्त होतो. परमेश्वराचें सर्वलोकमहेश्वरत्व पटण्याला कोण-कोणत्या वस्तूंमध्यें ईश्वरीशक्ति विशेष प्रगट असते, हें कळणें अवश्य आहे, म्हणून भगवंतांनीं प्रथम ईश्वरी सामर्थ्यद्योतक बुद्धि, ज्ञान इत्यादि धर्मांचा उल्लेख

श्लोक ४।५ यांत करून ६ व्या श्लोकांत परमेश्वराच्या आद्य विभूति सांगितल्या आहेत. नंतर ७ व्या श्लोकांत दैवीशक्ति व ती ओळखण्याची साधनें ह्या दोहोंचें-ही ज्याला यथार्थ ज्ञान होतें त्याचीच बुद्धि स्थिर होते असें सांगितलें आहे. पुढें ८।९ श्लोकांत ज्ञानी व ज्ञानयुक्त भक्तियोगाचें वर्णन करून १०।११ श्लोकांत भक्तियोगानें ईश्वरकृपा होऊन उपासकाला बुद्धियोग व भगवत्साक्षात्कार क्रमानें प्राप्त होऊन तो कृतार्थ होतो, असें प्रतिपादन केलें आहे. याप्रमाणें भगवंतांनीं सांगितलेलें ज्ञानविज्ञान प्राचीन महर्षींनींही प्रतिपादन केलें आहे असें अर्जुनास दिसून आल्यावरून, श्रीकृष्णभगवान् हे परब्रह्मस्वरूप साक्षात् परमेश्वर आहेत, अशी अर्जुनाची खात्री झाली व भगवंतांच्या सर्व उपदेशाचें सत्यत्व त्याच्या अंतःकरणाला पटलें. अशा परब्रह्म स्वरूप परमेश्वराच्या सर्व विभूति व त्या ओळखण्याचें साधन आपल्याला कळावें ह्या इच्छेनें सर्व विभूति सांगण्याविषयीं अर्जुनानें भगवंतास विनंति केली आहे. ( श्लोक १२ ते १८ अखेर ) अर्जुनाची विनंति भगवंतांनीं मान्य केली; परंतु त्याच्या इच्छेप्रमाणें परमेश्वराच्या सर्व विभूति सांगतां येणें शक्य नव्हतें. कारण भगवत्स्वरूपाच्या विस्तारास अंत नाहीं, म्हणून भगवंतांनीं त्याला मुख्य मुख्य विभूति सांगण्यास आरंभ केला. त्यांत प्रथम परमेश्वर आत्मरूपानें सर्व भूतांच्या अंतर्यामीं भरलेला असून, सर्व विश्वाचा आदि, मध्य व अंत तोच आहे असें २० व्या श्लोकांत सांगून, तेथून श्लोक २१ ते ३९ अखेर प्रधान विभूति सांगितल्या आहेत. त्यांत देव, पितर, दैत्य आकाशस्थ ज्योति, पृथ्वीवरील जलाशय, स्थावर पदार्थ, वनस्पति, मानवी प्राणी, ( ऋषि, सिद्ध, इ० ) पशुपक्षी, जलचर, सर्प, इंद्रियें, मनोधर्म, विद्या, वेद, सद्गुण इत्यादि सर्व चराचर सृष्टींतील स्थूलसूक्ष्म वस्तूंचा उल्लेख केला आहे व शेवटीं ४१।४२ श्लोकांत, जेथें जेथें हें ऐश्वर्य, शोभा व तेजस्विता इत्यादि उच्च धर्म असतात, तेथें तेथें ईश्वरी अंश उद्भूत आहे असें समजावें, तथापि एवढ्यानें ईश्वराचें स्वरूप पूर्ण होत नसून सर्व विश्व म्हणजे ईश्वराचा एक अंशमात्र आहे, असा परमेश्वर अनंत आहे असें सांगून अध्यायाची परिसमाप्ति केली आहे.

सारांश, स्थूल, सूक्ष्म सृष्टींतील भिन्न भिन्न वस्तूंमध्यें दिसून येणाऱ्या अनेक शक्ति स्वतंत्र नसून, त्या सर्व शक्तींचें केंद्र किंवा उगमस्थान एका सच्चिदानंद परमात्मतत्त्वांतच आहे. म्हणजे निरनिराळ्या वस्तूंमध्यें विद्यमान असलेली शक्ति हा त्या एका परमेश्वरी शक्तीचाच अंश होय; अर्थात् ह्या सर्व दैवीशक्तींचें एकच

अधिष्ठान जो परमेश्वर तोच आधिदैव होय. यावरून इंद्र-वरुणादि वैदिक देवता व त्यांचे अनेक अवतार, ह्या सर्व स्वतंत्र देवता नसून निरनिराळ्या काली भिन्न भिन्न परिस्थितींत प्रगट झालेले एकाच ईश्वराचे अंश होत असें सिद्ध होतें. त्याचप्रमाणें प्राचीन योगसामर्थ्य किंवा अर्वाचीन इच्छाशक्ति (मेस्मेरिझम्, हिप्नॉटिझम् स्पिरिच्युआलिझम् इत्यादि) ही देखील स्वतंत्र शक्ति नसून, त्या एकाच परमेश्वरीशक्तीचा अल्पांश आहे हें उघड आहे. ह्या आधिदैविक तत्त्वांचे यथार्थ ज्ञान झाल्यावर, अमुक देवता वरिष्ठ व इतर देवता कनिष्ठ ही कल्पनाच उरत नाहीं. तसेंच उपास्य देवताविषयक आक्षेपही उत्पन्न होण्याचें कारण नाहीं. यावरून पदार्थमात्राच्या अन्तर्यामी असणाऱ्या शक्तीचें व निरनिराळया देवतांचें तात्त्विक ज्ञान म्हणजेच **अधिदैवशास्त्र** होय. हें शास्त्रीय ज्ञान मनुष्याचा विकास पूर्ण होण्यास अत्यंत आवश्यक आहे असें ठरतें.



# एकादशोऽध्यायः ।



आठव्या अध्यायाच्या प्रारंभीं अर्जुनानें सात प्रश्न विचारले आहेत. त्यांच्या उत्तरांच्या विवरणापैकीं प्रयाणकालीन **'ईशस्मरण' 'अधियज्ञ'** व **'अधिदैव'** ह्या तिन्हींचें विस्तृत विवरण अनुक्रमें ८।९।१० ह्या अध्यायांत केल्यावर, आतां **'अधिभूत'** म्हणजे **'क्षरोभाव'** (नाशवंत किंवा रूपांतर पावणारा पदार्थ) असा अर्थ भगवंतांनीं संक्षेपानें सांगितला आहे. ( हा विषय ७ व्या अध्यायाच्या बारा ते पंधरा श्लोकांत आला आहे ) त्यावरून अधिभूतांत नामरूपात्मक सर्व व्यक्त सृष्टीचा अंतर्भाव होतो हें उघड आहे. पूर्वी **अधियज्ञ** व **अधिदैव** हें परमेश्वराचें स्वरूप आहे असेंही भगवंतांनीं सांगितलें आहे. यावरून नामरूपात्मक सृष्टि हें परमेश्वराचें व्यक्त स्वरूप होय. व भगवत्कृपा होईल तर, परमेश्वराचें हें व्यक्त स्वरूप ( विश्वरूप ) आपल्याला दृग्गोचर होणें शक्य आहे, असें वाटून अर्जुनानें परमेश्वराच्या व्यक्त स्वरूपाचें आपल्याला प्रत्यक्ष दर्शन व्हावें; म्हणजे, भगवत्-स्वरूपाचा साक्षात्कार व्हावा, अशा उत्कट इच्छेनें भगवंताला विश्वरूप दाखविण्याविषयीं प्रार्थना केली आहे. व भक्तवत्सल परमात्म्यानें आपल्या प्रिय भक्ताला विश्वरूपाचें दर्शन देऊन, परमात्मा साधिभूत कसा आहे, हें प्रत्यक्षप्रमाणानें सिद्ध करून दाखविलें आहे. ह्याप्रमाणें, **'अधिभूत'** सिद्ध करण्याकरितां **'विश्वरूपदर्शन'** हाच ह्या अध्यायाचा प्रतिपाद्य विषय आहे.

अध्याय ८।९।१० यांत भगवंतांनीं सांगितलेलें ज्ञानविज्ञान आपणांस बरोबर पटलें असून, त्यामुळें आपला शोक व मोह नष्ट झाला आहे, व तेणेंकरून भगवंतांच्या विश्वरूपदर्शनाची आपल्याला अत्यंत उत्कंठा लागली आहे असें सुचविण्याकरितां अर्जुन म्हणतोः—

**मदनुग्रहाय परमं गुह्यमध्यात्मसंज्ञितम्**
**यत्त्वयोक्तं वचस्तेन मोहोऽयं विगतो मम** १

**मदनुग्रहाय यत् परमम् गुह्यम् अध्यात्मःसंज्ञितम् वचः त्वया उक्तम् तेन मम अयम् मोहः विगतः ।**

अर्जुन म्हणाला—(हे भगवंता) माझ्यावर अनुग्रह करण्याकरितां

तूं जें अत्यंत गुह्य, अध्यात्मसंज्ञक प्रवचन सांगितलेंस तेणेंकरून माझा हा (कर्माकर्मांविषयींचा) गैरसमज दूर झाला.

[ अ० ४, श्लोक ३५ यांत भगवंतांनीं ज्ञानाचें जें फल सांगितलें आहे, त्याचा आपणास पूर्ण प्रत्यय आला, म्हणजे ह्या ज्ञानानें आपला कर्माकर्मांविषयींचा मोह नष्ट झाला असा अर्जुनानें येथें आपला अनुभव स्पष्ट सांगितला आहे.]

असा अनुभव येण्याचें कारण अर्जुन सांगतोः —

**भवाप्ययौ हि भूतानां श्रुतौ विस्तरशो मया**
**त्वत्तः कमलपत्राक्ष माहात्म्यमपि चाव्ययम्** २

**हि, कमलपत्राक्ष ! त्वत्तः भूतानाम् भवाप्ययौ मया विस्तरशः श्रुतौ, च अव्ययम् माहात्म्यम् अपि ( श्रुतम् ) ।**

कारण, कमलदलाप्रमाणें आहेत नेत्र ज्याचे, (अशा श्रीकृष्णा!) तुझ्या मुखांतून सृष्टीची उत्पत्ति (स्थिति) व लय, आणि अविनाशी ईश्वरीसामर्थ्यही मीं सविस्तर ऐकलें. (मला समजलें.)

**एवमेतद्यथात्थ त्वमात्मानं परमेश्वर**
**द्रष्टुमिच्छामि ते रूपमैश्वरं पुरुषोत्तम** ३

**परमेश्वर ! यथा त्वम् आत्मानम् आत्थ एवम् एतत् । पुरुषोत्तम ! ते ऐश्वरम् रूपम् द्रष्टुम् इच्छामि ।**

त्या अर्थीं, हे परमेश्वरा ! पुरुषोत्तमा ! तुम्हीं आपल्याला जसें वर्णिलें (आपलें जें वर्णन सांगितलें) तसेंच तें आहे. (तें मला पटलें आहे) म्हणून, तुमचें परमेश्वरी स्वरूप (व्यापक विश्वरूप) मी पाहूं इच्छितों. (मला विश्वरूपाचें दर्शन व्हावें अशी इच्छा आहे.)

**मन्यसे यदि तच्छक्यं मया द्रष्टुमिति प्रभो**
**योगेश्वर ततो मे त्वं दर्शयात्मानमव्ययम्** ४

**प्रभो! योगेश्वर! यदि मया तत् द्रष्टुम् शक्यम् इति मन्यसे, ततः त्वम् अव्ययम् आत्मानम् मे दर्शय ।**

हे प्रभो योगेश्वरा ! जर तें (ईश्वरी स्वरूप) माझ्या दृष्टीस पडणें

तुम्हांला शक्य वाटत असेल, तर तुम्ही आपलें तें अविनाशी स्वरूप मला दाखवा. (मला त्या स्वरूपानें दर्शन द्यावें.)

ह्याप्रमाणें अर्जुनाची उत्कंठायुक्त प्रार्थना ऐकून भगवान् त्याला विश्वरूप दाखविण्यास तयार होऊन म्हणाले.:—

**श्रीभगवानुवाच**

**पश्य मे पार्थ रूपाणि शतशोऽथ सहस्रशः**
**नानाविधानि दिव्यानि नानावर्णाकृतीनि च** ५

**पार्थ ! मे नानाविधानि च नानावर्णाकृतीनि दिव्यानि शतशः अथ सहस्रशः रूपाणि पश्य ।**

श्रीभगवान् म्हणाले—अर्जुना ! माझीं अनेक प्रकारचीं, अनेक रंगांचीं व अनेक आकारांचीं शेकडों किंवा हजारों (असंख्य) दिव्य स्वरूपें पाहा.

**पश्यादित्यान्वसून्रुद्रानश्विनौ मरुतस्तथा**
**बहून्यदृष्टपूर्वाणि पश्याऽऽश्चर्याणि भारत** ६

**आदित्यान्, वसून्, रुद्रान्, अश्विनौ, मरुतः पश्य । भारत! तथा आश्चर्याणि, अदृष्टपूर्वाणि बहूनि पश्य ।**

अदितिपुत्र (इंद्रादि देव), आठ वसु, (अकरा) रुद्र, (दोन) अश्विनीकुमार, (एकुणपन्नास) मरुत्संज्ञक देव, पहा. अर्जुना, आजपर्यंत न दिसलेलीं, आश्चर्यकारक अशीं आणखी पुष्कळ (रूपें) पहा.

**इहैकस्थं जगत्कृत्स्नं पश्याद्य सचराचरम्**
**मम देहे गुडाकेश यच्चान्यद्द्रष्टुमिच्छसि** ७

**गुडाकेश! इह मम देहे सचराचरं कृत्स्नं जगत् अद्य एकस्थम् पश्य। अन्यत् च यत् द्रष्टुम् इच्छसि ।**

अर्जुना ! येथें ह्या माझ्या (विश्वरूप) देहामध्यें स्थावर-जंगमासह संपूर्ण जग आज (आतां) एकत्र झालेलें, आणि दुसरें जें तुला पहावयाची इच्छा असेल तें पहा.

[ तुला पहावयाचें असेल तें सर्व ह्या एकाच आधिभौतिक सृष्टिरूप विराट-

स्वरूपांत म्हणजे विश्वरूप देहांत दिसून येईल असें भगवंतांनीं येथें विधान केलें आहे.]

**न तु मां शक्यसे द्रष्टुमनेनैव स्वचक्षुषा**
**दिव्यं ददामि ते चक्षुः पश्य मे योगमैश्वरम्** ८

अनेन एव तु स्वचक्षुषा माम् द्रष्टुम् न शक्यसे। ते दिव्यम् चक्षुः ददामि। मे ऐश्वरम् योगम् पश्य।

परंतु, ह्याच डोळ्यानें (चर्मचक्षूनें) तूं मला पाहूं शकणार नाहींस. (म्हणून) मी तुला दिव्यदृष्टि देतों. (मग) माझें ईश्वरी सामर्थ्य पहा.

[संपूर्ण विश्वरूप एकाच देहस्वरूपानें दिसण्याची शक्ति सामान्य चर्मचक्षूंमध्यें नसल्यामुळें ती दिव्य शक्ति भगवंतांनीं अर्जुनाच्या दृष्टींत उत्पन्न केली.]

**संजय उवाच।**

**एवमुक्त्वा ततो राजन्महायोगेश्वरो हरिः**
**दर्शयामास पार्थाय परमं रूपमैश्वरम्** ९

राजन्! महायोगेश्वरः हरिः एवम् उक्त्वा, ततः पार्थाय परमम् ऐश्वरम् रूपम् दर्शयामास।

संजय म्हणाला—हे राजा! (धृतराष्ट्रा) सर्व दैवीशक्तीचा प्रभु भगवान् श्रीकृष्ण ह्याप्रमाणें बोलून, नंतर अर्जुनाला आपलें श्रेष्ठ ईश्वरी स्वरूप दाखविता झाला.

**अनेकवक्त्रनयनमनेकाद्भुतदर्शनम्॥**
**अनेकदिव्याभरणं दिव्यानेकोद्यतायुधम्** १०
**दिव्यमाल्याम्बरधरं दिव्यगंधानुलेपनम्॥**
**सर्वाश्चर्यमयं देवमनंतं विश्वतोमुखम्** ११

अनेकवक्त्रनयनम्, अनेकाद्भुतदर्शनम्; अनेकदिव्याभरणम् दिव्यानेकोद्यतायुधम्, दिव्यमाल्यांबरधरम्, दिव्यगंधानुलेपनम्, सर्वाश्चर्यमयम् विश्वतोमुखम्, अनंतम् देवम् (सः अपश्यत्)।

ज्याला असंख्य मुखें व डोळे आहेत, ज्यामध्यें अनेक आश्चर्योत्पादक गोष्टी दिसत आहेत, ज्यावर असंख्य दिव्य अलंकार आहेत (ज्याच्या हातांत) अनेक दिव्य शस्त्रास्त्रें सज्ज आहेत, ज्यानें दिव्य

पुष्पहार व दिव्य वस्त्रें धारण केलीं आहेत, ज्यानें दिव्य सुवासिक उटी लाविली आहे, अशा सर्व आश्चर्यांनीं भरलेल्या अनंत, सर्व-व्यापक परमेश्वराला (अर्जुन पाहाता झाला).

**दिवि सूर्यसहस्रस्य भवेद्युगपदुत्थिता ॥**
**यदि भाः सदृशी सा स्याद्भासस्तस्य महात्मनः १२**

दिवि सूर्यसहस्रस्य भाः यदि युगपत् उत्थिता भवेत्, । सा तस्य महात्मनः भासः सदृशी स्यात् ।

आकाशांत हजारों सूर्यांची प्रभा जर एकदम प्रगट होईल तर ती त्या परमेश्वराच्या प्रभेसारखी होईल.

[ अर्जुनानें हें विश्वरूप पाहिलें त्याचें तेज हजारों सूर्यांच्या तेजासारखें होतें. ]

**तत्रैकस्थं जगत्कृत्स्नं प्रविभक्तमनेकधा**
**अपश्यद्देवदेवस्य शरीरे पांडवस्तदा १३**

तदा पांडवः, देवदेवस्य शरीरे, अनेकधा प्रविभक्तम् कृत्स्नम् जगत् एकस्थम् अपश्यत् ।

तेव्हां अर्जुन देवाधिदेवाच्या त्या (विश्वरूप) शरीरामध्यें, हें अनेक भागांत विभागलेलें संपूर्ण जगत् एकत्र झालेलें पाहता झाला.

[ अनेक निरनिराळ्या भुवनांचा मिळून एकच विराट देह अर्जुनाला दिसूं लागला. ]

**ततः स विस्मयाऽविष्टो हृष्टरोमा धनंजयः ॥**
**प्रणम्य शिरसा देवं कृतांजलिरभाषत १४**

ततः विस्मयाऽविष्टः हृष्टरोमा सः धनंजयः देवम् शिरसा प्रणम्य कृतांजलिः अभाषत ।

नंतर आश्चर्यचकित व रोमांचित झालेला तो अर्जुन त्या परमेश्वरापुढें मस्तक नम्र करून हात जोडून म्हणाला—

**अर्जुन उवाच ।**

**पश्यामि देवांस्तव देव देहे सर्वांस्तथा भूतविशेष-**
**संघान् ॥ ब्रह्माणमीशं कमलासनस्थं ऋषींश्च सर्वा-**
**नुरगांश्च दिव्यान् १५**

**देव, तव देहे सर्वान् देवान् तथा भूतविशेषसंघान्, कमलासनस्थम्**
**ईशम् ब्रह्माणम् सर्वान् ऋषीन्, दिव्यान्, उरगान् च पश्यामि ।**

अर्जुन म्हणाला, 'हे परमेश्वरा, तुझ्या ( विराट ) देहामध्यें सर्व देव त्याचप्रमाणें निरनिराळ्या सृष्ट पदार्थांचे समुदाय, कमलासनावर बसलेला (सर्व सृष्टीचा) प्रभु हिरण्यगर्भ, सर्व ऋषि व देवलोकांतील सर्प हे मी पहात आहें.

**अनेकबाहूदरवक्त्रनेत्रं पश्यामि त्वां सर्वतोऽ**
**नंतरूपम् ॥ नांतं न मध्यं न पुनस्तवादिं पश्यामि**
**विश्वेश्वर विश्वरूप १६**

**विश्वरूप, विश्वेश्वर, अनेकबाहूदरवक्त्रनेत्रम्, सर्वतः अनंतरूपम्**
**त्वां पश्यामि । तव अंतम् न, मध्यम् न, पुनः आदिम् न पश्यामि ।**

हे विश्वरूप जगदीश्वरा, ज्याला बाहु, उदर, तोंडें व नेत्र असंख्य आहेत, आणि ज्याचीं चोहोंकडे अनंत रूपें आहेत, असा तूं मला दिसत आहेस. तुझा शेवटही दिसेना, मध्यही दिसेना व आरंभही दिसेना.

[ जिकडे तिकडे सर्वच आकृति व अवयव भरलेले दिसत असल्यामुळें, ह्या विराट स्वरूपाचा आरंभ कोणता मध्यभाग कोणता व शेवट कोणता, हें अर्जुनाला कळेनासें झालें.]

**किरीटिनं गदिनं चक्रिणं च**
**तेजोराशिं सर्वतो दीप्तिमंतम् ॥**
**पश्यामि त्वां दुर्निरीक्ष्यं**
**समंताद्दीप्तानलार्कद्युतिमप्रमेयम् १७**

**किरीटिनम्, गदिनम्, चक्रिनम्, सर्वतः दीप्तिमंतम्, तेजोराशिम्**
**समंतात् दीप्तानलार्कद्युतिम्, दुर्निरीक्ष्यम् च अप्रमेयम् त्वाम् पश्यामि ।**

तूं किरीट, गदा व (सुदर्शन) चक्र धारण करणारा, सर्व बाजूंनीं प्रकाशमान तेजाचा निधि, चोहोंकडे प्रज्वलित असलेला अग्नि व सूर्य यांच्या सारखी कांति आहे ज्याची, (म्हणून) ज्याच्याकडे पाहवत नाहीं असा, अमर्याद दिसत आहेस.

त्वमक्षरं परमं वेदितव्यं
त्वमस्य विश्वस्य परं निधानम्
त्वमव्ययः शाश्वतधर्मगोप्ता
सनातनस्त्वं पुरुषो मतो मे १८

वेदितव्यम् परमम् अक्षरम् त्वम्। अस्य विश्वस्य परम् निधानम् त्वम्। अव्ययः शाश्वतधर्मगोप्ता त्वम्। सनातनः पुरुषः त्वम् मे मतः।

ज्ञेय असें श्रेष्ठ अविनाशी ब्रह्मतत्त्व तूं आहेस; तूंच ह्या विश्वाचें मूल आश्रयस्थान आहेस, तूं अविनाशी असून सनातन धर्माचा संरक्षक आहेस आणि अनादि पुराणपुरुष तूंच आहेस, अशी माझी खात्री झाली.

अनादिमध्यांतमनंतवीर्य-
मनंतबाहुं शशिसूर्यनेत्रम्
पश्यामि त्वां दीप्तहुताशवक्त्रं
स्वतेजसा विश्वमिदं तपंतम् १९

त्वाम् अनादिमध्यांतम्, अनंतवीर्यम्, अनंतबाहुम्, शशिसूर्यनेत्रम् दीप्तहुताशवक्त्रम्, स्वतेजसा इदम् विश्वम् तपंतम् पश्यामि।

तूं आदिमध्यावसानरहित, अनंतशक्ति, असंख्य आहेत बाहू ज्याला असा, चंद्रसूर्य ज्याच्या नेत्रस्थानीं आहेत असा, प्रज्वलित अग्नि ज्याच्या मुखाच्या स्थानीं आहे असा, व आपल्या तेजानें हें विश्व प्रकाशित करणारा असा दिसत आहेस.

द्यावापृथिव्योरिदमंतरं हि
व्याप्तं त्वयैकेन दिशश्च सर्वाः
दृष्ट्वाऽद्भुतं रूपमुग्रं तवेदं
लोकत्रयं प्रव्यथितं महात्मन् २०

महात्मन्! हि त्वया एकेन द्यावापृथिव्योः इदम् अंतरम् व्याप्तम्। सर्वाः दिशः च (व्याप्ताः)। तव इदम् अद्भुतम् उग्ररूपम् दृष्ट्वा, लोकत्रयम् प्रव्यथितम्।

हे परमेश्वरा ! पृथ्वी व आकाश यांच्यामधील हा सर्व अवकाश व सर्व दिशा तूं एकट्यानेंच व्यापून टाकिल्या आहेस, म्हणून तुझें हें आश्चर्यकारक व उग्र रूप पाहून, त्रैलोक्य भयभीत झालें आहे.

**अमी हि त्वाऽसुरसंघा विशंति**
**केचिद्भीताः प्रांजलयो गृणंति**
**स्वस्तीत्युक्त्वा महर्षिसिद्धसंघाः**
**स्तुवंति त्वां स्तुतिभिः पुष्कलाभिः २१**

हि, अमी, असुरसंघाः त्वा विशंति । केचित् भीताः प्रांजलयः 'स्वस्ति' इति उक्त्वा गृणंति । महर्षिसिद्धसंघाः पुष्कलाभिः स्तुतिभिः त्वाम् स्तुवंति ।

कारण हे असुरांचे समुदाय तुझ्यामध्येंच प्रवेश करीत (लय पावत) आहेत. कोणी भयभीत होऊन हात जोडून (आमचें कल्याण कर असें म्हणून तुझी) प्रार्थना करीत आहेत, व मोठमोठे ऋषि व सिद्ध यांचे समुदाय अनेक स्तोत्रांनीं तुझी स्तुति करीत आहेत.

**रुद्रादित्या वसवो ये च साध्या**
**विश्वेऽश्विनौ मरुतश्चोष्मपाश्च**
**गंधर्वयक्षासुरसिद्धसंघा**
**वीक्षंते त्वां विस्मिताश्चैव सर्वे २२**

रुद्रादित्याः, वसवः च ये साध्याः विश्वे, अश्विनौ, मरुतः च, उष्मपाः, च गंधर्वयक्षासुरसिद्धसंघाः च, सर्वे विस्मिताः एव त्वाम् वीक्षंते ।

रुद्र[११], आदित्य[१२], वसु[८], त्याचप्रमाणें साध्य, विश्वेदेव, अश्विनीकुमार, मरुद्गण, आणि पितर, गंधर्व, यक्ष, असुर, सिद्ध यांचे समुदाय हे सर्व विस्मित होऊन तुजकडे पाहात आहेत.

**रूपं महत्ते बहुवक्त्रनेत्रं**
**महाबाहो बहुबाहूरुपादम्**
**बहूदरं बहुदंष्ट्राकरालं**
**दृष्ट्वा लोकाः प्रव्यथितास्तथाऽहम् २३**

**महाबाहो ! बहुवक्त्रनेत्रम्, बहुबाहूरुपादम्, बहूदरम् बहूदंष्ट्राकरालम् ते महत् रूपम् दृष्ट्वा अहम् तथा लोकाः प्रव्यथिताः ।**

हे महाबाहो ! (परमेश्वरा) ज्याला अनेक मुखें व नेत्र आहेत, ज्याला पुष्कळ हात, अनेक मांड्या व असंख्य पाय आहेत, ज्याला अनंत उदरें आहेत, व जें अनेक दाढांच्या योगानें विक्राळ दिसत आहे, असें तुझें विराट स्वरूप पाहून मी व त्याचप्रमाणें सर्व लोक भयभीत झाले आहेत.

**नभस्पृशं दीप्तमनेकवर्णं**
**व्यात्ताननं दीप्तविशालनेत्रम्**
**दृष्ट्वा हि त्वां प्रव्यथितांतरात्मा**
**धृतिं न विंदामि शमं च विष्णो** २४

**हे विष्णो ! नभस्पृशम्, दीप्तम्, अनेकवर्णम् व्यात्ताननम्, दीप्तविशालनेत्रम् त्वाम् दृष्ट्वा प्रव्यथितांतरात्मा (अहम्) धृतिम् शमम् च न विंदामि ।**

हे महाविष्णो ! गगनचुंबित, दैदीप्यमान, अनेक वर्णांनीं युक्त ज्याचीं अनेक वदनें विवृत आहेत, ज्याचे नेत्र तेजस्वी व विशाल आहेत, अशा तुला पाहून, त्यामुळें भयभीत झालें आहे अंतःकरण ज्याचें अशा मला धैर्य व शांति नाहीं (मी अत्यंत घाबरून गेलों आहें.)

**दंष्ट्राकरालानि च ते मुखानि**
**दृष्ट्वैव कालानलसंनिभानि**
**दिशो न जाने न लभे च शर्म**
**प्रसीद देवेश जगन्निवास** २५

**जगन्निवास ! देवेश ! ते दंष्ट्राकरालानि कालानलसन्निभानि मुखानि दृष्ट्वा एव, दिशः न जाने, शर्म न लभे च, प्रसीद ।**

हे जगन्निवासा ! देवाधिदेवा ! तुझीं दाढांनीं विक्राळ दिसणारीं प्रळयकाळच्या अग्नीसारखीं (असंख्य) मुखें पाहूनच मला दिशा

कळेनाशा झाल्या (मी दिङ्मूढ झालों) व मला सुख नाहींसें झालें आहे (मी अस्वस्थ झालों आहें म्हणून) प्रसन्न व्हा (शांत व्हा).

**अमी च त्वां धृतराष्ट्रस्य पुत्राः**
**सर्वे सहैवावनिपालसंघैः**
**भीष्मो द्रोणःसूतपुत्रस्तथाऽसौ**
**सहास्मदीयैरपि योधमुख्यैः** २६
**वक्त्राणि ते त्वरमाणा विशंति**
**दंष्ट्राकरालानि भयानकानि**
**केचिद्विलग्ना दशनांतरेषु**
**संदृश्यंते चूर्णितैरुत्तमांगैः** २७

अमी धृतराष्ट्रस्य सर्वे पुत्राः, अवनिपालसंघैः सह एव च भीष्मः द्रोणः, तथा असौ सूतपुत्रः, अस्मदीयैः योधमुख्यैः अपि सह, त्वरमाणाः ते दंष्ट्राकरालानि भयानकानि वक्त्राणि विशंति। केचित् दशनांतरेषु विलग्नाः, चूर्णितैः उत्तमांगैः (उपलक्षिताः) संदृश्यंते।

हे धृतराष्ट्राचे सर्व पुत्र राजांच्या समूहासहवर्तमान त्याचप्रमाणें भीष्म, द्रोण व हा सूतपुत्र (कर्ण), आमच्याकडील प्रमुख योध्यांसहवर्तमान, हे सगळेच मोठ्या त्वरेनें, तुमच्या अनेक दाढांनीं विक्राळ दिसणाऱ्या व भयंकर अशा दिसणाऱ्या मुखांमध्यें (आपण होऊन) प्रवेश करीत आहेत. त्यांपैकीं तुमच्या दांतांच्या फटींतून अडकलेल्या कित्येकांचीं डोकीं चिरडलेलीं दिसत आहेत.

**यथा नदीनां बहवोऽम्बुवेगाः**
**समुद्रमेवाभिमुखा द्रवंति**
**तथा तवाऽमी नरलोकवीरा**
**विशंति वक्त्राण्यभिविज्वलंति** २८

यथा नदीनाम् बहवः अंबुवेगाः समुद्रम् अभिमुखाः एव द्रवंति। तथा अमी नरलोकवीराः तव अभिविज्वलंति वक्त्राणि विशंति।

ज्याप्रमाणें नद्यांचे अनेक वेगवान् प्रवाह समुद्राकडेच धावत

जातात (वाहतात) त्याप्रमाणें हे महापराक्रमी पुरुष तुझ्या प्रज्वलित मुखांमध्यें प्रवेश करीत आहेत.

**यथा प्रदीप्तं ज्वलनं पतंगा**
**विशंति नाशाय समृद्धवेगाः**
**तथैव नाशाय विशंति लोका-**
**स्तवापि वक्त्राणि समृद्धवेगाः**　　२९

यथा पतंगाः समृद्धवेगाः प्रदीप्तम् ज्वलनम् नाशाय तथा एव लोकाः अपि समृद्धवेगाः तव वक्त्राणि नाशाय विशंति ।

ज्याप्रमाणें पतंग मोठ्या वेगानें प्रज्वलित अग्नीमध्यें नाश पावण्याकरितांच पडत असतात त्याप्रमाणेंच (हे सर्व) लोक देखील स्वतःचा नाश करून घेण्याकरितां तुझ्या मुखांत शिरत आहेत.

**लेलिह्यसे ग्रसमानः समंता-**
**ल्लोकान्समग्रान्वदनैर्ज्वलद्भिः**
**तेजोभिरापूर्य जगत्समग्रं**
**भासस्तवोग्राः प्रतपंति विष्णो**　　३०

विष्णो ! ज्वलद्भिः वदनैः, समग्रान् लोकान् ग्रसमानः समंतात् लेलिह्यसे । तव उग्राः भासः तेजोभिः समग्रम् जगत् आपूर्य प्रतपंति ।

हे (महा) विष्णो ! आपल्या प्रज्वलित मुखांनीं सर्व लोकांना गिळण्यास उद्युक्त झालेला तूं चहूंकडे जिभल्या चाटीत आहेस. तुझ्या प्रखर दीप्ति आपल्या तेजांनीं संपूर्ण जगताला व्यापून संतप्त करीत आहेत.

**आख्याहि मे को भवानुग्ररूपो**
**नमोऽस्तु ते देववर प्रसीद**
**विज्ञातुमिच्छामि भवंतमाद्यं**
**न हि प्रजानामि तव प्रवृत्तिम्**　　३१

देववर! उग्ररूपः भवान् कः, मे आख्याहि । ते नमः अस्तु । प्रसीद । आद्यम् भवंतम् विज्ञातुम् इच्छामि । हि तव प्रवृत्तिम् न प्रजानामि ।

हे देवाधिदेवा! (असें हें) उग्ररूप धारण करणारा तूं कोण आहेस

हें मला सांग. तुला माझा नमस्कार असो. शांत हो. (जगताचें) आदिकारण अशा तुझें मला विशेष ज्ञान व्हावें असें मी इच्छितों. कारण तुझा आविर्भाव मला कळत नाहीं. ( तूं अशा घोर रूपानें येथें कां प्रगट झाला आहेस हें मला कांहीं समजत नाहीं).

[ भगवंताचे भयंकर विश्वरूप पाहून घाबरून गेलेल्या अर्जुनाला आपल्या प्रार्थनेवरूनच श्रीकृष्ण भगवंतांनीं हें विश्वरूप दाखविल्याचें स्मरणही राहिलें नाहीं· म्हणून तो परमेश्वराचें नांव व विश्वरूपानें प्रगट होण्याचें कारण विचारीत आहे.]

**श्रीभगवानुवाच ।**

**कालोऽस्मि लोकक्षयकृत्प्रवृद्धो**
**लोकान्समाहर्तुमिह प्रवृत्तः**
**ऋतेऽपि त्वां न भविष्यंति सर्वे**
**येऽवस्थिताः प्रत्यनीकेषु योधाः** ३२

लोकक्षयकृत् कालः प्रवृद्धः अस्मि। लोकान् समाहर्तुम् इह प्रवृत्तः। ये प्रत्यनीकेषु योधाः अवस्थिताः ( ते ) सर्वे त्वाम् ऋते अपि न भविष्यंति।

श्रीभगवान् म्हणाले, मी लोकांचा क्षय करणारा काल वृद्धिंगत झालों आहें व लोकांचा संहार करण्याकरितां (गिळण्याकरितां) येथें प्रगट झालों आहें. येथें प्रत्येक सैन्यामध्यें जे योद्धे उभे आहेत ते सर्व तुझ्यावांचून देखील नाहीसे होणार आहेत (तूं जरी त्यांना मारिलें नाहींस तरी ते मरणारच आहेत).

**तस्मात्त्वमुत्तिष्ठ यशो लभस्व**
**जित्वा शत्रून्भुंक्ष्व राज्यं समृद्धम्**
**मयैवैते निहताः पूर्वमेव**
**निमित्तमात्रं भव सव्यसाचिन्** ३३

तस्मात्, सव्यसाचिन्! उत्तिष्ठ। शत्रून् जित्वा यशः लभस्व। समृद्धम् राज्यम् भुंक्ष्व। मया एव एते पूर्वम् निहताः। त्वम्-निमित्तमात्रम् भव।

म्हणून, हे अर्जुना! ऊठ, शत्रूंना जिंकून कीर्ति संपादन कर आणि वैभवशाली राज्याचा उपभोग घे. मी हे (सर्व) अगोदरच मारिले आहेत (कालानें यांचीं आयुष्यें भरलेलींच आहेत). तूं फक्त निमित्तकारण हो.

**द्रोणं च भीष्मं च जयद्रथं च**
**कर्णं तथान्यानपि योधवीरान्**
**मया हतांस्त्वं जहि मा व्यथिष्ठा**
**युद्धस्व जेतासि रणे सपत्नान्** ३४

मया हतान् द्रोणम्, च भीष्मम् च जयद्रथम्, कर्णं च तथा अन्यान् योधविरान् अपि जहि। मा व्यथिष्ठाः। युध्यस्व। रणे सपत्नान् जेतासि।

मीं (कालस्वरूपानें) अगोदरच मारलेले द्रोण, भीष्म, जयद्रथ, कर्ण व त्याचप्रमाणें इतर पराक्रमी योद्धे या सर्वांना तूं ठार मार. भिऊं नको. युद्ध कर. ह्या युद्धांत तूं शत्रूंना जिंकशील.

**संजयउवाच।**

**एतच्छ्रुत्वा वचनं केशवस्य**
**कृतांजलिर्वेपमानः किरीटी**
**नमस्कृत्वा भूय एवाह कृष्णं**
**सगद्गदं भीतभीतः प्रणम्य** ३५

केशवस्य एतत् वचनम् श्रुत्वा, भीतभीतः, वेपमानः किरीटी, कृतांजलिः भूयः एव प्रणम्य नमस्कृत्वा कृष्णम् सगद्गदम् आह।

संजय म्हणाला. श्रीकृष्णाचें हें भाषण ऐकून अत्यंत भ्यालेला (अतएव) थरथर कांपत असलेला अर्जुन, हात जोडून व पुनः नम्रपणें नमस्कार करून सद्गदित स्वरानें भगवंतास म्हणाला:—

**अर्जुनउवाच।**

**स्थाने हृषीकेश तव प्रकीर्त्या**
**जगत्प्रहृष्यत्यनुरज्यते च**

**रक्षांसि भीतानि दिशो द्रवंति**
**सर्वे नमस्यंति च सिद्धसंघाः ३६**

हृषीकेश ! तव प्रकीर्त्या जगत् प्रहृष्यति अनुरज्यते च। रक्षांसि भीतानि दिशः द्रवंति ! सर्वे सिद्धसंघाः नमस्यंति च स्थाने ।

हे परमेश्वरा ! तुझ्या स्तुतीच्या योगानें जग हर्ष पावतें व भक्तियुक्त होतें, राक्षस भयभीत होऊन दशदिशांना पळून जातात आणि सिद्धांचे समुदाय तुला नमस्कार करितात, हें योग्यच आहे.

**कस्माच्च ते न नमेरन्महात्मन्**
**गरीयसे ब्रह्मणोऽप्यादिकर्त्रे**
**अनंत देवेश जगन्निवास**
**त्वमक्षरं सदसत्तत्परं यत् ३७**

महात्मन् ! गरीयसे, ब्रह्मणः अपि आदिकर्त्रे च ते कस्मात् न नमेरन् ? अनंत ! देवेश ! जगन्निवास ! यत् सत् असत् तत्परम् अक्षरम् (तत्) त्वम् ।

हे महात्म्या ! अत्यंत श्रेष्ठ व हिरण्यगर्भाचा देखील आदिकर्ता अशा तुला ते (पूर्वोक्त सिद्ध, इत्यादि) कां नमस्कार करणार नाहींत? (कारण) हे अनंता! देवाधिदेवा! जगन्निवासा! व्यक्त, अव्यक्त व त्याहून पलीकडचें जें अविनाशी तत्त्व तेंही तूंच आहेस.

**त्वमादिदेवः पुरुषः पुराण–**
**स्त्वमस्य विश्वस्य परं निधानम्**
**वेत्ताऽसि वेद्यं च परं च धाम**
**त्वया ततं विश्वमनंतरूप ३८**

अनंतरूप! त्वम् आदिदेवः, पुराणः पुरुषः, त्वम् अस्य विश्वस्य परं निधानम् । (त्वम्) वेत्ता, वेद्यम्, च परम् धाम च असि । त्वया विश्वम् ततम् ।

हे अनंतरूपा ! तूं आदिदेव, पुराणपुरुष आहेस. तूंच ह्या विश्वाचें श्रेष्ठ आश्रयस्थान आहेस. तूंच ज्ञाता, ज्ञेय व परमपद (मोक्षपद) आहेस. तूंच हें विश्व विस्तारलें आहेस.

**वायुर्यमोऽग्निर्वरुणः शशांकः**
**प्रजापतिस्त्वं प्रपितामहश्च**
**नमो नमस्तेऽस्तु सहस्रकृत्वः**
**पुनश्च भूयोऽपि नमो नमस्ते** ३९

त्वम् वायुः, यमः अग्निः, वरुणः, शशांकः, प्रजापतिः, प्रपितामहः च, ते सहस्रकृत्वः नमः नमः अस्तु पुनः च, भूयः अपि ते नमः नमः अस्तु ।

तूंच वायु, यम, अग्नि, वरुण, चंद्र, हिरण्यगर्भ (आजा) व (त्यालाही उत्पन्न करणारा) पणजा आहेस. तुला हजारों वेळां नमस्कार असो आणि पुनःपुन्हा तुला नमस्कार असो.

**नमः पुरस्तादथ पृष्ठतस्ते**
**नमोऽस्तु ते सर्वत एव सर्व**
**अनंतवीर्यामितविक्रमस्त्वं**
**सर्वं समाप्नोषि ततोऽसि सर्वः** ४०

सर्व ! ते पुरस्तात् अथ पृष्ठतः नमः । ते सर्वतः एव नमः अस्तु । अनंतवीर्यामितविक्रमः त्वम् सर्वम् समाप्नोषि । ततः सर्वः असि ।

हे सर्वव्यापका ! तुला पुढून नमस्कार असो, मागून नमस्कार असो, तुला सर्व बाजूंनीं नमस्कार असो. तुझी शक्ति अपार आहे व तुझा पराक्रम अमर्याद आहे. सर्वांचें पर्यवसान तुझ्या ठिकाणींच होत आहे म्हणून तूंच सर्व आहेस.

**सखेति मत्वा प्रसभं यदुक्तं**
**हे कृष्ण हे यादव हे सखेति**
**अजानता महिमानं तवेदं**
**मया प्रमादात्प्रणयेन वापि** ४१

तव महिमानम् अजानता मया प्रमादात् वा प्रणयेन अपि सखा इति मत्वा, हे कृष्ण ! हे यादव ! हे सखे ! इति यत् इदं प्रसभम् उक्तम् ।

तुझें हें माहात्म्य न जाणतां, चुकीनें किंवा प्रेमानें तुला (समवयस्क)

मित्र समजून, हे कृष्णा ! हे यादवा ! गड्या ! असें जें मीं उद्धटपणानें बोललों असेन—

**यच्चावहासार्थमसत्कृतोऽसि**
**विहारशय्यासनभोजनेषु**
**एकोऽथवाप्यच्युत तत्समक्षं**
**तत्क्षामये त्वामहमप्रमेयम्** ४२

अपि च, विहारशय्यासनभोजनेषु अवहासार्थम् एकः अथवा तत्समक्षम् यत् असत्कृतः असि। अच्युत ! अप्रमेयम् त्वाम् अहम् तत् क्षामये।

त्याचप्रमाणें क्रीडा, शयन, आसन, भोजन इत्यादि प्रसंगीं थट्टेनें, एकांतीं किंवा सर्वांसमक्ष जो मीं तुझा अपमान केला असेल त्याबद्दल, हे अच्युता ! अचिंत्यप्रभाव अशा तुझी मी क्षमा मागतों.

**पिताऽसि लोकस्य चराचरस्य**
**त्वमस्य पूज्यश्च गुरुर्गरीयान्**
**न त्वत्समोऽस्त्यभ्यधिकः कुतोऽन्यो**
**लोकत्रयेऽप्यप्रतिमप्रभावः** ४३

अप्रतिमप्रभावः त्वम् चराचरस्य लोकस्य पिता असि। अस्य पूज्यः गरीयान् गुरुः च (असि)। लोकत्रये अपि त्वत्समः अन्यः न अस्ति अभ्यधिकः कुतः ?।

हे परमेश्वरा ! अतुलपराक्रमी असा तूं ह्या स्थावर-जंगम विश्वाचा जनक आहेस, तूंच ह्याचा (विश्वाचा) पूज्य व श्रेष्ठ गुरु आहेस, ह्या त्रैलोक्यामध्यें तुझ्या समानदेखील कोणी नाहीं, मग (तुझ्याहून) अधिक कोठून असणार ?

**तस्मात्प्रणम्य प्रणिधाय कायं**
**प्रसादये त्वामहमीशमीड्यम्**
**पितेव पुत्रस्य सखेव सख्युः**
**प्रियः प्रियायार्हसि देवसोढुम्** ४४

**तस्मात् प्रणम्य, कायम् प्रणिधाय, ईड्यम् ईशम् त्वाम् अहम् प्रसादये। देव! प्रियः पिता पुत्रस्य प्रियाय इव, (प्रियः) सखा, सख्युः, (प्रियाय) इव, सोढुम् अर्हसि।**

म्हणून, तुला नमस्कार करून व (तुझ्या चरणीं) देह समर्पण करून परमपूज्य परमेश्वर अशा तुला मी प्रसन्न करून घेतों (प्रसन्न हो अशी प्रार्थना करितों). हे देवा! प्रेमळ पिता आपल्या पुत्राच्या प्रेमास्तव किंवा (प्रेमळ मित्र) आपल्या मित्राच्या प्रेमास्तव (अपराध सहन करितो,) त्याप्रमाणें, माझ्या प्रेमाकरितां तूंही (अपराध) सहन करण्यास योग्य आहेस. (सहन केले पाहिजेत.)

**अदृष्टपूर्वं हृषितोऽस्मि दृष्ट्वा**
**भयेन च प्रव्यथितं मनो मे**
**तदेव मे दर्शय देव रूपं**
**प्रसीद देवेश जगन्निवास ४५**

**देव! अदृष्टपूर्वम् दृष्ट्वा, हृषितः अस्मि। मे मनः च भयेन प्रव्यथितम्! देवेश! प्रसीद। जगन्निवास! मे तत् एव रूपम् दर्शय।**

हे जगन्निवासा! पूर्वी कधीं न पाहिलेलें असें हें (विश्वरूप) पाहून मी हर्षयुक्त झालों आहें आणि माझें मन भीतीनें व्यथित झालें आहे. हे देवाधिदेवा! प्रसन्न हो; आणि हे देवा! मला तेंच रूप (पूर्वीचें मानवी स्वरूप) दाखीव.

**किरीटिनं गदिनं चक्रहस्त-**
**मिच्छामि त्वां द्रष्टुमहं तथैव**
**तेनैव रूपेण चतुर्भुजेन**
**सहस्रबाहो भव विश्वमूर्ते ४६**

**सहस्रबाहो! विश्वमूर्ते! अहम् तथा एव किरीटिनम्, गदिनम् चक्रहस्तम् त्वाम् द्रष्टुम् इच्छामि। तेन एव चतुर्भुजेन रूपेण भव।**

हे असंख्यबाहो! विश्वरूपा! तसाच (पूर्वीसारखाच,) किरीट धारण करणारा, गदा धारण करणारा व हातांत (सुदर्शन) चक्र

धारण करणारा असें तुझें रूप मी पाहूं इच्छितों. त्याच चतुर्भुज रूपानें युक्त हो ( पूर्वीचें चतुर्भुज रूप धारण कर ). (दिव्य किंवा सुंदर) चार हात नव्हे. कारण वर वर्णन दोन हातांबद्दल आहे.)

**श्रीभगवानुवाच ।**

**मया प्रसन्नेन तवार्जुनेदं**
**रूपं परं दर्शितमात्म योगात्**
**तेजोमयं विश्वमनंतमाद्यं**
**यन्मे त्वदन्येन न दृष्टपूर्वम्** ४७

अर्जुन! यत् त्वत् अन्येन न दृष्टपूर्वम्, इदम् मे तेजोमयम्, विश्वम्, अनंतम्, आद्यम्,परम् रूपम् मया प्रसन्नेन आत्मयोगात् तव दर्शितम् ।

श्रीभगवान् म्हणाले, अर्जुना ! तुझ्यावांचून पूर्वी कोणीही न पाहिलेलें हें तेजोमय, विश्वव्यापक, अपार, श्रेष्ठ व उत्तम असें माझें स्वरूप (विश्वरूप) मीं प्रसन्न होऊन आपल्या (ईश्वरी) सामर्थ्यानें तुला दाखविलें.

**न वेदयज्ञाध्ययनैर्नदानै-**
**र्नच क्रियाभिर्नतपोभिरुग्रैः**
**एवंरूपः शक्य अहं नृलोके**
**द्रष्टुं त्वदन्येन कुरुप्रवीर** ४८

कुरुप्रवीर ! वेदयज्ञाध्ययनैः न। दानैः न । उग्रैः तपोभिः च न। अहम् नृलोके त्वदन्येन एवंरूपः द्रष्टुम् शक्यः ।

हे कुरुश्रेष्ठा! (अर्जुना,) वेद व यज्ञ यांच्या अध्ययनानें, किंवा दानांनीं, किंवा (यज्ञयागादि) कर्मांनीं, किंवा घोर तपश्चर्यांनीं देखील माझें हें रूप ह्या मनुष्यलोकीं तुझ्यावांचून इतरांच्या दृष्टीस पडणें शक्य नाहीं.

**मा ते व्यथा मा च विमूढभावो**
**दृष्ट्वा रूपं घोरमीदृङ्ममेदम्**
**व्यपेतभीः प्रीतमनाः पुनस्त्वं**
**तदेव मे रूपमिदं प्रपश्य** ४९

**मम इदम् ईदृक् घोरम् रूपम् दृष्ट्वा, ते व्यथा मा। विमूढभावः च मा। व्यपेतभीः प्रीतमनाः त्वम्, मे तत् एव इदम् रूपं पुनः प्रपश्य।**

माझें हें असलें उग्र रूप पाहून तूं भिऊं नकोस व बावरूं नकोस. पुनरपि निर्भय व शांतचित्त होऊन, तेंच (पूर्वींचें) माझें हें रूप पहा.

**संजय उवाच।**

**इत्यर्जुनं वासुदेवस्तथोक्त्वा**
**स्वकं रूपं दर्शयामास भूयः**
**आश्वासयामास च भीतमेनं**
**भूत्वा पुनः सौम्यवपुर्महात्मा** ५०

**वासुदेवः अर्जुनम् इति उक्त्वा, स्वकम् रूपम् भूयः तथा दर्शयामास। महात्मा पुनः सौम्यवपुः भूत्वा, भीतम् एनम् च आश्वासयामास।**

संजय म्हणाला—श्रीकृष्ण भगवान् ह्याप्रमाणें अर्जुनाला बोलून आपलें पूर्वींचें स्वरूप पुनः दाखविता झाला. आणि तो महात्मा पुनः सौम्य स्वरूप धारण करून, भयभीत झालेल्या अर्जुनाला धीर देता झाला. (अर्जुनाची दिव्य दृष्टि नष्ट करून त्याला भगवंतांनीं आपलें पूर्ववत् शांत स्वरूप दिसेल असें केलें.)

**अर्जुन उवाच।**

**दृष्ट्वेदं मानुषं रूपं तव सौम्यं जनार्दन**
**इदानीमस्मि संवृत्तः सचेताः प्रकृतिं गतः** ५१

**जनार्दन ! तव इदम् मानुषम् सौम्यम् रूपम् दृष्ट्वा, इदानीम् सचेताः संवृत्तः प्रकृतिं गतः अस्मि।**

अर्जुन म्हणाला–हे जनार्दना ! तुझें हें मानवी सौम्यरूप पाहिल्यावर आतां मी शुद्धीवर आलों आहें व शांत झालों आहें.

**श्रीभगवानुवाच॥**

**सुदुर्दर्शमिदं रूपं दृष्टवानसि यन्मम**
**देवा अप्यस्य रूपस्य नित्यं दर्शनकांक्षिणः** ५२

**मम यत् रूपम् दृष्टवान् असि। इदम् सुदुर्दर्शम्। देवाः अपि अस्य रूपस्य नित्यम् दर्शनकांक्षिणः।**

श्रीभगवान् म्हणाले—(अर्जुना) माझें जें रूप (तूं) पाहिलेंस, हें पाहण्यास अत्यंत दुर्लभ आहे. देवदेखील त्या रूपाच्या (विश्वस्वरूपाच्या) दर्शनाची नेहमीं इच्छा करीत असतात.

[ असें हें आधिभौतिक सृष्टिरूप श्रेष्ठ विराटस्वरूप तुला मीं दाखविलें आहे असें भगवंतांनीं येथें ७व्या श्लोकांतील विधानाचें निगमन केलें आहे.]

**नाहं वेदैर्न तपसा न दानेन न चेज्यया**
**शक्य एवंविधो द्रष्टुं दृष्टवानसि मां यथा** ५३

**माम् यथा दृष्टवान् असि, एवम्विधः अहम् द्रष्टुं वेदैः न, तपसा न, दानेन न, इज्यया च न शक्यः।**

तुला माझें (विश्वरूपाचें) दर्शन झालें, तसें वेद, तप, दान, किंवा यज्ञ ह्या साधनांनीं (कोणाला) दर्शन होणें शक्य नाहीं.

**भक्त्या त्वनन्यया शक्य अहमेवंविधोऽर्जुन**
**ज्ञातुं द्रष्टुं च तत्त्वेन प्रवेष्टुं च परंतप** ५४

**परंतप ! अर्जुन ! तु, एवंविधः अहम् तत्त्वतः ज्ञातुम् द्रष्टुम् प्रवेष्टुम् च अनन्यया भक्त्या शक्यः।**

परंतु परंतपा ! अर्जुना ! याप्रमाणें तत्त्वतः मला जाणणें, पाहणें व मला येऊन मिळणें अनन्य भक्तीनें मात्र शक्य आहे.

**मत्कर्मकृन्मत्परमो मद्भक्तः संगवर्जितः**
**निर्वैरः सर्वभूतेषु यः स मामेति पांडव** ५५

**पांडव ! यः मत्कर्मकृत्, मत्परमः, मद्भक्तः, संगवर्जितः, सर्वभूतेषु निर्वैर, सः माम् एति।**

म्हणून अर्जुना ! जो पुरुष माझ्याकरितांच (परमेश्वराकरितांच) कर्में करीत असतो, व जो मत्पर (भगवत्परायण) झालेला असतो, जो माझा (परमेश्वराचा) भक्त असतो व जो फलासक्तिरहित व सर्व प्राणिमात्रांशीं वैरशून्य झालेला असतो, तोच मला येऊन मिळतो.

[ ह्या श्लोकांत ज्ञानविज्ञानयुक्त व्यक्तोपासनेचें व अनन्य भक्तीचें तात्पर्य सांगून त्यांतील पांच विशेषणांनीं अ० २ श्लो० ४५ यांतील बुद्धियोगाचे पांचही अंश दाखविले आहेत. परमेश्वराकरितांच कर्म करणारा बुद्धियोगसंपन्न भक्त फलाची इच्छा न धरतां परमेश्वराची सेवा करणें हें आपलें कर्तव्य आहे असें समजून कर्तव्य करीत असतो. (**मत्कर्मकृत्**) व कर्मापासून होणाऱ्या सुखदुःखजन्य राग-द्वेषांच्या आधीन होत नाहीं, म्हणजे तो **निर्द्वंद्व** असतो. (**संगवर्जितः**) तो ईश्वरपरायण असल्यामुळें स्वतःसाठीं कांहीं संपादन अगर संरक्षण करण्याविषयींची त्याला काळजी वाटत नाहीं, म्हणजे तो **निर्योगक्षेम** असतो. (**मत्परायणः**) त्याचे परमेश्वराचे ठिकाणीं ज्ञानविज्ञानपूर्वक निःसीम प्रेम असल्यामुळें, तो **आत्मवान्** म्हणजे आत्मज्ञानवान् झालेला असतो. (**मद्भक्त**) आणि प्राणिमात्राशीं त्याचें वैर नसल्यामुळें सर्वभूतहिताविषयींची त्याची साम्यबुद्धि अढळ असते, म्हणजे तो **नित्यसत्त्वस्थ** असतो (**निर्वैर**) ह्याप्रमाणें भगवद्भक्ति व कर्मयोग यांचें ऐक्य येथें दाखविलें आहे.]

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायाम् योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे विश्वरूपदर्शनयोगो नाम एकादशोऽध्यायः**

याप्रमाणें श्रीभगवंतांनीं गाइलेल्या उपनिषदांतील ब्रह्मविद्यांतर्गत कर्मयोग-शास्त्राविषयींच्या श्रीकृष्ण व अर्जुनसंवादांतील '**विश्वरूपदर्शन प्रकरण**' या नांवाचा अकरावाअध्याय समाप्त झाला.

---

# अकराव्या अध्यायाचा उपसंहार

## अकराव्या अध्यायाची विषयानुक्रमणिका

| विषय | श्लोक |
|---|---|
| विश्वरूपदर्शनाविषयीं अर्जुनाची प्रार्थना. ... ... ... | १–४ |
| भगवंतांनीं केलेलें विश्वरूपाचें सामान्य वर्णन. ... ... | ५–८ |
| संजयानें केलेलें विश्वरूपाचें संक्षिप्त वर्णन. ... ... | ९–१४ |
| अर्जुनानें केलेलें विश्वरूपाचें वर्णन. ... ... ... | १५–३० |
| अर्जुनाचा प्रश्न. ... ... ... ... ... | ३१ |
| भगवंतांचें उत्तर.... .... ... ... ... | ३२–३४ |

सृष्टीची उत्पत्ति, स्थिति, लय यांचें ज्ञान, व परमेश्वर सर्व सृष्टीचा नियामक व आदिकारण आहे असें ज्ञान झाल्यामुळें ज्ञानविज्ञानसंपन्न झालेल्या भगवद्भक्त अर्जुनाची, श्रीकृष्ण हेच साक्षात् परमेश्वर आहेत अशी खात्री पटल्यामुळें, त्यानें आपल्याला आधिभौतिक विराटस्वरूपाचें प्रत्यक्ष दर्शन व्हावें, अशी प्रार्थना १ ते ४ श्लोकांत केली आहे. त्यावरून भगवंतांनीं ५ ते ८ श्लोकांत आपल्या विश्वरूपाचें सामान्य वर्णन करून ज्याप्रमाणें **अधियज्ञ** व **अधिदैव** मी परमेश्वरच आहें, त्याच-प्रमाणें **अधिभूत**ही मीच आहें हें माझ्या विश्वरूपांत तुला प्रत्यक्ष दिसेल असें अर्जुनास सांगितलें आहे. नंतर अर्जुनाला दिव्य दृष्टि देऊन भगवंतांनीं आपलें विश्वरूप दाखविलें, म्हणजे संपूर्ण विश्व हेंच भगवंतांचे विराटस्वरूप आहे हें प्रत्यक्ष पाहण्याची दैवी शक्ति भगवंतांनीं आपल्या योगसामर्थ्यानें अर्जुनाच्या दृष्टींत उत्पन्न केली. त्यावरून **भगवंतांनीं नवीन स्वरूप धारण केलें नसून अर्जुनाच्या दृष्टींतच नवी दैवी शक्ति मात्र उत्पन्न केली** असें सिद्ध होतें. यानंतर संजयानें अर्जुनाला दिसलेल्या विश्वरूपाचें सामान्य वर्णन करून तें विराटरूप पाहून अर्जुनाच्या ठिकाणीं सात्त्विक भाव उत्पन्न झाल्याचें ९ ते १४ श्लोकांत धृत-राष्ट्रास सांगितलें आहे. पुढें अर्जुनाला दिसलेल्या विराट स्वरूपाचें त्यानें १५ ते ३० श्लोकांत वर्णन केलें असून, त्यांत श्लोक १५ ते १९ अखेर आधिदैविक व श्लोक २० ते ३० अखेर **आधिभौतिक** स्वरूप वर्णन केलें आहे. त्यांतच त्या विराट पुरुषाच्या विक्राळ व संहारक शक्तींचें वर्णन करून, रणांगणावरील उभय-पक्षांकडील सर्व योद्धे त्या विराट पुरुषाच्या कालरूपी मुखांत आपण होऊन त्वरेनें प्रवेश करीत असलेले दिसल्याचेंही सांगितलें आहे. हा भयंकर देखावा पाहून घाबरलेल्या अर्जुनाला आपल्या प्रार्थनेवरून भगवान् श्रीकृष्णांनींच हें

विश्वरूप दाखविल्याचें भान न राहून, त्यानें ३१ व्या श्लोकांत “ देवाधिदेवा! तूं कोण, व येथें कां प्रगट झाला आहेस ?” असा प्रश्न केला आहे. त्या विश्वरूपधारी भगवंतांनीं ३२ ते ३४ अखेर तीन श्लोकांत असें उत्तर दिलें आहे कीं, “ मी काल असून सर्व लोकांचा संहार करण्याकरितां येथें प्रगट झालों आहें. म्हणून तूं युद्ध सोडून स्वस्थ राहिलास तरी हा संहार बंद पडणार नाहीं. हे सर्व लोक कालानें ग्रासलेले असल्यामुळें मरणारच. तूं फक्त निमित्त होणार आहेस, तथापि त्याची जबाबदारी तुजवर येणार नाहीं.” तात्पर्य, फांशी जाणाऱ्या खुनी मनुष्याच्या मरणास न्यायाधीश जरी निमित्तमात्र कारण होत असला तथापि तो खुनी मनुष्य आपल्याच दुष्कर्मानें मरत असल्यामुळें, त्याची हत्त्या न्यायाधिशास लागत नाहीं. त्याप्रमाणें, कौरव आपल्याच दुष्कर्मांनीं गतायुषी झाले असून परमेश्वराच्या संहारक शक्तीच्या विक्राळ जबड्यामध्यें त्यांनीं आपण होऊन उडी टाकिली आहे. म्हणून, तूं निमित्तमात्र झालास तरी, त्यांच्या हत्त्या तुला लागणार नाहींत असा भगवंतांच्या सांगण्याचा अभिप्राय आहे. त्यानंतर ३६ व्या श्लोकांत अर्जुनानें ईश्वराच्या सामर्थ्याचें ( ऐश्वर्याचें ) वर्णन केलें आहे. त्यावरून ऐश्वर्याचा उपयोग सज्जनांचा उत्कर्ष व दुष्टांचा नाश अशा दोन्ही प्रकारांनीं सारखाच होतो असें दिसून येतें. यापुढें अर्जुनानें श्लोक ४० अखेर विराटस्वरूपाच्या अधियज्ञ, अधिदैव व अधिभूत इत्यादि व्यक्त स्वरूपांचें व अव्यक्त स्वरूपाचें व व्यक्ताव्यक्ताहून पर असलेल्या शुद्ध तत्त्वाचें स्तवन केलें आहे. नंतर श्लोक ४१ ते ४४ अखेर आपण न कळत केलेल्या भगवंतांच्या अपमानाबद्दल क्षमा मागितली आहे. व ४५।४६ श्लोकांत हें हर्ष व भय उत्पन्न करणारें विश्वरूप आवरण्याविषयीं प्रार्थना केली आहे. श्लोक ४७ ते ४९ अखेर, भगवंतांनीं विश्वरूपदर्शनाचें माहात्म्य अर्जुनास सांगून व हें विश्वरूप आपण प्रसन्न होऊन, तुझें आधिभौतिक ज्ञान पूर्ण करण्याकरितां तुला दाखविलें असें सांगून अर्जुनाच्या दृष्टींतील दिव्यशक्ति काढून घेतली, तेव्हां अर्जुनाला श्रीकृष्णाचें पूर्वीसारखें सौम्यरूप दिसूं लागलें व त्याचें मन शांत झालें. नंतर ५२ व्या श्लोकांत देवांनासुद्धां दुर्लभ असलेल्या विश्वरूपदर्शनानें, परमेश्वर अधिभूत कसा आहे, हें अर्जुनास दाखविलें आहे. पुढें ५३।५४ श्लोकांत वेदाध्ययन, यज्ञ, दान, तप, इत्यादि सकाम कर्मांनीं विश्वरूपदर्शन होणें शक्य नसून ज्ञानविज्ञानपूर्वक अनन्य भक्तीनेंच परमेश्वराचें यथार्थ ज्ञान, साक्षात्कार व ऐक्य प्राप्त होतें असें सांगून विश्वरूपदर्शन-

युक्त आधिभौतिक विवेचनाचा उपसंहार केला आहे. अ० ४ श्लो० ३५ यांतील प्रतिपादनास अनुसरूनच अर्जुनास भगवंतांनीं विश्वरूपदर्शन दिलें आहे. व येथें व्यक्तोपासनेचें विवेचन पूर्ण होत असल्यामुळें कर्मयोग व व्यक्तोपासना भिन्न नसून, त्या दोन्हींचें पूर्ण ऐक्य आहे असें शेवटच्या श्लोकांत तात्पर्य सांगून अध्यायाची परिसमाप्ति केली आहे.

नऊ, दहा व अकरा या तीन अध्यायांत मिळून या व्यक्तोपासनेचें प्रतिपादन पूर्ण झालें आहे. त्यांत अधियज्ञ, अधिदैव आणि अधिभूत अशा परमात्म्याच्या तीन स्वरूपांचें वर्णन झालें. या तिहींत परस्परसंगति कशी लागते, व्यक्तोपासनेचे ( भक्तिमार्गाचे ) मुख्य सिद्धांत कोणते आणि त्यांवरून त्याचें कर्मयोगाशीं कसें ऐक्य आहे, या प्रश्नांचा विचार करणें येथें अवश्य आहे.

जिज्ञासायुक्त श्रद्धा, आणि मत्सररहित प्रेम या दोन सद्‌गुणांच्या जोरावर कोणताही मनुष्य भक्तिमार्गाचा अधिकारी होतो व ज्ञानविज्ञानयुक्त भक्तिमार्गानें त्याला ईश्वरप्राप्ति होते. तेथें जातिनिर्बंध आड येत नाहीं. परमेश्वराच्या जड व चैतन्य या प्रकृतींच्या स्वरूपांचें यथार्थ ज्ञान झालें, म्हणजे परमात्मा सर्वज्ञ, सर्वनियामक व सर्वेश्वर कसा आहे हें बरोबर समजतें. अशा जगन्नियन्त्या परमेश्वराची उपासना करण्याकरितांच प्रतीकाची अवश्यकता उत्पन्न होते. प्रतीक म्हणजे अंश किंवा अवयव. जी गोष्ट सार्वजनिक हिताला पोषक किंवा सर्वांच्या दृष्टीनें पूज्य असेल तिलाच ईश्वराचें प्रतीक समजावें, असें ९ व्या अध्यायांतील प्रतीकाकरितां दिलेल्या विभूतींच्या यादीवरून ठरतें. भक्तिमार्गानें जाऊं इच्छिणाऱ्या मनुष्यास प्रतीकाचा बिनचूक निश्चय ठरविण्याकरितांच अधिदैवाच्या ज्ञानाची गरज असते व याकरितांच दहाव्या अध्यायांत विभूतींचें विस्तृत वर्णन आलें आहे. अधिदैवाचें सांगोपांग ज्ञान झालें म्हणजेच उपासकाला प्रतीकाचा निश्चय करितां येतो. प्रतीकाचा निश्चय म्हणजे उपास्याच्या सगुण स्वरूपाचा निश्चय होय. नवव्या आणि दहाव्या अध्यायांतील विभूतींवरून प्रतीकाचें म्हणजे आपल्या उपास्य देवतेचें स्वरूप व्यापक असलें पाहिजे, हें कोणालाही कबूल करावयास पाहिजे. येथपर्यंतच्या सर्व विवेचनावरून अधियज्ञ व अधिदैव हे परस्परांहून अगदीं विलग नसून अधिदैव हें अधियज्ञाचें पूरक आहे हें वाचकांच्या लक्षांत आलें असेलच. अधियज्ञ म्हणजे उपास्यदेवता व तिचें स्वरूप पूर्णपणें ओळखण्याचा मार्ग म्हणजे अधिदैव होय.

याप्रमाणें उपास्य देवतेच्या स्वरूपाचा निश्चय झाला म्हणजे उपासना कोणाची व कशी करावयाची हा प्रश्न ओघानेंच प्राप्त होतो. उपासना म्हणजे आपल्या आराध्यदेवतेची सेवा. आपलें उपास्यदैवत ज्या मानानें व्यापक असेल त्या मानानें आपल्या सेवेचें म्हणजे उपासनेचें स्वरूप व्यापकच असलें पाहिजे हें उघड आहे. सेवेचा विचार करावयाचा झाला कीं, आपण आतां प्रत्यक्ष व्यवहाराच्या भूमिकेवर उतरलों आहोंत हें लक्षांत ठेवणें जरूर आहे. व्यवहाराचा संबंध पदार्थांच्या बाह्य स्वरूपाशीं येत असल्यामुळें अधिभूताचा म्हणजे स्थूल सृष्टीचा विचार केल्याखेरीज या उपासनेंतील व्यवहाराचें शुद्ध स्वरूप निश्चित करणें शक्य नाहीं. यावरून भक्तिमार्गांतील आचाराचे (उपासनेचे) नियम ठरविण्याची कसोटी म्हणून विश्वरूप-दर्शनाचें प्रकरण क्रमप्राप्तच आहे. विश्वरूपाचें निरीक्षण करितांना अर्जुनास प्रथम असें आढळून आलें कीं, आसुरी स्वभावाच्या लोकांचा नायनाट होत आहे आणि दैवी वृत्तीच्या पुरुषांना ज्ञानस्फूर्ति होत आहे. (अ. ११, श्लोक २१ पाहा) परमेश्वराच्या सृष्टिरूप स्थूल स्वरूपापासून सकल जीवांनीं ईश्वरी ज्ञान संपादन करावें असा परमात्म्याचा सृष्टि उत्पन्न करण्यांत हेतु आहे. (अ. ७, श्लोक १३ पाहा.)

ज्ञानाचें संशोधन किंवा संवर्धन करण्याच्या तत्त्वावरच उपासनेचा व्यवहार अवलंबून आहे असें ह्या विश्वरूपदर्शनावरून सिद्ध होतें. उपासना कोणती व कशी करावयाची या प्रश्नाचेंही उत्तर विश्वरूपदर्शनावरून निघतें.

ईश्वरी स्वरूपाचें ज्ञान उपास्यावर प्रेम दृढ करण्यास कारणीभूत होतें, अधिदैवाच्या ज्ञानानें उपास्य ईश्वराचें प्रतीक ठरवितां येतें आणि अधिभूताच्या (सृष्टीच्या स्थूल स्वरूपाच्या) ज्ञानानें उपासना कशी करावी तें कळतें. यावरून व्यक्तोपासनेंत अधियज्ञ, अधिदैव व अधिभूत या तीनही विषयांच्या ज्ञानाची अत्यंत आवश्यकता कशी आहे हें बरोबर लक्षांत येतें. या व्यक्तोपासनेलाच सगुणभक्ति असें म्हणतात. गीतेंतील या तीनही अध्यायांचा सूक्ष्म दृष्टीनें विचार केल्यास असें आढळून येईल कीं, खरी सगुणभक्ति म्हणजे मूर्तिपूजा नव्हे तर भक्तिमार्गाच्या साधनाचें साधन असें तिच्याविषयीं फार झालें तर म्हणतां येईल. वस्तुतः ध्यानधारणेकरितां मूर्तीची आवश्यकता विशेष आहे. गीताशास्त्रावरूनच विचार करावयाचा झाल्यास खरी सगुणभक्ति कोणती ठरते हें पुढील उदाहरणावरून चांगलें लक्षांत येईल. भक्तिमार्गाला अवश्य तितकें परमात्म्याचें

ज्ञान झाल्यावर भगवान् गोपालकृष्ण हेंच आपलें उपासनेचें प्रतीक असें एखाद्यानें शास्त्रावरून ठरविलें तर भगवान् श्रीकृष्णाच्या उपदेशाप्रमाणें प्राणाचीही पर्वा न करितां अक्षरशः वागणें, म्हणजे श्रीकृष्णाप्रमाणेंच यावज्जीव लोकहितार्थ झटणें व असें करितांना आपलें उपास्य जो श्रीकृष्ण त्याची आपण उच्च प्रतीची ही सेवाच करीत आहों असा अंतःकरणास प्रत्यय येणें, हीच त्याची खरी सगुणभक्ति होय. असें न करितां श्रीकृष्णाची तांब्यापितळेची किंवा सोन्याचांदीची लहानशी मूर्ति बनवून तिच्यावर अभिषेक किंवा गंधफुलें वाहत बसणें ही श्रीकृष्णाची खरी उपासना नव्हे. वरील उच्च प्रतीची खरी सगुणभक्ति करण्याची योग्यता ज्याच्या अंगीं नसेल त्यानें आपल्यामध्यें सगुणभक्तीचा अधिकार उत्पन्न होण्याकरितां वाटल्यास या मूर्तिपूजेचा उपयोग करून घ्यावा, त्याला गीताशास्त्राची आडकाठी नाहीं. उदाहरण दुसरें:–सूर्यनारायण हें उपास्य दैवत मानल्यास ज्याप्रमाणें भगवान् सविता आपल्या तेजानें जगाचें धारणपोषण करितो त्याप्रमाणेंच तेजस्वीपणानें जगताच्या कल्याणाकरितां जर आपण अहोरात्र कायावाचामनानें झटलों तरच ती सूर्यनारायणाची खरी उपासना होईल, एरवीं होणार नाहीं.

परमेश्वराच्या अमुकच स्वरूपाची उपासना करावी असा गीताशास्त्राचा आग्रह नसला तरी, ज्या प्रतीकाची उपासना करावयाची तें जास्तींत जास्त व्यापक असलें पाहिजे अशी गीतेची शिकवण आहे. भगवान् सूर्य इतर सर्व प्रतीकांपेक्षां अत्यंत व्यापक आहे हें खरें; परंतु शुद्ध परमात्मस्वरूप हें सूर्यापेक्षां कितीतरी अधिक व्यापक आहे आणि म्हणून सूर्यावरच परमात्मदृष्टि करावयाची असा वेदान्तशास्त्रांतील नियम आहे ( ब्रह्मसूत्र अध्याय ४ था पान १ सूक्त ५.). उपास्याच्या व उपासनेच्या आणि उपासकाच्या बौद्धिक महत्त्वावरून उपासनेचें श्रेष्ठत्व किंवा कनिष्ठत्व ठरतें. सर्वांत श्रेष्ठ उपासना कोणती, तें विश्वरूपदर्शनावरून चांगलें ओळखतां येण्याजोगें आहे. अर्जुनाला विश्वरूप दिसलें किंवा त्याला पाहतां आलें तें यच्चयावत् विश्वाचें स्वरूप होतें काय, या प्रश्नाचा अमळ सूक्ष्म दृष्टीनें विचार केल्यास असेंच कबूल करावें लागतें कीं, अर्जुनाला दिसलेलें आधिभौतिक स्वरूप सगळ्या ब्रह्मांडाचें नसून कुरुक्षेत्रावर जमलेल्या एकाच संस्कृतींतील एका मानवी समाजाचें होतें. अर्जुनाला अनेक देवता दिसल्या; गंधर्व, यक्ष, ऋषि वगैरे अदृश्य विभूतिदेखील त्यानें पाहिल्या; किंबहुना राक्षसादि सूक्ष्म तामसी शक्तिसुद्धां त्याच्या दृष्टीस पडल्या हें खरें, पण ह्या बाह्य जगांतील

केवढा भाग त्याच्या नजरेसमोर आला होता ? या प्रश्नाचें उत्तर असें आहे कीं, भारतीयुद्धाचे वेळीं राष्ट्राचें स्वरूप कालपक्क म्हणजे मुमूर्षु झालें होतें. तेवढें तत्कालीन राष्ट्राचें एकवटलेलें चित्रच अर्जुनाला विश्वरूपांत दिसून आलें. यावरून मनुष्याला दिव्य दृष्टीनें कां होईना, या भूतसृष्टीपैकीं समष्टीच्या स्वरूपापलीकडे पाहतां येणें शक्य नाहीं. अर्थात् परमेश्वराच्या विश्वरूपाची उपासना म्हणजे समष्टीची उपासनाच मात्र व्यवहार्य आहे, यापलीकडे मनुष्याला व्यवहारानें जातां येणें शक्य नाहीं असें ओघानेंच प्राप्त होतें. म्हणजे राष्ट्र हेंच परमात्म्याचें प्रतीक असें समजून अनन्य भक्तीनें त्याची उपासना करणें, हीच परमेश्वराची खरी व श्रेष्ठ उपासना होय, असें विश्वरूप-दर्शनावरून निर्विवाद सिद्ध होतें. वरील विवेचनांत अर्जुनाला विश्वरूपाचा भाग किती समजला, येवढ्याच गोष्टीचा मुख्यत्वेंकरून येथें विचार केला आहे. कारण, विश्वरूपाचा जेवढा विस्तार होता तेवढा सबंध अर्जुनाच्या दिव्य दृष्टीच्यादेखील टप्प्यांत येऊं शकला नाहीं, असें अर्जुनानें केलेल्या वर्णनावरून दिसून येतें. म्हणून प्रगट झालेल्या विश्वरूपाचा किती विस्तार होता, हा मुख्य प्रश्न नसून या भूलोकापैकीं किती भाग अर्जुनाला दिसला (समजला) हें येथें पहावयाचें आहे.

भक्तिमार्ग व कर्मयोग हे तत्त्वानें किंवा स्वरूपानें देखील एकच आहेत. कर्मयोगाला भक्तीची जरूर आहे आणि भक्तीच्या पूर्ततेला कर्मयोगाची आवश्यकता आहे. अर्थात् हे निरनिराळे मार्ग नसून, एकाच योगनिष्ठेची कर्तव्यतत्परता व अनन्यभक्ति या दोहोंनीं पूर्तता व्हावयाची आहे. व्यक्तोपासनेचे व कर्मयोगाचे नियम व सिद्धान्त एकरूपच कसे आहेत तें आम्हीं नवव्या अध्यायाच्या उपसंहारांत दाखविलेंच आहे. सारांश राष्ट्र किंवा जनता हें परमेश्वराचें प्रतीक ग्रहण करून कर्तव्यबुद्धीनें निःसीम भक्तिपूर्वक केलेली त्याची सेवा म्हणजे उपासना, हेंच ईश्वरप्राप्तीचें उच्चतम साधन होय. या अभिप्रायानेंच भगवंतांनीं अर्जुनास विश्वरूप दाखविलें व तो अभिप्राय त्यांनीं अकराव्या अध्यायाच्या शेवटच्या श्लोकांत स्पष्ट बोलूनही दाखविला आहे. त्यावरून प्रत्येकानें ईश्वराची ही सर्वोत्तम उपासना करणेंच अत्यंत श्रेयस्कर होय व योगनिष्ठेची पूर्तता होण्यास याच उपासनेची जरूर आहे असा गीताशास्त्राचा उपदेश आहे.

# द्वादशोऽध्यायः ।

कर्मयोगाच्या पूर्णतेस अवश्य असलेल्या भगवदुपासनेचे दोन प्रकार मागील अध्यायांतून वेळोवेळीं भगवंतांनीं प्रतिपादन केले आहेत. अध्याय २, श्लोक १६ ते १८ अखेर आत्मज्ञानाधिकरणांत, अ. ४, श्लोक ३३ ते ४१ अखेर ज्ञानयज्ञाधिकरणांत, व आणखीही कित्येक स्थळीं अव्यक्तोपासनेचें वर्णन आलें आहे. त्याचप्रमाणें अ. ९, १० व ११ यांतील अधियज्ञ, अधिदैव व अधिभूत यांच्या विवेचनांत आणि मागील अध्यायांतही कित्येक ठिकाणीं व्यक्तोपासना सांगितली आहे. अव्यक्तोपासना म्हणजे निर्गुण ब्रह्मतत्त्वाचा विचार, व व्यक्तोपासना म्हणजे ज्ञानविज्ञानपूर्वक परमेश्वराच्या व्यक्त स्वरूपाची उपासना, असे उपासनेचे दोन प्रकार होत असल्यामुळें, त्यांचें तारतम्य ठरविण्याची आवश्यकता उत्पन्न झाली. हें तारतम्य दाखविणें व सुलभ असलेल्या व्यक्तोपासनेच्या म्हणजे भक्तिमार्गाच्या पूर्णतेचीं लक्षणें सांगणें हा ह्या अध्यायाचा प्रतिपाद्य विषय आहे.

भगवंतांनीं पूर्वीं सांगितलेल्या व्यक्तोपासना व अव्यक्तोपासना यांपैकीं श्रेष्ठ उपासना कोणती, हें समजून घेण्याकरितां अर्जुन विचारतो.

**अर्जुन उवाच**

**एवं सततयुक्ता ये भक्तास्त्वां पर्युपासते**
**ये चाप्यक्षरमव्यक्तं तेषां के योगवित्तमाः** १

**एवम् सततयुक्ताः ये भक्ताः (संतः) त्वाम् पर्युपासते, अपि च ये अव्यक्तम् अक्षरम् (पर्युपासते) तेषाम् योगवित्तमाः के ?**

अर्जुन म्हणाला— याप्रमाणें (पूर्वाध्यायांतील शेवटच्या श्लोकांत सांगितल्याप्रमाणें) नित्य कर्मयोगयुक्त असलेले, जे भक्तियुक्त होतसाते तुझी (व्यक्त स्वरूपाची) उपासना करितात, व त्याचप्रमाणें जे (कर्मयोगयुक्त) अव्यक्त ब्रह्मतत्त्वाची उपासना करितात, त्यांपैकीं श्रेष्ठ कर्मयोगी कोण ?

[ या श्लोकांतील 'सततयुक्त' हें पद व्यक्त व अव्यक्त ह्या दोन्ही प्रकारच्या उपासकांस सारखेंच लागू आहे, हें शेवटच्या 'योगवित्तम' ह्या पदावरून उघड

होत आहे. यावरून व्यक्त व अव्यक्त अशा दोन्ही प्रकारच्या उपासकांना कर्मयोग सारखाच अवश्य आहे, हें निश्चित जाणूनच अर्जुन उपासनेच्या दोन प्रकारांमधील तारतम्य विचारीत आहे. संन्यास व कर्मयोग ह्या दोहोंतील तारतम्य येथें विचारीत नाहीं. कारण पूर्वीच पांचव्या अध्यायांत याचा पूर्ण खुलासा झालेला आहे.]

**श्रीभगवानुवाच**

**मय्यावेश्य मनो ये मां नित्ययुक्ता उपासते**
**श्रद्धया परयोपेतास्ते मे युक्ततमा मताः २**

**नित्ययुक्ताः ये परया श्रद्धया उपेताः, मयि मनः आवेश्य माम् उपासते, ते मे युक्ततमाः मताः ॥**

श्रीभगवान् म्हणाले—नित्य कर्मयोगयुक्त असलेले जे श्रेष्ठ श्रद्धेनें युक्त असून माझ्या (व्यक्त स्वरूपाच्या) ठिकाणीं अंतःकरण प्रविष्ट करून माझी उपासना करितात ते मला अत्यंत श्रेष्ठ कर्मयोगी वाटतात.

[ या श्लोकांत 'श्रद्धा'ह्या पदांत उपलक्षणानें भक्तिमार्गास अवश्य असलेलें ज्ञानविज्ञान, प्रेम इत्यादि गुणांचाही समावेश होतो. येथें अव्यक्तोपासनेपेक्षां व्यक्तोपासनाच श्रेष्ठ आहे असें भगवंतांनीं स्पष्ट विधान केलें आहे.]

**ये त्वक्षरमनिर्देश्यमव्यक्तं पर्युपासते**
**सर्वत्रगमचिंत्यं च कूटस्थमचलं ध्रुवम् ३**
**सन्नियम्येंद्रियग्रामं सर्वत्र समबुद्धयः**
**ते प्राप्नुवंति मामेव सर्वभूतहितेरताः ४**

**सर्वत्र समबुद्धयः, सर्वभूतहिते रताः ये तु इंद्रियग्रामम् सन्नियम्य, अक्षरम्, अनिर्देश्यम्, सर्वत्रगम्, अचिंत्यम्, कूटस्थम्, अचलम्, ध्रुवम्, अव्यक्तम् च पर्युपासते ते मामेव प्राप्नुवंति ।**

परंतु, सर्वत्र ज्यांची समबुद्धि झाली आहे, व सर्व प्राण्यांचें हित करण्याविषयीं जे तत्पर आहेत असे जे (कर्मयोगी) इंद्रियसमूहाचें (शुद्ध बुद्धीनें) नियमन करून, अविनाशी, दाखविण्यास अशक्य, सर्वव्यापक, अचिंत्य, बुद्धीचें अधिष्ठान, अचल व अव्यय अशा अव्यक्ताची उपासना करितात, तेही मलाच (परमेश्वरालाच) प्राप्त होतात.

[ ह्या श्लोकांतील 'समबुद्धि', 'सर्वभूतहित' व 'इंद्रियनियमन' या पदांवरून येथें अव्यक्तोपासकही कर्मयोगीच आहे असें उघड सिद्ध होतें. अव्यक्तोपासना व व्यक्तोपासना ह्या दोहोंचेंही पर्यवसान एकच आहे, हें 'मामेव प्राप्नुवंति' (मलाच प्राप्त होतात) ह्या पदांवरून स्पष्ट केलें आहे.]

क्लेशोऽधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम्
अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते ५

अव्यक्तासक्तचेतसाम् तेषाम् क्लेशः अधिकतरः। हि देहवद्भिः अव्यक्ता गतिः दुःखम् अवाप्यते।

अव्यक्त तत्त्वामध्यें ज्यांचें चित्त निमग्न झालें आहे, त्यांना (व्यक्तोपासकांपेक्षां) कष्ट अधिक असतात. कारण मानवी प्राण्यांना अव्यक्त तत्त्वाची प्राप्ति (मोठ्या) कष्टानें होते.

[ अव्यक्तोपासना म्हणजे केवळ ब्रह्मज्ञान संपादन करणें व त्याचा साक्षात्कार होणें, ह्या दोन्ही गोष्टी व्यक्तोपासनेपेक्षां फारच कष्टसाध्य असतात. कारण, त्यांत व्यक्तोपासनेप्रमाणें निर्गुण ब्रह्मतत्त्व कोणत्याही नात्यानें इंद्रियगोचर होण्यासारखें नसतें व ज्ञानेंद्रियांचें साह्य नसल्यानें साक्षात्कारासही कालावधि लागतो.]

ये तु सर्वाणि कर्माणि मयि संन्यस्य मत्पराः
अनन्येनैव योगेन मां ध्यायंत उपासते ६
तेषामहं समुद्धर्ता मृत्युसंसारसागरात्
भवामि न चिरात्पार्थ मय्यावेशितचेतसाम् ७

पार्थ ये तु मत्पराः, अनन्येन एव योगेन ध्यायंतः, मयि सर्वाणि कर्माणि संन्यस्य माम् उपासते, मयि आवेशितचेतसाम् तेषाम् अहम् मृत्युसंसारसागरात् न चिरात् समुद्धर्ता भवामि।

परंतु, हे अर्जुना, जे परमेश्वरपरायण असून (पूर्वोक्त) अनन्य भक्तीनें (माझें) चिंतन करीत माझ्या (परमेश्वराच्या) ठिकाणीं सर्व कर्मफलें समर्पण करून माझी उपासना करितात (कर्मयोगस्वरूपानें ईश्वरोपासना करितात) (व) ज्यांनीं माझ्या (परमेश्वराच्या) ठिकाणीं आपलें अंतःकरण स्थिर केलें आहे, त्यांचा मी जन्ममृत्युरूप भवसागरांतून लवकर उद्धार करणारा होतों ( करीत असतों.)

[ व्यक्तोपासनेंत, ज्ञानेंद्रियांचाही उपयोग होत असल्यामुळें, एकट्या बुद्धीलाच सर्व श्रम पडत नाहींत, व साक्षात्कार होण्यासही विलंब लागत नाहीं असें 'न चिरात्' ह्या पदावरून स्पष्ट होतें. ह्यावरूनच अव्यक्तोपासनेपेक्षां व्यक्तोपासना श्रेष्ठ आहे, असें येथें श्लोक २ यांतील विधानाचें निगमन केलें आहे.]

ह्याप्रमाणें व्यक्तिशः व्यक्तोपासनाच श्रेष्ठ ठरत असल्यामुळें वरील सामान्य विवेचनाचा आतां अर्जुनास उपदेश करितात.

**मय्येव मन आधत्स्व मयि बुद्धिं निवेशय**
**निवसिष्यसि मय्येव अत ऊर्ध्वं न संशयः ८**

**मयि एव मनः आधत्स्व, मयि बुद्धिम् निवेशय, अतः ऊर्ध्वम् मयि एव निवसिष्यसि, संशयः न ।**

माझ्याच ठिकाणीं मन (व इंद्रियें) स्थापन कर. माझ्यामध्येंच बुद्धि प्रविष्ट कर, (म्हणजे) त्यानंतर माझ्याच ठिकाणीं राहशील, (मत्स्वरूप होशील) यांत संशय नाहीं.

[ बुद्धीला परमेश्वराचें यथार्थ ज्ञान झालें म्हणजे तिचा परमेश्वराचे ठिकाणीं निवेश झाला असें म्हणावयाचें, व हीच बुद्धि नितांत शुद्ध होय. अशा भगवत्-ज्ञानानें प्रकाशमय झालेल्या सात्त्विक बुद्धीचें नियमन मन व इंद्रियें यांजवर चालूं लागलें म्हणजे तींही शुद्ध व ईश्वरनिष्ठ झालीं असें म्हणतां येतें. ह्याप्रमाणें ज्याची बुद्धि, मन व इंद्रियें हीं ईश्वरनिष्ठ झालेलीं असतात, तो पुरुष ईश्वरस्वरूप होतो, म्हणजे तो ज्ञानैश्वर्यसंपन्न होऊन, त्याचीं कर्में स्वार्थशून्य, उपासनामय व केवळ लोक-संग्रहार्थ चालू असतात. श्लोक २ ते ७ पर्यंत केलेल्या सामान्य विवेचनाचा विशेष (व्यक्तिशः) उपदेश अर्जुनाला वरील श्लोकांत केला आहे.]

ह्याप्रमाणें परमेश्वररूप होण्याचें मुख्य साधन जी अंतःकरणाची ईश्वरविषयक स्थिरता, ती प्राप्त होण्याचे मार्ग सांगतात.

**अथ चित्तं समाधातुं न शक्नोषि मयि स्थिरम्**
**अभ्यासयोगेन ततो मामिच्छाप्तुं धनंजय ९**

**धनंजय, अथ मयि चित्तम् स्थिरम् समाधातुम् न शक्नोषि, ततः अभ्यासयोगेन माम् आप्तुम् इच्छ ।**

अर्जुना, जर माझ्या (परमेश्वराच्या) ठिकाणीं चित्त स्थिर

ठेवणें तुला शक्य नसेल तर अभ्यासयोगानें (अ. ६, श्लोक २४ ते २८ यांत सांगितल्याप्रमाणें पुनःपुन्हा चित्त स्थिर करण्याच्या प्रयत्नानें) मला प्राप्त होण्याची इच्छा ठेव.

**अभ्यासेऽप्यसमर्थोऽसि मत्कर्मपरमो भव**
**मदर्थमपि कर्माणि कुर्वन्सिद्धिमवाप्स्यसि १०**

**अभ्यासे अपि असमर्थः असि ( चेत् ) मत्कर्मपरमः भव। कर्माणि मदर्थम् कुर्वन् अपि सिद्धिम् अवाप्स्यसि।**

अभ्यासाविषयीं देखील तूं असमर्थ असशील तर, ईश्वरार्पण कर्में करणारा हो. (सर्व) कर्में माझ्याकरितां (ईश्वराकरितां) करूनदेखील तुला सिद्धि (८ व्या श्लोकांत सांगितलेली परमेश्वरप्राप्तिरूप सिद्धि) मिळेल. (या श्लोकांतील सिद्धि व अ. ३, श्लोक ४ मध्यें सांगितलेली नैष्कर्म्यसिद्धि एकच आहे.)

**अथैतदप्यशक्तोऽसि कर्तुं मद्योगमाश्रितः**
**सर्वकर्मफलत्यागं ततः कुरु यतात्मवान् ११**

**अथ एतत् अपि कर्तुम् अशक्तः असि, ततः मद्योगम् आश्रितः यतात्मवान् सर्वकर्मफलत्यागम् कुरु।**

जर हें (ईश्वरार्थ कर्म) देखील करण्यास असमर्थ असशील तर, (पूर्वोक्त) माझ्या (ईश्वराच्या म्हणजे भगवदुपासनेच्या हेतूनें) भक्तियोगाचा आश्रय करून, मनोनिग्रहपूर्वक सर्व कर्मांच्या फलाचा त्याग कर. (कर्मांच्या फलांविषयीं आसक्ति ठेवूं नको.)

[ कर्मफलत्याग हाच कर्मयोगांतील पहिला धडा होय. ह्यापासूनच क्रमानें कर्मयोगाची पूर्णता होऊन मोक्षप्राप्ति होते.]

कर्मफलत्याग दहाव्या श्लोकांत सांगितलेल्या सिद्धीला ( नैष्कर्म्यसिद्धीला ) कसा उपयोगी पडतो तें सांगतातः—

**श्रेयो हि ज्ञानमभ्यासात् ज्ञानाद्ध्यानं विशिष्यते**
**ध्यानात्कर्मफलत्यागस्त्यागाच्छांतिरनंतरम् १२**

**हि अभ्यासात् श्रेयः ज्ञानम्। ज्ञानात् ध्यानम्। ध्यानात् कर्मफलत्यागः विशिष्यते। त्यागात् अनंतरम् शांतिः।**

कारण अभ्यासापासून प्राप्त होणारें श्रेय (फल) (विज्ञानासह) ज्ञान होय. ज्ञानापेक्षां (ज्ञानपूर्वक) ध्यान श्रेष्ठ, व ध्यानापेक्षां (ज्ञानपूर्वक) कर्मफलत्याग श्रेष्ठ आहे. (कर्मफलाच्या ज्ञानपूर्वक) त्यागापासून लवकर शांति (मोक्ष) प्राप्त होते.

[ ज्ञान हेंच मोक्षाचें साधन असल्यामुळें, कर्मयोग किंवा कर्मसंन्यास ह्या कोणत्याही मार्गांत त्याची सारखीच आवश्यकता आहे. चित्तस्थैर्य हें ज्ञानाचेंच लक्षण असून, तें संपादन करण्याचीं तीन साधनें ९,१० व ११ ह्या श्लोकांत सांगितलीं आहेत. ह्या सर्व साधनांत कर्मफलत्याग हें साधन सोपें व श्रेष्ठ ठरविलें आहे. कारण, अगदीं प्रारंभीं करावयाचा कर्मफलत्याग केवळ श्रद्धापूर्वक असतो व तोच फलत्याग ज्ञानप्राप्तीनंतर ज्ञानपूर्वक होत असल्यामुळें, तो मोक्षप्राप्ति लवकर होण्यास उपयोगी पडतो. ह्या कर्मयोगमार्गांत साधकाचा अधिकार जसजसा वाढत जातो, तसतसा त्याला कर्मांच्या बाह्य स्वरूपांत फरक करावा लागत नाहीं. फरक फक्त बुद्धींत होत असतो. ज्ञानाच्या परिपाकास ध्यान व कर्मफलत्याग अशीं दोन साधनें आहेत. त्यांपैकीं, ध्यानापेक्षां कर्मफलत्यागानें सिद्धि लवकर होते असें येथें स्पष्ट सांगितलें आहे. ( अध्याय ५, श्लोक ६ यावरील विवरण पाहा.)]

ह्याप्रमाणें पूर्ण कर्मयोगी भक्त कसा असतो, हें सांगतातः—

अद्वेष्टा सर्वभूतानां मैत्रः करुण एव च
निर्ममो निरहंकारः समदुःखसुखः क्षमी १३
संतुष्टः सततं योगी यतात्मा दृढनिश्चयः
मय्यर्पितमनोबुद्धिर्यो मद्भक्तः स मे प्रियः १४

सर्वभूतानाम् अद्वेष्टा, मैत्रः, करुणः एव च, निर्ममः, निरहंकारः, समदुःखसुखः, क्षमी, संतुष्टः, सततम् योगी, यतात्मा, दृढनिश्चयः मयि अर्पितमनोबुद्धिः, यः मद्भक्तः सः मे प्रियः ।

सर्व प्राणिमात्रांविषयीं निर्वैर, मित्र, दयाशील, त्याचप्रमाणें ममतारहित, अहंकारशून्य, सुखदुःखाविषयीं समबुद्धि (रागद्वेष न मानणारा), क्षमाशील (शरणागतास क्षमा करणारा), संतुष्ट ( निर्योगक्षेम ), नेहमीं कर्तव्यतत्पर, मनोनिग्रही, दृढनिश्चयी आणि माझे ( ईश्वराचे )

ठिकाणींच मन व बुद्धि अर्पण करणारा असून, जो माझा भक्त असतो, तो मला प्रिय होतो.

**यस्मान्नोद्विजते लोको लोकान्नोद्विजते च यः**
**हर्षामर्षभयोद्वेगैर्मुक्तो यः स च मे प्रियः १५**

**लोकः यस्मात् न उद्विजते च यः लोकात् न उद्विजते, यः हर्षामर्षभयोद्वेगैः मुक्तः च सः मे प्रियः।**

ज्याच्यामुळें लोकांना त्रास होत नाहीं, व जो लोकांमुळें त्रासत नाहीं, आणि जो हर्ष, क्रोध, भय, व त्रास यांपासून मुक्त असतो, तो मला (परमेश्वराला) प्रिय होतो.

**अनपेक्षः शुचिर्दक्ष उदासीनो गतव्यथः**
**सर्वारंभपरित्यागी यो मद्भक्तः स मे प्रियः १६**

**अनपेक्षः, शुचिः, दक्षः, उदासीनः, गतव्यथः, सर्वारंभपरित्यागी यः मद्भक्तः सः मे प्रियः।**

निस्पृह, पवित्र, कर्तव्यतत्पर, अनासक्त, निश्चिंत व सर्व कर्मफलांचा त्याग करणारा, (गीताशास्त्राप्रमाणें कर्मत्याग अशक्य असल्यामुळें, कर्मत्याग म्हणजे फलत्याग असाच अर्थ घेणें अवश्य आहे ) असा जो माझा (परमेश्वराचा) भक्त असतो तोच मला प्रिय होतो.

**यो न हृष्यति न द्वेष्टि न शोचति न कांक्षति**
**शुभाशुभपरित्यागी भक्तिमान्यः स मे प्रियः १७**

**यः न हृष्यति, न द्वेष्टि, न शोचति, न कांक्षति, शुभाशुभपरित्यागी, यः भक्तिमान् सः मे प्रियः।**

जो (कशाचाही) हर्ष मानीत नाहीं, द्वेष करीत नाहीं, शोक करीत नाहीं, उत्कट इच्छा ठेवीत नाहीं, आणि शुभ किंवा अशुभ कर्मफलांचा त्याग करणारा असून जो भक्तिमान् असतो तो मला प्रिय होतो.

**समः शत्रौ च मित्रे च तथा मानापमानयोः**
**शीतोष्णसुखदुःखेषु समः संगविवर्जितः १८**

**तुल्यनिंदास्तुतिर्मौनी संतुष्टो येनकेनचित्**
**अनिकेतः स्थिरमतिर्भक्तिमान्मे प्रियो नरः** १९

शत्रौ च मित्रे च तथा मानापमानयोः समः, शीतोष्णसुखदुःखेषु समः, संगविवर्जितः, तुल्यनिंदास्तुतिः, मौनी, येनकेनचित् संतुष्टः अनिकेतः, स्थिरमतिः, भक्तिमान् नरः मे प्रियः।

शत्रु आणि मित्र यांविषयीं त्याचप्रमाणें मान किंवा अपमान यांविषयीं ज्याची बुद्धि सारखी असते, (शत्रुमित्रांविषयीं सारखीच हितबुद्धि व मानापमानाविषयीं चित्ताची सारखीच स्थिरता म्हणजे समबुद्धि), शीत, उष्ण, सुखदुःख यांमध्यें सम म्हणजे शांत (तितिक्षावान्), आसक्तिरहित, निंदा व स्तुति सारखीच (उपेक्ष्य) मानणारा, विचारवान्, ज्या वेळीं जें असेल त्यांत संतोष मानणारा (प्राप्तपरिस्थितीविषयीं कुरकुर न करणारा), कोणाचा आश्रय न करणारा (दुसऱ्यावर अवलंबून न राहणारा), स्थितप्रज्ञ व भक्तिमान् पुरुष मला (परमेश्वराला) प्रिय होतो.

**ये तु धर्म्यामृतमिदं यथोक्तं पर्युपासते**
**श्रद्दधाना मत्परमा भक्तास्तेऽतीव मे प्रियाः** २०

ये श्रद्दधानाः मत्परमाः यथोक्तम् इदम् धर्म्यामृतम् पर्युपासते, ते भक्ताः तु मे अतीव प्रियाः।

जे श्रद्धावान् व ईश्वरपरायण असून वर सांगितलेलें धर्मरहस्यरूपी अमृत सेवन करितात (त्याप्रमाणें आचरण करितात) ते भक्त तर मला (परमेश्वराला) फारच प्रिय होतात.

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायाम् योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे भक्तियोगो नाम द्वादशोऽध्यायः।

याप्रमाणें श्रीभगवंतांनीं गाइलेल्या उपनिषदांतील ब्रह्मविद्यांतर्गत कर्मयोगशास्त्राविषयींच्या श्रीकृष्ण व अर्जुन ह्यांच्या संवादांतील 'भक्तिप्रकरण' नांवाचा बारावा अध्याय समाप्त झाला.

# बाराव्या अध्यायाचा उपसंहार

## बाराव्या अध्यायाची विषयानुक्रमणिका



स्थितप्रज्ञ कर्मयोग्यांनीं करावयाच्या उपासनेचे व्यक्त व अव्यक्त असे दोन प्रकार भगवंतांनीं सांगितले. ह्या दोन प्रकारांच्या उपासनेंत तत्त्वतः भेद नसला तरी, स्वरूपतः त्या दोन्ही भिन्न दिसतात, म्हणून त्यांत तारतम्य उत्पन्न होणें अपरिहार्य आहे. हें तारतम्य समजून घेण्याकरितांच अर्जुनानें प्रथम प्रश्न केला आहे. त्यावरून भगवंतांनीं श्लोक २ ते ७ अखेर व्यक्तोपासनाविशेषाधिकरणांत अव्यक्त उपासना किती कष्टसाध्य व कालावधीची आहे हें प्रथम दाखवून, त्यापेक्षां व्यक्तोपासना कमी श्रमाची, शीघ्र फलदायक व अधिक उपयुक्त असल्यामुळें तीच श्रेष्ठ आहे असें सिद्ध केलें आहे. व ८ व्या श्लोकांत, ज्ञानविज्ञानयुक्त व्यक्तोपासना केल्यानेंच परमेश्वरप्राप्ति होते, ह्यासाठीं तूं तिचाच स्वीकार कर असा अर्जुनास उपदेश केला आहे. पुढें श्लोक ९, १० व ११ यांत व्यक्तोपासनेचीं साधनें सांगून, त्यांत मनोनिग्रहपूर्वक भक्तियुक्त अंतःकरणानें केलेला कर्मफलत्याग साधक व सिद्ध या दोन्ही अवस्थांत अवश्य व जगाच्या धारण पोषणास उपयोगी पडणारा असून तो मोक्षदायक असल्यामुळें सर्वांत श्रेष्ठ आहे, असें १२ व १३ या श्लोकांत ठरविलें आहे. यानंतर १३, १४ व १५ या श्लोकांत स्थितप्रज्ञ कर्मयोगी भगवद्भक्तांचीं लक्षणें सांगून त्यांचें विवरण श्लोक १५ ते १९ अखेर केलें आहे. हीं सर्व लक्षणें अध्याय २ श्लोक ४५ यांतील बुद्धियोगाच्या पांचही अंशांत अंतर्भूत होतात. शेवटीं २० व्या श्लोकांत, हीं सर्व लक्षणें नुसतीं ज्ञानाकरितां सांगितलीं नसून तीं प्रत्यक्ष आचरणांत आलीं पाहिजेत, असें दर्शविलें आहे व ह्या लक्षणा-

नुरूप ज्यांचें प्रत्यक्ष आचरण असेल, ते भक्तच परमेश्वरास अत्यंत प्रिय होतात असें स्पष्ट सांगून अध्यायाची परिसमाप्ति केली आहे. सारांश, ज्ञानविज्ञानानें शुद्ध झालेल्या बुद्धीचें मनावर नियमन ठेवून, भक्तिपूर्वक परमेश्वराच्या विश्वरूपाची सेवा केवळ लोकसंग्रहार्थ कर्तव्यबुद्धीने यावज्जीव करीत राहणें, हेंच येथपर्यंतच्या सर्व विवेचनाचें तात्पर्य आहे.



# त्रयोदशोऽध्यायः।

आठव्या अध्यायांतील अर्जुनाच्या सात प्रश्नांपैकीं, १ प्रयाणकालीन ईशस्मरण, २ अधियज्ञ, ३ अधिदैव व ४ अधिभूत या प्रश्नांचें विवरण ८,९,१० व ११ ह्या अध्यायांत अनुक्रमानें केल्यावर १२ व्या अध्यायांत व्यक्तोपासनेचें महत्त्व सांगितलें आहे. आतां क्रमाप्रमाणें कर्माचें म्हणजे प्रकृतिपुरुषांच्या विश्वोत्पादक व्यापाराचें विवेचन करणें हा ह्या अध्यायांतील प्रतिपाद्य विषय आहे. ह्या कर्माच्या ज्ञानास प्रकृतिपुरुष व त्यांचें अधिष्ठान ब्रह्मतत्त्व यांचें ज्ञान अवश्य असल्यामुळें त्यांचें विवेचन ह्या अध्यायांत प्रथम केलें आहे.

प्रथम प्रकृति व पुरुष म्हणजे क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांचें स्वरूप सांगतातः—

**श्रीभगवानुवाच**

**इदं शरीरं कौंतेय क्षेत्रमित्यभिधीयते**
**एतद्यो वेत्ति तं प्राहुः क्षेत्रज्ञ इति तद्विदः** १

**कौंतेय, इदम् शरीरम् क्षेत्रम् इति अभिधीयते। यः एतत् वेत्ति तम् क्षेत्रज्ञः इति तद्विदः प्राहुः।**

श्रीभगवान् म्हणाले — अर्जुना, ह्या शरीराला क्षेत्र अशी संज्ञा आहे. ह्याला (क्षेत्राला) जो जाणतो, त्याला क्षेत्रज्ञ असें तज्ज्ञ (अध्यात्मवेत्ते) म्हणतात.

[ जीवात्मा व परमात्मा आणि पिंड व ब्रह्मांड यांचाच विचार मुख्यत्वेंकरून वेदान्तशास्त्रांत असल्यामुळें, ह्या श्लोकांत शरीर किंवा पिंड म्हणजे क्षेत्र, व आत्मा म्हणजे क्षेत्रज्ञ ( पिंडाचा ज्ञाता ) अशा वेदान्तशास्त्रांतील संज्ञा प्रथम सांगितल्या आहेत.]

क्षेत्रक्षेत्रज्ञ यांचा परस्परसंबंध व क्षेत्रज्ञाचें तात्त्विक स्वरूप सांगतात—

**क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि सर्वक्षेत्रेषु भारत**
**क्षेत्रक्षेत्रज्ञयोर्ज्ञानं यत्तज्ज्ञानं मतं मम** २

**भारत, सर्वक्षेत्रेषु अपि क्षेत्रज्ञम् माम् विद्धि। च यत् क्षेत्रक्षेत्रज्ञयोः ज्ञानम् तत् मम ज्ञानम् मतम्।**

अर्जुना, सर्वहि क्षेत्रांमध्यें असणारा क्षेत्रज्ञ म्हणजे आत्मा मी

(परमात्मा) आहें असें समज. आणि जें क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांचें यथार्थ ज्ञान तेंच माझें (परमात्म्याचें) ज्ञान, असें माझें निश्चित मत आहे.

[ विश्वामध्यें सृष्टपदार्थ जरी असंख्य असले तरी त्या सृष्टपदार्थांमध्यें (क्षेत्रांमध्यें) असणारा ज्ञाता म्हणजे आत्मा एकच असून तोच परमात्मा होय. असंख्य क्षेत्रां-प्रमाणें क्षेत्रज्ञ आत्मे अनेक नाहींत, आत्मतत्त्व सर्वत्र एकच आहे. क्षेत्रज्ञान म्हणजे सृष्टीचें ज्ञान व क्षेत्रज्ञाचें ज्ञान म्हणजे आत्म्याचें ज्ञान. अर्थात् क्षेत्रक्षेत्रज्ञ-ज्ञान म्हणजेच ईश्वरी ज्ञान होय, असें येथें भगवंतांनीं विधान केलें आहे. अ. ७, श्लोक २ यांत सांगितल्याप्रमाणेंच येथेंही ज्ञानविज्ञानासारखीच क्षेत्रक्षेत्रज्ञ–ज्ञानाची आवश्यकता भगवंतांनीं दाखविली आहे.]

आतां प्रथम क्षेत्राचें स्वरूप सांगतात—

**तत्क्षेत्रं यच्च यादृक् च यद्विकारि यतश्च यत्**
**स च यो यत्प्रभावश्च तत्समासेन मे शृणु ३**

**यत् च यादृक् च यद्विकारि यतः यत् च, तत् क्षेत्रम् । सः च यः यत्प्रभावः तत् मे समासेन शृणु ।**

जें जसें ज्याचें बनलेलें, ज्याच्यापासून जें झालें तें क्षेत्र आणि तो (क्षेत्रज्ञ), जो व ज्या सामर्थ्याचा आहे, हें (सर्व) माझ्यापासून संक्षेपानें ऐक.

[ हें क्षेत्र म्हणजे काय, तें कसें असतें, कशाचें बनतें, तें कोण बनवितो, त्याचप्रमाणें क्षेत्रज्ञ कोण व त्याचें सामर्थ्य काय असतें, हें थोडक्यांत भगवान् पुढें सांगणार आहेत.]

क्षेत्र क्षेत्रज्ञ यांचें विस्तृत विवेचन कोणीं कोठें केलें आहे तें सांगतात.

**ऋषिभिर्बहुधा गीतं छंदोभिर्विविधैः पृथक्**
**ब्रह्मसूत्रपदैश्चैव हेतुमद्भिर्विनिश्चितैः ४**

**ऋषिभिः विविधैः छंदोभिः, हेतुमद्भिः विनिश्चितैः ब्रह्मसूत्रपदैः च एव बहुधा पृथक् गीतम् ॥**

( हें क्षेत्रक्षेत्रज्ञज्ञान ) ऋषींनीं अनेक श्रुतिमंत्रांतून व सयुक्तिक आणि निश्चयार्थक ब्रह्मप्रतिपादक सूत्रमय वाक्यांतून निरनिराळ्या अनेक प्रकारांनीं विवेचनपूर्वक (निवडकपणानें) गाइलें (वर्णन केलें)आहे.

[ अध्यात्मज्ञान आवश्यक तेवढेंच येथें सांगावयाचें असल्यामुळें, तिसऱ्या श्लोकांत तें 'संक्षेपानें ऐक' असें भगवंतांनीं सांगितलें आहे. त्याचा विस्तार कोठें आहे हें सांगण्याकरितां भगवंतांनीं या श्लोकांत उपनिषदें व ब्रह्मसूत्रें ( ब्रह्मज्ञान प्रतिपादक सूत्रें ) यांचा उल्लेख केला आहे.

या श्लोकांतील 'ब्रह्मसूत्र' या शब्दाबद्दल ग्रन्थकारांत अनेक मतभेद आहेत. कारण गीता हा ग्रन्थ व ब्रह्मसूत्र म्हणून आज प्रसिद्ध असलेला ग्रन्थ या दोहों-तील पौर्वापर्य निश्चित होण्यावर याचा निर्णय अवलंबून आहे. गीतेंत ज्याप्रमाणें ब्रह्मसूत्राचा स्पष्ट निर्देश आहे, त्याप्रमाणें ब्रह्मसूत्रांत गीतेचा स्पष्ट निर्देश नाहीं. त्यावरून सूत्रग्रन्थ गीतेच्या अगोदरचा आहे असें सकृद्दर्शनीं भासतें. परंतु वस्तु-स्थिति तशी नाहीं. ब्रह्मसूत्राचा कर्ता म्हणून बादरायण व्यास हें एकच नांव प्रसिद्ध असलें तथापि या सूत्रग्रन्थातच कमींतकमी सातआठ ऋषींचीं नांवें आलीं आहेत. यावरून असें दिसतें कीं, गीतेच्या पूर्वी ब्रह्मसूत्रें अस्तित्वांत असलीं पाहिजेत. मात्र आजच्यासारखीं स्वतंत्र ग्रन्थरूपानें अस्तित्वांत नव्हतीं. उपनिषदांतील निरनिराळया प्रकरणांवर अगर शब्दांवर अनेक ऋषींनीं संक्षिप्त टीकांप्रमाणें हीं वाक्यें लिहून ठेविलीं असावींत किंवा शिष्यांना पढविलीं असावीत. ज्या मानानें गीतेच्या पूर्वी उपनिषद्वाङ्मय तयार झालें असेल त्या मानानें त्या त्या उपनिषदाबरोबर हीं सूत्रेंही अस्तित्वांत आलीं असून अध्ययनक्रमामध्यें त्यांचा समावेश झाला असला पाहिजे. अर्थात् गीतेंत आलेला हा 'ब्रह्मसूत्र' शब्द सूत्र-ग्रन्थाचा वाचक नसून उपनिषद्वाङ्मयांतील निरनिराळया ऋषींनीं दिलेल्या स्फुट सूत्रांचा वाचक आहे असें समजणें सयुक्तिक आहे.]

**महाभूतान्यहंकारो बुद्धिरव्यक्तमेव च**
**इंद्रियाणि दशैकं च पंच चेंद्रियगोचराः ५**
**इच्छा द्वेषः सुखं दुःखं संघातश्चेतना धृतिः**
**एतत् क्षेत्रं समासेन सविकारमुदाहृतम् ६**

**महाभूतानि, अहंकारः, बुद्धिः, अव्यक्तम् एव, च इंद्रियाणि दश एकम् च, पंच इंद्रियगोचराः च, इच्छा, द्वेषः सुखम्, दुःखम्, संघातः चेतना, धृतिः, एतत् सविकारम् क्षेत्रम् समासेन उदाहृतम् ॥**

महाभूतें (पृथ्वी, आप, तेज, वायु व आकाश), अहंकार, बुद्धि,

व अव्यक्त प्रकृतिमात्र, दहा इंद्रियें, (पांच कर्मेंद्रियें, व पांच ज्ञानेंद्रियें ) व एक (अंतरिंद्रिय मन) व (ज्ञानेंद्रियांचे) पांच विषय (शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध) इच्छा, द्वेष, सुख, दुःख, संघात, म्हणजे देह व इंद्रियें यांचा संयोग, चेतना (जीवनशक्ति) धृति (धारणाशक्ति) हें (ह्या सर्वांचा समुदाय) विकारांनीं युक्त (प्रकृतिविकाररूप) क्षेत्र तुला संक्षेपानें सांगितलें आहे.

[ ह्या श्लोकांत सांख्यशास्त्राचीं २४ तत्त्वें व वैशेषिकांचे द्रव्यगुणादि पदार्थ या सर्वांचा क्षेत्रांतच अंतर्भाव केलेला आहे. वैशेषिकांनीं आत्म्याचा द्रव्यांतच अंतर्भाव केला आहे, तथापि तें मत वेदान्तशास्त्रास व गीतेसही मान्य नाहीं.]

आतां ज्ञानाचीं साधनें सांगतात—

**अमानित्वमदंभित्वमहिंसा क्षांतिरार्जवम्**
**आचार्योपासनं शौचं स्थैर्यमात्मविनिग्रहः ७**
**इंद्रियार्थेषु वैराग्यमनहंकार एव च**
**जन्ममृत्युजराव्याधिदुःखदोषानुदर्शनम् ८**
**असक्तिरनभिष्वंगः पुत्रदारगृहादिषु**
**नित्यं च समचित्तत्वमिष्टानिष्टोपपत्तिषु ९**
**मयि चानन्ययोगेन भक्तिरव्यभिचारिणी**
**विविक्तदेशसेवित्वमरतिर्जनसंसदि १०**
**अध्यात्मज्ञाननित्यत्वं तत्वज्ञानार्थदर्शनम्**
**एतज्ज्ञानमितिप्रोक्तमज्ञानं यदतोऽन्यथा ११**

अमानित्वम्,अदंभित्वम्, अहिंसा,क्षांतिः,आर्जवम्, आचार्योपासनम्, शौचम्,स्थैर्यम् ,आत्मविनिग्रहः, इंद्रियार्थेषु वैराग्यम्,अनहंकारः एव च,जन्ममृत्युजराव्याधिदुःखदोषानुदर्शनम्, असक्तिः, पुत्रदारगृहादिषु अनभिष्वंगः, इष्टानिष्टोपपत्तिषु नित्यम्, समचित्तत्वम् च, मयि अनन्ययोगेन अव्यभिचारिणी भक्तिः च, विविक्तदेशसेवित्वम्, जनसंसदि अरतिः, अध्यात्मज्ञाननित्यत्वम् तत्वज्ञानार्थदर्शनम्, एतत् ज्ञानम् इति प्रोक्तम्। यत् अतः अन्यथा (तत्) अज्ञानम् ॥

अमानित्व ( आत्मश्लाघेकडे प्रवृत्ति नसणें, म्हणजे लोकांनीं आपली स्तुति करावी किंवा आपल्याला मोठेपणा द्यावा, अशी इच्छा नसणें, ) दंभाचा म्हणजे पोकळ डौलाचा अभाव असणें, प्राणिमात्रास विनाकारण उपद्रव न देणें, क्षमाशीलता म्हणजे शरणागताला त्याच्या अपराधांची क्षमा करणें, ( मनाचा ) सरळपणा, गुरुजनांची शुश्रूषा करणें, ( अंतर्बाह्य ) पवित्र असणें, बुद्धि स्थिर ठेवणें, मनोनिग्रह करणें म्हणजे शुद्धबुद्धीचें मनावर नियमन ठेवणें, विषयोपभोगांविषयीं निरपेक्ष असणें, कर्तृत्वाभिमान न बाळगणें, जन्म, मरण, वार्धक्य व रोग इत्यादिकांतील दुःखरूप दोष नेहमीं ध्यानांत ठेवणें म्हणजे हीं सर्व दुःखासच कारण आहेत हें समजणें, फलाविषयीं आसक्ति न ठेवणें, पुत्र, स्त्री, घर ( संपत्ति ) इत्यादिकांतच गुरफटून न राहणें, बऱ्यावाईट ( कशाही ) परिस्थितींत नेहमीं सम म्हणजे शांतचित्त असणें, माझ्या ( परमेश्वराच्या ) ठिकाणीं अनन्यभावानें अस्खलित प्रेम ठेवणें, राहण्याचें ठिकाण पवित्र म्हणजे शुद्ध व स्वच्छ ठेवणें, विषयासक्त लोकांच्या संगतींत आनंद न मानणें, ज्ञानविज्ञानाची नेहमीं चर्चा करणें, ब्रह्मज्ञानाचें तत्त्व नेहमीं लक्षांत ठेवणें ह्या सर्व साधनांनीं प्राप्त होणारें, तें ज्ञान असें म्हणतात. आणि जें ह्याच्या विरुद्ध ( म्हणजे आत्मश्लाघा, दांभिकता, हिंसा वगैरे दुर्गुण ), तें अज्ञान ( म्हणजे अज्ञानोत्पादक किंवा अज्ञानाचें सहकारी ) होय.

[ अमानित्वादि गुणांना 'ज्ञान' असें म्हटलें आहे, त्याचें कारण, हे गुण ज्ञानास पोषक असून ज्ञानाच्या पूर्णतेबरोबरच त्यांचीही पूर्णता होत असते. शिवाय हे गुण ज्ञानाचे निदर्शक असल्यामुळें, त्यांचें वास्तव्य जेथें असेल तेथें ज्ञानाचेंही अस्तित्व आहे असें समजण्यास हरकत नाहीं. आत्मज्ञान व त्याचे निदर्शक वरील सद्गुण हे परमार्थांत व व्यवहारांत सारखेच आवश्यक असतात. त्याचप्रमाणें, अज्ञान व त्याचे निदर्शक दुर्गुण हे परमार्थ व व्यवहार ह्या दोहोंतही सारखेच त्याज्य असतात.]

आतां क्षेत्रज्ञ म्हणजे आत्मतत्त्व याचें स्वरूप व माहात्म्य सांगतात—

**ज्ञेयं यत्तत्प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वाऽमृतमश्नुते**
**अनादिमत्परं ब्रह्म न सत्तन्नासदुच्यते** १२

**यत् ज्ञेयं तत् प्रवक्ष्यामि, यत् ज्ञात्वा अमृतम् अश्नुते। ब्रह्म अनादिमत् परम्। तत् सत् न, असत् न (इति) उच्यते॥**

जें जाणावयाचें तें मी खुलासेवार सांगतों. तें जाणल्यानें (मनुष्यास) मोक्ष प्राप्त होतो. ब्रह्म हें आरंभयुक्त (ज्याची केव्हां तरी उत्पत्ति झाली आहे असें) नसून (परा व अपरा या दोन्ही प्रकृतींच्या) पलीकडचें आहे. तें सत् (व्यक्त) म्हणतां येत नाहीं, किंवा असत् (अव्यक्त)ही म्हणतां येत नाहीं.

[ह्या श्लोकांत नुसतें 'अनादि' असें पद न घालतां 'अनादिमत्' असें पद घातलें आहे. त्याचें कारण 'अनादि' या पदाचे, ज्याचा आरंभ समजत नाहीं किंवा ज्याला आरंभ नाहीं, असे दोन्ही अर्थ होऊं शकतात. परंतु प्रस्तुत स्थलीं दुसराच अर्थ विवक्षित आहे, हें निश्चित दाखविण्याकरितां 'अनादिमत्' असें पद घातलें आहे. कारण, 'मत्' ह्या प्रत्ययाचा अर्थ 'युक्त' असा होतो. म्हणून 'आदिमत्' या पदाचा अर्थ 'आदिचें ज्ञान' असा होत नसून आदिनें युक्त असाच निश्चित होतो. अर्थात् 'अनादिमत्' म्हणजे 'आरंभयुक्त नव्हे असें', हाच अर्थ निश्चित आहे. त्याचप्रमाणें ह्या श्लोकांतील 'सत्' व 'असत्' ह्या पदांचा अर्थ अनुक्रमें 'व्यक्त' व 'अव्यक्त' किंवा 'कार्य' व 'कारण' असाच केला पाहिजे. 'भाव' व 'अभाव' हे शब्द स्पष्टच आहेत. व तेथें आत्म्याचें अविनाशित्व सिद्ध करावयाचें आहे; परंतु येथें केवळ ज्ञेय म्हणजे आत्मतत्त्वच सांगावयाचें असून, तें सत्तास्वरूप आहे असें पूर्वीच सिद्ध झालें असल्यामुळें, येथें 'सत्' व 'असत्' म्हणजे 'भाव' व 'अभाव' असे अर्थ न घेतां, दुसरे 'व्यक्त' व 'अव्यक्त' किंवा 'कार्य' व 'कारण' हेच अर्थ घेणें अवश्य आहे.]

आतां आत्मतत्त्वाचें चालकत्व व व्यापकत्व सांगतात—

**सर्वतः पाणिपादं तत्सर्वतोऽक्षिशिरोमुखम्**
**सर्वतः श्रुतिमल्लोके सर्वमावृत्य तिष्ठति** १३

**लोके तत् सर्वतः पाणिपादम्, सर्वतः अक्षिशिरोमुखम्, सर्वतः श्रुतिमत्, सर्वम् आवृत्य तिष्ठति।**

विश्वामध्यें जें (ब्रह्मतत्त्व) ज्याचे हातपाय सर्वत्र ( भरले आहेत), ज्याचे डोळे, मस्तकें, मुखें सर्वत्र (भरलीं आहेत), ज्याचे कान सर्वत्र (भरले आहेत), असें (तें ब्रह्मतत्त्व) सर्व (विश्व) व्यापून राहिलें आहे.

[ ह्या श्लोकांतील कर्मेंद्रियांच्या उल्लेखानें पिंड-ब्रह्मांडांत सुरू असलेलें चलनात्मक कर्म, व ज्ञानेंद्रियांच्या उल्लेखानें पिंड-ब्रह्मांडांतील व्यावृत्ति व व्यवहाररूप ज्ञान दर्शविलें आहे. 'व्यावृत्ति' म्हणजे पदार्थाच्या आकारावरून इतर पदार्थांपासून तो भिन्न आहे असें ओळखणें, व 'व्यवहार' म्हणजे गुणधर्म आणि उपयोग ओळखणें ह्या दोहोंच्याही अस्तित्वास ब्रह्मतत्त्वच कारण असल्यामुळें, कर्माला कारण असलेले पिंडाचे अवयव व ब्रह्मांडांतील पदार्थ, आणि ज्ञानाला कारण असलेलीं पिंडाचीं ज्ञानेंद्रियें व ब्रह्मांडांतील शक्ति हीं ब्रह्मतत्त्वाचींच कर्मेंद्रियें व ज्ञानेंद्रियें आहेत, असें येथें म्हटलें आहे. जगांतील अनेक कार्यांचीं प्रत्यक्ष कारणें जरी निरनिराळीं दिसत असलीं तरी त्या सर्वांचें आदिकारण ब्रह्मतत्त्वच आहे, व त्याच्या एका अंशानेंच हें सर्व विश्व व्यापिलें आहे. असें १०व्या अध्यायाच्या शेवटींही सांगितलें आहे ]

**सर्वेंद्रियगुणाभासं सर्वेंद्रियविवर्जितम्**
**असक्तं सर्वभृच्चैव निर्गुणं गुणभोक्तृ च** १४

**सर्वेंद्रियगुणाभासम्, सर्वेंद्रियविवर्जितम्, असक्तम्, सर्वभृत्, च एव निर्गुणम्, गुणभोक्तृ च।**

(तें) सर्व इंद्रियांच्या गुणाचें म्हणजे शक्तीचें आभासक म्हणजे उद्बोधक किंवा प्रकाशक असून त्याला स्वतःला (ब्रह्मतत्त्वाला) कोणतेंही इंद्रिय नसतें, त्याचा कशाशीही संयोग नसतो, तें सर्व नामरूपात्मक सृष्टीला धारण करणारें असतें, ( सत्त्व, रज, तम इत्यादि ) गुणविरहित, पण गुणांचा उपभोग घेणारें असतें.

[ कर्मेंद्रियें व ज्ञानेंद्रियें यांचे ठिकाणीं जी कार्यक्षमता दिसते, ती ब्रह्मतत्त्वाच्या अधिष्ठानानेंच असते. ब्रह्मतत्त्व निष्क्रिय व निरवयव असल्यामुळें त्याला इंद्रियें

असण्याचा संभवच नाहीं, म्हणजे तें निरिंद्रिय असतें. ब्रह्मतत्त्वावांचून दुसरें कोणतेंही तत्त्वच नाहीं. संयोगास निदान दोन तरी पदार्थांची आवश्यकता असते. ब्रह्म अद्वैत असल्यामुळे त्याचे ठिकाणीं संयोगधर्म संभवतच नाहीं. तें सर्वाधार व निर्गुण आहे. अनुभव व उपभोग हीं ज्ञानाचींच स्वरूपें आहेत. ज्ञानाचा जो साक्षात्कार इंद्रियांच्या रागद्वेषांवर अवलंबून नसतो तो शुद्ध अनुभव होय. व जो साक्षात्कार इंद्रियांच्या रागद्वेषांवर अवलंबून असतो, म्हणजे रागद्वेषांस अनुसरून ज्याचें स्वरूप अनुकूल किंवा प्रतिकूल होतें तो भोग होय. यावरून अनुभव व भोग हे दोन्हीही साक्षात्कारच आहेत. साक्षात्कार हें ब्रह्मतत्त्वाचेंच स्वरूप असल्यामुळें, उपभोगाचें म्हणजे साक्षात्काराचें अधिष्ठान तेंच आहे. म्हणून त्याला सत्त्वादि गुणांचा उपभोग घेणारें असें म्हटलें आहे.]

**बहिरंतश्च भूतानामचरं चरमेव च**
**सूक्ष्मत्वात्तदविज्ञेयं दूरस्थं चांतिके च तत्** १५

भूतानाम् बहिः अंतः च अचरम् चरम् एव च तत् सूक्ष्मत्वात् अविज्ञेयम्, तत् दूरस्थम् च आंतिके च।

(ब्रह्मतत्त्व) सृष्टपदार्थांच्या बाहेर व आंतही ( आहे.) तें स्थिरही आहे व चर (संचारी) ही ( आहे.) तें अत्यंत विरल असल्यामुळें, इंद्रियगोचर नाहीं आणि तें दूरही आहे व जवळही आहे.

[ मूल प्रकृति ही ब्रह्मतत्त्वाचा विवर्त असल्यामुळें, त्या प्रकृतीपासून बनलेली सर्व सृष्टि अंतर्बाह्य ब्रह्मरूपच आहे. विश्वाच्या आंत किंवा बाहेर ब्रह्मतत्त्वावांचून मोकळी जागाच नसल्यामुळें ब्रह्मतत्त्वाचें चलन होण्यास अवकाशच नाहीं, म्हणून तें स्थिर आहे. त्याचप्रमाणें सृष्टीच्या अंतर्भागांत दिसणारें चलनवलन हें ब्रह्माच्या एकांशांत असलेल्या सृष्टीचें असल्यामुळें, तेंही सृष्टीप्रमाणेंच ब्रह्मरूप आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं इंद्रियद्वारा होणारें ज्ञान व्यावृत्तिस्वरूप किंवा व्यवहारस्वरूप असतें. परंतु ब्रह्मतत्त्वाला आकार किंवा गुणधर्म नसल्यामुळें त्याचें ज्ञान वरीलप्रमाणें इंद्रियद्वारा होणें शक्य नाहीं. तें सर्वव्यापक असल्यामुळें, दूरही असतें व जवळही असतें. म्हणजे सर्वत्र सारखेंच भरलेलें आहे.]

**अविभक्तं च भूतेषु विभक्तमिव च स्थितम्**
**भूतभर्तृ च तज्ज्ञेयं ग्रसिष्णु प्रभविष्णु च** १६

**अविभक्तम् च भूतेषु विभक्तम् इव स्थितम् च। तत् भूतभर्तृ च, ग्रसिष्णु प्रभविष्णु च ज्ञेयम् ॥**

तें (ब्रह्मतत्त्व) विभागलेलें नाहीं. तथापि सर्व पदार्थांत विभागलेलें आहेसें दिसतें. तें सृष्ट पदार्थांचें पोषण करणारें, लय करणारें, व उत्पत्ति करणारें आहे, असें समजावें.

[ ब्रह्मतत्त्व अविभाज्य असतां, नानाविध सृष्ट पदार्थांत त्याचें एकत्व सहज कळण्यासारखें नसल्यामुळें, त्या त्या पदार्थांत तें विभागल्यासारखें दिसतें.]

**ज्योतिषामपि तज्ज्योतिस्तमसः परमुच्यते**
**ज्ञानं ज्ञेयं ज्ञानगम्यं हृदि सर्वस्य धिष्ठितम्** १७

**तत् ज्योतिषाम् अपि ज्योतिः, तमसः परम् उच्यते, ज्ञानम्, ज्ञेयम् ज्ञानगम्यम्, सर्वस्य हृदि धिष्ठितम् ॥**

तें ( ब्रह्मतत्त्व ) सर्व तेजांचेंही तेज, व अंधकाराहून पलीकडचें आहे असें म्हणतात. ज्ञान (म्हणजे ज्ञानसहकारी अमानित्वादि गुण) ज्ञेय ( जाणण्यास अवश्य असें ब्रह्म ) व ज्ञानगम्य ( ह्या ब्रह्मज्ञानाच्या योगानें प्राप्त होणारें ब्रह्म म्हणजे मोक्षपद ) हें तिन्ही स्वरूपांचें एकच ब्रह्मतत्त्व सर्वांच्या बुद्धीमध्यें विशेषतः स्थित असतें.

[ सर्व तेजस्वी पदार्थांना त्यांचें तेज ब्रह्मापासूनच प्राप्त होतें, अर्थात् तें अंधकाराच्या पलीकडचें आहे. ब्रह्मज्ञान, ब्रह्म व मोक्ष यांचें तात्त्विक स्वरूप एकच आहे. हें ब्रह्मतत्त्व सर्वत्र सारखेंच भरलेलें आहे, तथापि बुद्धीचे ठिकाणीं ज्ञानग्राहक शक्ति अधिक असल्यामुळें, तेथें त्याचा विशेष स्पष्ट प्रत्यय येतो. म्हणून गीताशास्त्रांत बुद्धीलाच अत्यंत महत्त्व दिलें आहे.]

येथपर्यंत क्षेत्रक्षेत्रज्ञ व त्यांचें ज्ञान यांचें विवरण झालें. आतां क्षेत्र-क्षेत्रज्ञ-ज्ञानाचें फल सांगतातः—

**इति क्षेत्रं तथा ज्ञानं ज्ञेयं चोक्तं समासतः**
**मद्भक्त एतद्विज्ञाय मद्भावायोपपद्यते** १८

**इति क्षेत्रम् तथा ज्ञानम् ज्ञेयम् च समासतः उक्तम्। एतत् विज्ञाय मद्भक्तः मद्भावाय उपपद्यते।**

ह्याप्रमाणें क्षेत्र, तसेंच ज्ञान व ज्ञेय संक्षेपानें सांगितलें, हें विवेकपूर्वक ओळखल्यानें, माझा ( परमेश्वराचा ) भक्त मद्भावाला ( ईश्वरस्वरूप होण्यास ) पात्र होतो.

[ श्लोक ५।६ यांत क्षेत्राचें, श्लोक ७ ते ११ अखेर ज्ञानाचें, व श्लोक १२ ते १७ अखेर ज्ञेयाचें विवरण आलें आहे. ह्यांतील ज्ञेयरूप आत्मा हा क्षेत्राचा प्रकाशक व ज्ञाता असल्यामुळें, तोच क्षेत्रज्ञ होय. पहिल्या श्लोकांत क्षेत्र व क्षेत्रज्ञ ह्या शरीर व आत्मा यांच्या संज्ञा सांगितल्या आहेत. तथापि श्लोक ५।६ यांतील क्षेत्रवर्णन व श्लोक १२ ते १७ अखेर ज्ञेय म्हणजे क्षेत्रज्ञ याचें वर्णन हें पिंड व जीवात्मा यांच्यापुरतेंच संकुचित नसून, सर्व ब्रह्मांड व परमात्मा यांसही लागू पडण्यासारखें आहे. यावरून पिंड व ब्रह्मांड यांचा विचार एकाच रीतीनें करावयाचा असतो, असें दर्शविलें आहे. 'जें पिंडीं तें ब्रह्मांडीं' ही म्हणही याच नियमाची दर्शक आहे. व यासच वेदान्त शास्त्रांत 'व्यष्टि-समष्टि' अशा संज्ञा आहेत. व्यष्टि म्हणजे एक व्यक्ति व समष्टि म्हणजे अशा सर्व व्यक्तींचा समुच्चय होय. उदाहरणार्थ, एक मनुष्य किंवा एक वृक्ष ही व्यष्टि होय, व मानवी समाज ( राष्ट्र ) किंवा असंख्य वृक्षांचें अरण्य ही समष्टि होय. ह्या व्यष्टिसमष्टीच्या म्हणजे पिंड-ब्रह्मांडाच्या दृष्टीनेंच येथें क्षेत्र-क्षेत्रज्ञांचा विचार केलेला असून हें क्षेत्र-क्षेत्रज्ञांचें ज्ञान परमेश्वरी असल्यामुळें, तें मोक्षदायक आहे, असें येथें दुसऱ्या श्लोकांतील विधानाचें निगमन केलें आहे.]

प्रकृति व पुरुष म्हणजे समष्टिरूप क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांचें स्वरूप सांगतात—

**प्रकृतिं पुरुषं चैव विध्यनादी उभावपि**
**विकारांश्च गुणांश्चैव विद्धि प्रकृतिसंभवान्** १९

**प्रकृतिम् पुरुषम् च एव उभौ अपि अनादी विद्धि। विकारान् च गुणान् च एव प्रकृतिसंभवान् विद्धि ॥**

प्रकृति आणि पुरुष हे दोन्हीही अनादि (ज्यांचा आरंभ कळत नाहीं असे) आहेत असें जाण. विकार (श्लोक ५।६ यांत महाभूतांपासून धृतीपर्यंत सांगितलेलीं प्रकृतीशिवाय २३ तत्त्वें व इच्छाद्वेषादि सात धर्म) व गुण (सत्त्व—रज—तम) हे प्रकृतिजन्य (मूळ प्रकृतीपासून उत्पन्न झालेले) आहेत, असें समज.

[ प्रकृति हा ब्रह्मतत्त्वाचा विवर्त असल्यामुळें, ब्रह्मतत्त्वावांचून प्रकृतीला स्वतंत्र अस्तित्व नाहीं; आणि ब्रह्मतत्त्वाच्या ज्या अंशावर प्रकृतीचें भान होतें त्या ठिकाणीं प्रकृतीचें नियामक व चालक असलेल्या चैतन्यांशासच 'पुरुष' अशी संज्ञा प्राप्त होते. प्रकृति पुरुषांची ही जोडी सर्व स्थूल व सूक्ष्म सृष्टीला मूल कारण आहे. प्रकृति व पुरुष असें द्वैत तयार होणें हा विश्वोत्पत्तिकारक प्रथम व्यापार म्हणजे विसर्ग होय, व ह्यापासूनच पुढील सर्व विकारगुणरूप सृष्टि उत्पन्न होते, असें येथें विधान केलें आहे. प्रकृति व पुरुष ही जोडी ब्रह्मतत्त्वापासून केव्हां अस्तित्वांत आली हें कळणें शक्य नाहीं. म्हणूनच श्लोक १२ तील ब्रह्माच्या विशेषणाप्रमाणें या जोडीस 'अनादिमत्' ( आरंभयुक्त नव्हे तें ) असें विशेषण न देतां, 'अनादि' ( ज्याचा आरंभ कळत नाहीं तें ) असें विशेषण दिलें आहे. अ. ९, श्लोक ५ वरील विवरण पहा.]

प्रकृति व पुरुष हे कोणत्या स्वरूपानें सृष्टीला कारण होतात, तें सांगतात.—

**कार्यकारणकर्तृत्वे हेतुः प्रकृतिरुच्यते**
**पुरुषः सुखदुःखानां भोक्तृत्वे हेतुरुच्यते** २०

**प्रकृतिः कार्यकारणकर्तृत्वे हेतुः उच्यते। पुरुषः सुखःदुखानाम् भोक्तृत्वे हेतुः उच्यते।**

(मूळ) प्रकृति ही ५ कर्मेंद्रियें, ५ ज्ञानेंद्रियें ५ विषय (शब्द-स्पर्शादि) व मन मिळून १६ कार्यें आणि ५ महाभूतें, १ अहंकार व १ बुद्धि मिळून ७ कारणें आणि सर्वत्र दिसून येणारें त्यांचें कर्तृत्व, यांस कारण असते असें म्हणतात, व पुरुष (म्हणजे ह्या प्रकृतीस अधिष्ठान झालेला आत्मा) सुखदु:खांच्या भोगाला (अनुभवाला) कारण असतो असें म्हणतात.

[ सर्व सृष्ट पदार्थ प्रकृति व पुरुष म्हणजे जड व चैतन्य यांच्या मिश्रणानेंच बनलेले असतात. त्याचप्रमाणें मानवी प्राण्यांतही हे दोन्ही अंश विद्यमान असतात हें उघड आहे. हें मिश्रण बुद्धीचे ठिकाणीं विशेष स्पष्ट होतें. त्यांतील कर्तृत्व हा प्रकृतीचा धर्म असून भोक्तृत्व हा जीवात्म्याचा धर्म असतो असें येथें सांगितलें आहे. आत्म्याशीं भोक्तृत्वाचा संबंध कसा आहे हें १४ व्या श्लोका-वरील विवरणांत दाखविलें आहे.]

जीवात्मा हा चैतन्यस्वरूप असतां तो जन्ममरणरूप संसारचक्रांत कां सांपडतो, तें सांगतात —

**पुरुषः प्रकृतिस्थो हि भुंक्ते प्रकृतिजान् गुणान्**
**कारणं गुणसंगोऽस्य सदसद्योनिजन्मसु** २१

**हि पुरुषः प्रकृतिजान् गुणान् भुंक्ते, प्रकृतिस्थः। अस्य गुणसंगः सदसद्योनिजन्मसु कारणम्।**

ज्या अर्थीं, जीवात्मा प्रकृतिजन्य गुणांचा (सुखदुःखादिकांचा) उपभोग घेतो, त्यामुळें तो प्रकृतिवश होतो (स्वतः आनंदस्वरूप असतां, प्रकृतीमुळेंच आपल्याला सुख किंवा दुःख होत आहे असें मानूं लागतो). त्याची ही प्रकृतिगुणांविषयींची आसक्तीच त्याला बऱ्यावाईट योनींत जन्म पावण्यास कारण होते.

[ सुखदुःखादिकांचे उपभोग म्हणजे अनुभव हे स्वतःच जन्ममरणाला म्हणजे बंधाला कारण नसून त्यांविषयींची आसक्ति हीच खरें कारण असतें. पुरुष म्हणजे जीवात्मा स्वतः चैतन्यरूप असतां तो प्रकृतिवश होऊन उपभोगासक्त झाल्यामुळेंच जन्ममरणरूप संसारचक्रांत सांपडतो.]

ज्याच्या ठिकाणीं अशी आसक्ति उत्पन्न होत नाहीं, त्याचें शुद्ध स्वरूप सांगतात —

**उपद्रष्टाऽनुमंता च भर्ता भोक्ता महेश्वरः**
**परमात्मेति चाप्युक्तो देहेऽस्मिन् पुरुषः परः** २२

**अस्मिन् देहे पुरुषः परः उपद्रष्टा अनुमंता भर्ता भोक्ता महेश्वरः च परमात्मा इति अपि उक्तः च ॥**

ह्या देहामध्यें (क्षेत्रामध्यें) आत्मा श्रेष्ठ असून, (क्षेत्राचे अंतर्बाह्य व्यापार) प्रत्यक्ष पाहणारा, (ते) अध्यक्षत्वानें चालविणारा, (क्षेत्राला) कार्यक्षम ठेवणारा, (त्यापासून उत्पन्न होणाऱ्या सुखदुःखांचा) अनुभव घेणारा, आणि श्रेष्ठ प्रभु असून तोच परमात्मा आहे असें देखील म्हणतात.

[ ह्या श्लोकांत क्षेत्रज्ञ आत्म्याचे क्षेत्राशीं संबंध कसकसे असतात हें दाखवून जीवात्मा हाच परमात्मा आहे असें म्हटलें आहे.]

**य एवं वेत्ति पुरुषं प्रकृतिं च गुणैः सह**
**सर्वथा वर्तमानोऽपि न स भूयोऽभिजायते** २३

**यः एवम् पुरुषम् गुणैः सह प्रकृतिम् च वेत्ति, सः सर्वथा वर्तमानः अपि भूयः न अभिजायते।**

जो ह्याप्रमाणें (मागील श्लोकांत वर्णिल्याप्रमाणें) पुरुषाला व गुणांसह प्रकृतीला जाणतो, तो सर्व कर्में करीत असूनदेखील पुन्हा जन्म पावत नाहीं. (मुक्त होतो).

[ क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांचें यथार्थ ज्ञान म्हणजे ज्ञान—विज्ञान पूर्ण झाल्यावर आसक्ति नष्ट होत असल्यामुळें, ज्याप्रमाणें उपभोग पुरुषाला बंधक होत नाहींत, त्याच-प्रमाणें त्याचीं कर्मेंही त्याला बंधक होत नाहींत. कारण, सर्वत्र बंधकत्वाला आसक्ति हेंच कारण असतें. ही आसक्ति संसारबंधाचें बीज असून ती ज्ञान-विज्ञानानेंच नष्ट होत असल्यामुळें ज्याला असें ज्ञानविज्ञान प्राप्त होतें, तो परमेश्वर-स्वरूप म्हणजे मुक्त होतो.]

हें क्षेत्रक्षेत्रज्ञज्ञान प्राप्त करून घेण्याचे उपाय सांगतात.—

**ध्यानेनात्मनि पश्यंति केचिदात्मानमात्मना**
**अन्ये सांख्येन योगेन कर्मयोगेण चापरे** २४

**केचित् ध्यानेन आत्मनि आत्मना आत्मानम् पश्यंति, अन्ये सांख्येन योगेन, अपरे कर्मयोगेण च (पश्यंति)।**

कोणी (योगी) ध्यानयोगानें बुद्धीचे ठिकाणीं (एकाग्र) चित्तानें आत्म्याला पाहतात (ज्ञान संपादितात). दुसरे कोणी ज्ञानयोगानें आणि दुसरे कर्मयोगानें हें ज्ञान संपादन करितात.

[ क्षेत्रक्षेत्रज्ञज्ञान संपादन करण्याचे हे निरनिराळे उपाय म्हणून सांगितले आहेत. ह्या निष्ठा म्हणजे यावज्जीव आचरण्याचे मार्ग नव्हेत. कारण, गीतेस निष्ठा दोनच मान्य आहेत.]

हें ज्ञान संपादन करण्याइतकी ज्यांची तीव्र बुद्धि नाहीं, त्यांना दुसरा उपाय सांगतात.—

**अन्ये त्वेवमजानंतः श्रुत्वान्येभ्य उपासते**
**तेऽपि चातितरंत्येव मृत्युं श्रुतिपरायणाः** २५

**तु एवम् अजानंतः अन्ये, अन्येभ्यः श्रुत्वा उपासते, श्रुतिपरायणाः ते अपि मृत्युम् अतितरंति एव च।**

परंतु असें ( क्षेत्रक्षेत्रज्ञ ) ज्ञान नसलेले दुसरे पुरुष दुसऱ्याकडून (गुरूकडून) हें ज्ञान श्रवण करून त्याची उपासना (चिंतन) करितात. उपदेशावरच श्रद्धा ठेवणारे ते पुरुषदेखील मृत्यूला (जन्म मरणरूप संसाराला) तरून जातातच.

[ तीव्र बुद्धि नसल्यामुळें क्षेत्रक्षेत्रज्ञज्ञान समजत नाहीं असें म्हणून कोणी निराश होऊन तो मार्ग सोडून देण्याचें कारण नाहीं. सदिच्छा व जिज्ञासा असली म्हणजे श्रद्धापूर्वक गुरूचा उपदेश श्रवण करीत राहिल्यानेंही इष्ट फलप्राप्ति होते. अ. ३, श्लोक ३१, अ. ४, श्लोक ३९ इत्यादि अनेक ठिकाणीं श्रद्धेचें महत्त्व सांगितलेलें आहे.]

विश्वोत्पत्तीचा सामान्य नियम सांगतात.—

**यावत्संजायते किंचित्सत्त्वं स्थावरजंगमम्**
**क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगात्तद्विद्धि भरतर्षभ** २६

**भरतर्षभ, यावत् किंचित् स्थावरजंगमम् सत्वम्, तत् क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगात् संजायते ( इति ) विद्धि ॥**

अर्जुना, जो जो स्थावर किंवा जंगम पदार्थ आहे तो क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांच्या संयोगानेंच उत्पन्न झाला आहे असें समज.

[ प्रकृतीला स्वतंत्र अस्तित्व नसून, तो ब्रह्मतत्त्वाचा विवर्त आहे. यावरून जो जडांश दिसतो तो चैतन्याच्या सत्तेमुळेंच असतो म्हणून प्रत्येक पदार्थांत, किंबहुना प्रत्येक परमाणूंत चैतन्य सारखेंच भरलेलें असतें हें उघड आहे. प्रकृति व पुरुष हीं दोन्ही तत्त्वतः ब्रह्मरूप असलीं तरी, त्यांत विवर्ताच्या योगानें भेद दिसूं लागला म्हणजे, त्या दोहोंमध्यें नियम्य-नियामक किंवा प्रकाश्य-प्रकाशक असा संबंध उत्पन्न होतो; आणि त्यामुळेंच सर्व सृष्टीची घडामोड सुरू होते असें येथें १९ व्या श्लोकांतील विधानाचें निगमन केलें आहे. ]

प्रत्येक पदार्थांत जर आत्मा भरला आहे तर पदार्थांच्या नाशाबरोबरच आत्म्याचाही नाश होतो कीं काय हें सांगतात—

**समं सर्वेषु भूतेषु तिष्ठंतं परमेश्वरम्**
**विनश्यत्स्वविनश्यंतं यः पश्यति स पश्यति २७**

**विनश्यत्सु सर्वेषु भूतेषु अविनश्यंतम् समम् तिष्ठंतम् परमेश्वरम् यः पश्यति सः पश्यति ।**

नाशवंत अशा सर्व सृष्ट पदार्थांमध्यें, अविनाशी व (सर्वत्र) सारखा असलेला परमात्मा जो पाहतो (जाणतो) तो पाहतो (तोच ज्ञानी होय).

[ सृष्टपदार्थ उत्पत्तिविनाशशाली किंवा रूपांतर पावणारे आहेत. परंतु त्यांत असलेलें आत्मतत्त्व अविनाशी व अव्यय असल्यामुळे, त्याचा नाश किंवा रूपांतर होत नाहीं. त्याचप्रमाणें पदार्थ नानाविध आकाराचे असले तथापि, त्यांत असलेलें आत्मतत्त्व निराकार, निरवयव व एकच आहे. त्यांत वैषम्य नाहीं.]

**समं पश्यन्हि सर्वत्र समवस्थितमीश्वरम्**
**न हिनस्त्यात्मनात्मानं ततो याति परां गतिम् २८**

**हि ईश्वरम सर्वत्र समम् समवस्थितम् पश्यन् पराम् गतिम् याति ततः आत्मना आत्मानम् न हिनस्ति ॥**

ज्या अर्थी ईश्वर सर्व ठिकाणीं सारखा भरलेला आहे असें पाहणारा (जाणणारा) परमश्रेष्ठगतीला (मोक्षाला) जातो, त्या अर्थी तो स्वतःचा घात करीत नाहीं (आत्मघातकी होत नाहीं).

[ ह्याप्रमाणें क्षेत्रक्षेत्रज्ञाचें म्हणजे परमात्म्याचें यथार्थ ज्ञान ज्याला होतें तोच मुक्त होतो. त्यावांचून इतर उपभोगाच्या नादीं लागणारे अज्ञ लोक आत्मघातकी होत. अ. ६, श्लोक ५।६ यांत प्रतिपादन केलेल्या तत्त्वाचा येथें अनुवाद आहे.]

सर्वत्र ईश्वर म्हणजे परमात्मा भरला आहे, म्हणजे सर्व सृष्टीचें प्रभुत्व ईश्वराकडे आहे, तसें सर्व कर्मांचें कर्तृत्वही त्याच्याकडे येतें कीं काय, तें सांगतात.—

**प्रकृत्यैव च कर्माणि क्रियमाणानि सर्वशः**
**यः पश्यति तथात्मानमकर्तारं स पश्यति २९**

**सर्वशः कर्माणि प्रकृत्या एव क्रियमाणानि, यः च तथा पश्यति सः आत्मानम् अकर्तारम् पश्यति ॥**

सर्व कर्में प्रकृतीकडून केलीं जातात. आणि जो तसें पाहतो (जाणतो), तो आत्मा अकर्ता (आहे असें) पाहतो (जाणतो).

[ क्षेत्राच्या (आत्म्याच्या) संयोगामुळेंच प्रकृतीचे ठिकाणीं कर्तृत्वधर्म उत्पन्न होतो, तथापि आत्मा हा प्रकाशक असला तरी साक्षी असल्यामुळें प्रकृतीच्या कर्तृत्वाचा संबंध आत्म्याशीं नसतो. हें ज्ञान ज्याला नसतें त्याला आत्मा हाच कर्ता वाटत असतो, म्हणून प्रकृति व परमात्मा म्हणजे क्षेत्रक्षेत्रज्ञ यांचें यथार्थ ज्ञान झालें तरच आत्म्याचें अकर्तृत्व बरोबर समजतें.]

आत्म्याचें अकर्तृत्व समजणें एवढाच क्षेत्रक्षेत्रज्ञ-ज्ञानाचा उपयोग नसून त्याचें पर्यवसान ( फल ) काय तें सांगतात.—

**यदा भूतपृथग्भावमेकस्थमनुपश्यति**
**तत एव च विस्तारं ब्रह्म संपद्यते तदा** ३०

**यदा भूतपृथग्भावम् एकस्थम् च ततः एव विस्तारम् अनुपश्यति तदा ब्रह्म संपद्यते।**

जेव्हां सृष्टपदार्थांतील नानात्व (अनेकत्व) एकाच (ब्रह्मतत्त्वाच्या) अधिष्ठानावर आहे (एका ब्रह्मतत्त्वाच्याच आश्रयानें व्यक्त झालें आहे), त्यापासूनच (ब्रह्मतत्त्वापासूनच) सृष्टीचा विस्तार झाला आहे, असें नेहमीं पाहतो (जाणतो), तेव्हां (तो पुरुष) ब्रह्मसंपन्न होतो (ब्रह्मस्वरूप होतो).

[ सृष्टींतील असंख्य पदार्थांचें भिन्नत्व व विश्वाचा अपार विस्तार या सर्वांचें उपादान व निमित्त कारण एक ब्रह्मतत्त्वच आहे असें पूर्ण जाणणें हेंच ब्रह्मज्ञान होय. असा ब्रह्मवेत्ता पुरुष स्वतःच ब्रह्मस्वरूप होतो. अध्याय १२, श्लोक ८ यांत भक्तिमार्गाच्या दृष्टीनें सांगितलेलें तत्त्वच येथें पुन्हा अध्यात्मज्ञानाच्या दृष्टीनें सिद्ध केलें आहे.]

याप्रमाणें आत्म्याचें अकर्तृत्व सिद्ध करून, त्याचें अलिप्तत्व आतां सांगतात.

**अनादित्वान्निर्गुणत्वात्परमात्माऽयमव्ययः**
**शरीरस्थोऽपि कौंतेय न करोति न लिप्यते** ३१

**कौंतेय, अयम् परमात्मा अनादित्वात् निर्गुणत्वात् अव्ययः। शरीरस्थः अपि न करोति न लिप्यते।**

अर्जुना, हा असा परमात्मा अनादि व निर्गुण असल्यामुळें, अव्यय (अविकार्य) आहे. शरीराशीं (क्षेत्राशीं) याचा संबंध असला, तथापि, तो स्वतः कांहीं करीत नाहीं व कशानेंही लिप्त (बद्ध) होत नाहीं.

[ ज्या वस्तूला ( भावपदार्थाला ) आरंभ असतो, त्याला शेवटही असतो. त्याचप्रमाणें ज्या वस्तूमध्यें गुणधर्म असतात, त्या वस्तूला वृद्धिक्षयादि विकारही असतात. आत्मा हा अनादि व निर्गुण असल्यामुळें, त्याला अंत नाहीं व वृद्धि क्षयादि विकारही नाहींत, म्हणजे तो अव्यय आहे. याप्रमाणें आत्मा अव्यय व निर्गुण असल्यामुळें त्याच्या ठिकाणीं कर्तृत्वाभिमान किंवा फलासक्ति असण्याचाही संभव नाहीं.]

वरील नियम दृष्टान्तांनीं दृढ करितात—

**यथा सर्वगतं सौक्ष्म्यादाकाशं नोपलिप्यते**
**सर्वत्राऽवस्थितो देहे तथात्मा नोपलिप्यते** ३२

**यथा सर्वगतम् आकाशम् सौक्ष्म्यात् न उपलिप्यते, तथा सर्वत्र देहे अवस्थितः आत्मा न उपलिप्यते**

ज्याप्रमाणें, सर्व ठिकाणीं असलेलें (व्यापक) आकाश अत्यंत विरल असल्यामुळें, त्याला कांहीं चिकटत नाहीं, त्याप्रमाणेंच सर्व देहांमध्यें, (क्षेत्रांमध्यें) असलेला आत्मा कशानेंही लिप्त होत नाहीं (अलिप्त असतो).

**यथा प्रकाशयत्येकः कृत्स्नं लोकमिमं रविः**
**क्षेत्रं क्षेत्री तथा कृत्स्नं प्रकाशयति भारत** ३३

**भारत, यथा एकः रविः इमम् कृत्स्नम् लोकम् प्रकाशयति तथा क्षेत्री कृत्स्नम् क्षेत्रम् प्रकाशयति ॥**

अर्जुना, ज्याप्रमाणें एकच सूर्य ह्या सर्व जगास प्रकाशित करितो, त्याचप्रमाणें ( एकच ) क्षेत्रज्ञ ( आत्मा ) सर्व क्षेत्रांस (सृष्टपदार्थांस) प्रकाशित करितो.

[ जसें व्यापक आकाश सर्व वस्तूंत असूनही अलिप्त असतें, त्याचप्रमाणें जसा

एकच सूर्य सर्व जगाचा प्रकाशक असतो, तसा एकच आत्मा (क्षेत्रज्ञ) सर्व क्षेत्रांचा प्रकाशक म्हणजे ज्ञानोत्पादक व सामर्थ्यदायक असतो. अर्थात् प्रकाश्य-प्रकाशकसंबंध हाच क्षेत्रक्षेत्रज्ञांचा संयोग होय.]

ह्या क्षेत्रक्षेत्रज्ञप्रकरणाचा उपसंहार सांगतात.—

**क्षेत्रक्षेत्रज्ञयोरेवमंतरं ज्ञानचक्षुषा**
**भूतप्रकृतिमोक्षं च ये विदुर्यांति ते परम्** ३४

**एवम् क्षेत्रक्षेत्रज्ञयोः अंतरम् भूतप्रकृतिमोक्षम् च ये ज्ञानचक्षुषा विदुः, ते परम् यांति।**

याप्रमाणें क्षेत्र व क्षेत्रज्ञ या दोहोंतील फरक (भेद) व सृष्टी-च्या मूलप्रकृतीचा मोक्ष म्हणजे विश्वोत्पादक व्यापार, जे ज्ञानदृष्टीनें जाणतात ते अमृतत्व पावतात.

[ क्षेत्र म्हणजे जड व क्षेत्रज्ञ म्हणजे चैतन्य यांचे गुण परस्परांशीं विसदृश (विरुद्ध) असल्यामुळें जड पदार्थांच्या संयोगाप्रमाणें त्यांचा संयोग होणें शक्य-च नाहीं. परंतु त्या दोहोंमध्यें प्रकाश्य-प्रकाशक संबंध असल्यामुळें त्याला संयोग असें मानण्यांत येतें. ज्ञानी पुरुषांस क्षेत्र व क्षेत्रज्ञ हीं दोन्हीही ब्रह्मरूपच आहेत असें अद्वैतज्ञान झालेलें असल्यामुळें, हा संयोगाबद्दल गैरसमज त्याच्या बुद्धींत उत्पन्न होत नाहीं, म्हणून तो मुक्त असतो.]

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायाम् योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुन-संवादे क्षेत्रक्षेत्रज्ञयोगो नाम त्रयोदशोऽध्यायः ।**

याप्रमाणें श्रीभगवंतांनीं गाइलेल्या उपनिषदांतील ब्रह्मविद्यांतर्गत कर्मयोग-शास्त्राविषयींच्या श्रीकृष्ण व अर्जुन यांच्या संवादांतील '**क्षेत्रक्षेत्रज्ञ-प्रकरण**' या नांवाचा तेरावा अध्याय समाप्त झाला.

---

# तेराव्या अध्यायाचा उपसंहार

## तेराव्या अध्यायाची विषयानुक्रमणिका

क्षेत्र व त्याचें अधिष्ठान जो क्षेत्रज्ञ म्हणजे आत्मा यांचें ज्ञान प्रस्तुत अध्यायांत साधकाला अवश्य तितकें आलें आहे. त्यांचें विस्तृत विवेचन मुख्यत्वेंकरून ह्याच विषयाचा ऊहापोह करणारीं उपनिषदें व ब्रह्मसूत्रें यांत आहे. कर्माच्या यथार्थ ज्ञानास क्षेत्र, क्षेत्रज्ञ ( ज्ञेय ) व त्यांचें ज्ञान या तीन गोष्टींची आवश्यकता असते. म्हणून प्रथम श्लोक ५।६ यांत क्षेत्राचें वर्णन केलें आहे. क्षेत्राचा म्हणजे सृष्टीचा उत्पत्तिक्रम गीताशास्त्राप्रमाणें थोडक्यांत असा आहे--ब्रह्माचा विवर्त म्हणजे मूळप्रकृति किंवा अव्यक्त, २ तिजपासून ( महत्तत्त्व ) बुद्धि, ३ बुद्धीपासून अहंकार, ४ त्यापासून आकाश, ५ त्यापासून वायु, ६ वायूपासून तेज, ७ तेजापासून पाणी, ८ पाण्यापासून पृथ्वी, पंचमहाभूतांच्या सत्त्वांशापासून १ मन व ५ ज्ञानेंद्रियें, रजोंशापासून ५ कर्मेंद्रियें व विषय, अशीं २४ तत्त्वें उत्पन्न झालीं. त्यांपैकीं मूळ प्रकृति असून, पुढील २३ तत्त्वें हे त्या प्रकृतीचेच विकार आहेत. इच्छा, द्वेष, सुख, दुःख, इत्यादि अंतःकरणाच्याच वृत्ति आहेत. ह्या सर्वांच्या समुच्चयास 'क्षेत्र' अशी संज्ञा आहे. नंतर श्लोक ७ ते ११ अखेर अमानित्वादि ज्ञानपोषक व ज्ञानसहकारी गुण सांगितले आहेत. पुढें श्लोक १२ ते १७ अखेर ज्ञेय म्हणजे ब्रह्म किंवा परमात्मा याचें वर्णन केलें आहे. ब्रह्म हें निर्गुण असून वाणि व मन यांना अगोचर असल्यामुळें, त्याचें वर्णन करण्याकरितां कशीही शब्दयोजना केली तरी, ती औपचारिकच ठरणार हें उघड आहे. तथापि ज्याप्रमाणें 'शून्य' म्हणजे काय हें समजून देण्याकरितां एक वर्तुलाकृति काढावीच लागते, त्याप्रमाणें निर्गुण निराकार ब्रह्माचें प्रतिपादन करण्याकरितां, असा कांहीं तरी औपचारिक शब्दप्रयोग केल्यावांचून गत्यंतरच नसतें. याप्रमाणें औपचारिक शब्दयोजनेनें वेदान्तशास्त्रांत ब्रह्माचें प्रतिपादन करण्याच्या दोन रीति आहेत, त्यांस

अध्यारोप व अपवाद, किंवा अन्वय व व्यतिरेक असें म्हणतात. मूळ प्रकृति हा ब्रह्माचा विवर्त असून ह्या प्रकृतीपासून उत्पन्न झालेली सर्व सृष्टि हा त्या मूळ प्रकृतीचा विकार आहे. अर्थात् प्रकृतीसह सर्व सृष्टि ब्रह्मरूप आहे, अशा अर्थाच्या विवेचनास अध्यारोप किंवा अन्वय म्हणतात. आणि सृष्टीच्या बाह्य स्वरूपापासून पृथक्करणाच्या रीतीनें प्रत्येक पदार्थाचें परीक्षण करून, तो साकार पदार्थ नाशिवंत व मिथ्या, अतएव ब्रह्म नव्हे, असें सिद्ध करीत करीत शेवटीं ह्या सर्व सृष्टीचें मूळ कारण जी अव्यक्त प्रकृति तीही जड व नाशवंत असल्यामुळें ब्रह्म नव्हे, तिच्या पलीकडील सच्चिदानंदरूप अद्वैत तत्त्व हेंच ब्रह्म होय, अशा अर्थाचें जें प्रतिपादन त्यास अपवाद किंवा व्यतिरेक म्हणतात. ह्या दोन्ही पद्धतींनीं येथें ज्ञेयाचें वर्णन केलें आहे, हें त्या वर्णनांतील परस्परविरोधी दिसणाऱ्या विशेषणावरून उघड होत आहे. अर्वाचीन कालांत वेदान्तामध्यें परस्परविरुद्ध अशा रीतीनें ब्रह्मस्वरूपाचें वर्णन करण्याची जणुं काय वहिवाटच पडून गेली आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. अशा परस्परविरोधी वर्णनांनीं श्रोत्याचें किंवा वाचकाचें मन गोंधळून जातें व साहजिकच त्याला असें वाटतें कीं, वेदान्त हा विषय आपल्या बुद्धीच्या टप्प्याच्या बाहेरचा आहे, अशा तऱ्हेनें माणसाची निराशाच होते. ही विरोधी वर्णनाची पद्धति प्रस्तुत अध्यायांत आली असली तरी तिचा विस्तार फारच अल्प आहे. प्रत्यक्ष ब्रह्मवस्तूचे वर्णन करतानाच परस्परविरुद्ध अशीं कांहीं थोडीं विशेषणें आलीं आहेत ( श्लोक १५ ). वास्तविक ही रीति फारशी बोधकारक नाहीं. असें असतां ती स्वीकारली आहे याचें कारण ब्रह्मस्वरूपाची यथार्थ कल्पना करून देणें हेंच होय. ही रीति केनोपनिषदांत आढळून येते. पण तेथें अशा विरोधी शब्दांचा उपयोग कोणता व उद्देश काय तेंही दर्शविलें असून अशा वर्णनाचें पर्यवसान एकाच वस्तूचें सर्वांगांनीं निरीक्षण करण्यांत व्हावयास पाहिजे असें सांगितलें आहे (केनोपनिषद्—खंड २). ह्याप्रमाणें क्षेत्र, क्षेत्रज्ञ व ज्ञान सांगून श्लोक १९ ते २६ अखेर विसर्गाधिकरणांत, प्रकृति व पुरुष, किंवा क्षेत्रक्षेत्रज्ञ यांचें स्वरूप व कार्य इत्यादिकांचे वर्णन केलें आहे. आणि कर्मांच्या यथार्थ ज्ञानानें मनुष्य मुक्त होतो असें सांगितलें आहे, व त्यातच 'सर्वथा वर्तमानः' या पदानें सिद्धावस्थेंतही कर्मयोग शक्य आहे असें दर्शविलें आहे. श्लोक २४।२५ यांत हें ज्ञान व विज्ञान संपादन करण्याचीं साधनें सांगून शेवटीं २६ व्या श्लोकांत क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांचा संयोग म्हणजे संबंध सर्व सृष्टीचा

उत्पादक आहे असें सिद्ध केलें आहे. नंतर क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांचा संबंध सृष्टीच्या उत्पत्तीस कारण असतांही, क्षेत्रज्ञ परमात्मा अकर्ता व अलिप्त पण सर्वप्रकाशक कसा असतो हें दाखविलें आहे. याप्रमाणें प्रकृति व पुरुष यांच्या स्वरूपांतील फरक समजल्यावर व प्रकृतीला तत्त्वतः स्वतंत्र अस्तित्व नसल्यामुळें प्रकृति व पुरुष यांच्या संयोगाविषयींचें अज्ञान दूर झाल्यावर मनुष्य अमृतत्वाला प्राप्त होतो असें अखेरीस सांगून, अध्यायाची परिसमाप्ति केली आहे. सारांश, क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांचें यथार्थ ज्ञान झालें म्हणजे जीवात्मा हा शुद्ध ब्रह्मस्वरूप कसा आहे याचा प्रत्यय येतो. अशा ज्ञानविज्ञानाच्या योगानें ज्याची बुद्धि शुद्ध झालेली असते तो स्थितप्रज्ञ निसर्गाचें म्हणजे सृष्टीचें खरें तत्त्व ओळखून आपल्या कर्मयोगानें स्वतःचें व सर्व जगाचें कल्याण करण्यास समर्थ होतो.



# चतुर्दशोऽध्यायः ।

आठव्या अध्यायांतील अर्जुनाच्या सात प्रश्नांपैकीं 'कर्म' म्हणजे पदार्थांना उत्पन्न करणारा व त्यांची वृद्धि करणारा सृष्टिव्यापार असें जें भगवंतांनीं सांगितलें होतें त्याचें विवरण तेराव्या अध्यायांत केलें आहे. सृष्टीला मूळ कारण असणाऱ्या क्षेत्रक्षेत्रज्ञांच्या ( प्रकृति-पुरुषांच्या ) संयोगापासूनच हा विसर्ग म्हणजे सृष्टिव्यापार उत्पन्न होतो, व तेणेंकरून विश्वाचा विस्तार होतो. क्षेत्र व क्षेत्रज्ञ हीं दोन तत्त्वें अनादि असलीं तरी स्वतंत्र नसून एकाच ब्रह्मतत्त्वाचीं स्वरूपें आहेत असें पूर्वाध्यायांत सांगितलें आहे. ह्या सृष्टींतील जन्ममरणरूप संसारास पुरुषाचें प्रकृतिवश होणें व गुणांचे ठिकाणीं आसक्त होणें हींच कारणें असल्यामुळें, पुरुष प्रकृतिवश कसा होतो, व त्याला आसक्ति उत्पन्न करण्यासारखे कोणते धर्म गुणांमध्यें ( सत्त्व, रज, तम या गुणांमध्यें ) आहेत, ह्याचें म्हणजे त्रिगुणात्मक भावाचें ( अध्यात्माचें ) विवेचन करणें हा ह्या अध्यायाचा प्रतिपाद्य विषय आहे.

प्रकृति व तिचे सत्त्वादि गुण आणि त्यांचीं कार्यें यांचें ज्ञान किती आवश्यक आहे, हें दाखविण्याकरितां भगवान् म्हणतात—

**श्रीभगवानुवाच**

**परं भूयः प्रवक्ष्यामि ज्ञानानां ज्ञानमुत्तमम्**
**यज्ज्ञात्वा मुनयः सर्वे परां सिद्धिमितो गताः** १

**ज्ञानानाम् उत्तमम् परम् ज्ञानम् भूयः प्रवक्ष्यामि । यज्ज्ञात्वा सर्वे मुनयः इतः पराम् सिद्धिम् गताः ।**

श्रीभगवान् म्हणाले—(अर्जुना), सर्व प्रकारच्या ज्ञानामध्यें उत्तम व ( आतांपर्यंत सांगितल्याहून ) विशेष ज्ञान पुनः तुला सांगतों. तें जाणल्यानें सर्व ज्ञानी पुरुष येथून म्हणजे ह्या जन्ममरणरूप संसारांतून परम श्रेष्ठ गतीला (मोक्षाला) गेले आहेत.

[ भगवान् जें प्रकृतिगुणांचें विवेचन करणार आहेत त्यांचें ज्ञान मोक्षास अवश्य आहे असें येथें सांगितलें आहे. सत्त्व, रज, तम या गुणांचीं कार्यें आतांपर्यंत खुलासेवार सांगितलीं नसून, तीं येथें सांगावयाचीं आहेत, म्हणून त्यांच्या ज्ञानास 'पर' म्हणजे विशेष असें म्हटलें आहे.]

**इदं ज्ञानमुपाश्रित्य मम साधर्म्यमागताः**
**सर्गेऽपि नोपजायंते प्रलये न व्यथंति च** २

**इदम् ज्ञानम् उपाश्रित्य मम साधर्म्यम् आगताः सर्गे अपि न उप-जायन्ते प्रलये न व्यथंति च ॥**

ह्या ज्ञानाचा आश्रय करून माझ्या स्वरूपाला प्राप्त झालेले ( सिद्ध पुरुष ), सृष्टीच्या उत्पत्तिकालीं जन्म पावत नाहींत आणि प्रलयकालीं नाश पावत नाहींत. ( सृष्टीच्या उत्पत्तिप्रलयाशीं त्यांचा संबंध उरत नाहीं.)

**मम योनिर्महद्ब्रह्म तस्मिन्गर्भं दधाम्यहम्**
**संभवः सर्वभूतानां ततो भवति भारत** ३

**भारत, मम महद्ब्रह्म योनिः । अहम् तस्मिन् ( महद्ब्रह्मणि ) गर्भम् दधामि । ततः सर्वभूतानाम् संभवः भवति ॥**

अर्जुना, माझी परमात्म्याची तत्त्वतः ब्रह्मरूप असलेली मूळप्रकृति हेंच सर्व भूतांचें उत्पत्तिस्थान आहे. त्या महद्ब्रह्मरूप प्रकृतीचे ठिकाणीं मी ( पुरुष ) सर्व सृष्टीच्या उत्पत्तीचें सामर्थ्यरूप बीज स्थापन करितों. त्या (सामर्थ्ययुक्त प्रकृति)पासून सर्व सृष्टपदार्थांची उत्पत्ती होते.

[ ब्रह्माच्या जेवढ्या अंशावर प्रकृति भासमान होते तेवढें तत्त्वच त्या प्रकृतीस सामर्थ्यदायक पुरुष होय. यासच सर्व सृष्टीचा उत्पादक, चालक व नियामक हिरण्यगर्भ किंवा व्यक्त परमेश्वर म्हणतात. ह्या पुरुषाच्या सामर्थ्यानें युक्त असलेली त्रिगुणात्मक प्रकृतिच सर्व विश्वाची उत्पत्ति व विस्तार करिते. मागील अध्यायांतील क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगाचें म्हणजे विसर्गाधिकरणाचेंच हें स्पष्टीकरण आहे.]

**सर्वयोनिषु कौंतेय मूर्तयः संभवंति याः**
**तासां ब्रह्म महद्योनिरहं बीजप्रदः पिता** ४

**कौंतेय, सर्वयोनिषु या मूर्तयः संभवंति । तासाम् योनिः महत् ब्रह्म, बीजप्रदः पिता अहम् ।**

अर्जुना, ( देवमानवादि ) सर्व योनींमध्यें ज्या व्यक्ति ( क्षेत्रें ) उत्पन्न होतात, त्यांचें उत्पत्तिस्थान महद्ब्रह्म म्हणजे व्यापक प्रकृति

हेंच आहे व तेथें उत्पादकशक्तिरूप बीज स्थापन करणारा जनक मीच आहें.

[ वरील दोन श्लोकांत प्रकृति व पुरुष यांचें दंपतीरूपानें वर्णन केलें आहे. त्यांत प्रकृति ही सर्व जगताची जननी आणि पुरुष हा जनक आहे असें दाखविलें आहे. मूळ ब्रह्मतत्त्वाचे ठिकाणीं परिमाण अगर दुसरा कोणताही धर्म नाहीं. ब्रह्माच्या अंशावर विवर्तानें प्रकृति बनली म्हणजे त्या ब्रह्मांशावर कांहीं तरी परिमाण उत्पन्न होतें. ह ब्रह्मांशरूप प्रकृतीचें परिमाण सृष्टींतील कोणत्याही परिमाणापेक्षां मोठें असल्यामुळें, त्याला 'महत्' असें विशेषण दिलें आहे.]

प्रकृति गुणस्वरूपानेंच व्यक्त होत असल्यामुळें ते गुण सांगतातः—

**सत्त्वं रजस्तम इति गुणाः प्रकृतिसंभवाः**
**निबध्नंति महाबाहो देहे देहिनमव्ययम्** ५

**महाबाहो, सत्त्वम् रजः तमः इति प्रकृतिसंभवाः गुणाः अव्ययम् देहिनम् देहे निबध्नंति ।**

अर्जुना ! सत्त्व, रज व तम हे प्रकृतीपासून उत्पन्न होणारे गुण अव्यय आत्म्याला देहाविषयीं आसक्त करितात.

[ प्रकृतीच्या सत्त्व, रज, तम ह्या गुणांच्या योगानें बुद्धि आच्छादित झाली म्हणजे, आत्मा आच्छादित झालासा दिसतो. कारण, बुद्धि हीच आत्मदर्शनाची दृष्टि असते. ती गुणावृत झाल्यामुळें, आत्माच गुणावृत आहे असें भासूं लागतें. हिरव्या चष्म्यांतून पाहणाराला सर्व पदार्थ हिरवे दिसूं लागतात, त्या वेळीं त्या पदार्थांचा रंग बदललेला नसून दृष्टीवरील हिरव्या आवरणाचा तो परिणाम असतो, त्याचप्रमाणें बुद्धि ही त्रिगुणांच्या आवरणांतून आत्म्याकडे पाहूं लागली म्हणजे तोही त्रिगुणावृत ( तीन गुणांनीं झांकलेला ) दिसूं लागतो. परंतु आत्मा सर्व गुणांपासून अलिप्त असतो. हें त्रिगुणांचें आवरणच सर्व प्रवृत्तीस मूळ कारण असून, बुद्धिद्वारा तें जीवात्म्याचें आच्छादक होत असल्यामुळें, तेंच अध्यात्म म्हणजे स्वभाव होय, असें येथें विधान केलें आहे.]

येथपासून श्लोक १० अखेर सत्त्व, रज, तम ह्या तिन्ही गुणांचे धर्म, परिणाम व कार्यें अनुक्रमें सांगतातः—

**तत्र सत्त्वं निर्मलत्वात्प्रकाशकमनामयम्**
**सुखसंगेन बध्नाति ज्ञानसंगेन चानघ** ६

**अनघ, तत्र निर्मलत्वात् प्रकाशकम् अनामयम् सत्वम् सुखसंगेन ज्ञानसंगेन च बध्नाति ।**

हे निष्पाप (अर्जुना), त्या ( तीन गुणां )पैकीं निर्दोष असल्या-मुळें ज्ञानप्रकाशवाहक व विकाररहित असा सत्त्वगुण सुखाच्या आसक्तीनें व ज्ञानाच्या लालसेनें ( आत्म्याला ) बद्ध करितो. ( आच्छादित करितो ).

[ सत्त्वगुणाचें आवरण शुद्ध पारदर्शक असल्यामुळें, तें आवरण असलें तरी विक्षेप (विरुद्ध भास) उत्पन्न करीत नाहीं. म्हणून, त्याचा बंध ज्ञानमय व सुखमय असल्यामुळें, तो असून नसल्यासारखा असतो.]

**रजो रागात्मकं विद्धि तृष्णासंगसमुद्भवम्**
**तन्निबध्नाति कौंतेय कर्मसंगेन देहिनम्** ७

**कौंतेय, रजः तृष्णासंगसमुद्भवम् रागात्मकम् विद्धि । तत् देहिनम् कर्मसंगेन निबध्नाति ।**

अर्जुना, रजोगुण हा उत्कट वासना व आसक्ति यांपासून उत्पन्न होणाऱ्या प्रीतीच्या स्वरूपाचा (असतो असें) समज. तो (रजोगुण) जीवात्म्याला (सकाम) कर्माच्या आसक्तीनें बद्ध करितो ( सकाम कर्माकडे प्रवृत्ति उत्पन्न करितो ).

[ अप्राप्त उपभोगाविषयीं उत्कंठा उत्पन्न होणें, व प्राप्त उपभोगांचे ठिकाणीं चिकटून राहणें हें रजोगुणाचें स्वरूप होय. अर्थात् रजोगुणाच्या ह्या आसक्ति-रूप सदोषपणामुळें सकाम कर्मांची प्रवृत्ति उत्पन्न होणें साहजिक आहे.]

**तमस्त्वज्ञानजं विद्धि मोहनं सर्वदेहिनाम्**
**प्रमादालस्यनिद्राभिस्तन्निबध्नाति भारत** ८

**भारत, तमः तु अज्ञानजम् सर्वदेहिनाम् मोहनम् विद्धि । तत् प्रमादालस्यनिद्राभिः निबध्नाति ।**

अर्जुना, तमोगुण हा अज्ञानजन्य असल्यामुळें, सर्व प्राण्यांना

मोह म्हणजे भ्रम उत्पन्न करणारा आहे, असें समज. तो (तमोगुण) बेसावधपणा, आळस व झोंप ह्यांच्या योगानें जीवात्म्याला बद्ध करितो.

[ तमोगुण हा अज्ञानापासून उत्पन्न होणारा असल्यामुळें त्याचे परिणामही अनवधानता, उद्योगाचा कंटाळा, झोंपाळूपणा यांसारखे अनिष्टच असतात. म्हणजे तमोगुणाच्या आवरणानें मनुष्याची ह्या अनिष्ट गोष्टींकडे प्रवृत्तिच वाढूं लागते.]

**सत्त्वं सुखे संजयति रजः कर्मणि भारत**
**ज्ञानमावृत्य तु तमः प्रमादे संजयत्युत** ९

**भारत, सत्वम सुखे, रजः कर्माणि संजयति। उत तमः तु ज्ञानम् आवृत्य प्रमादे संजयति।**

अर्जुना, सत्त्वगुण सुखाविषयीं व रजोगुण कर्माविषयीं आसक्ति उत्पन्न करितो. परंतु तमोगुण मात्र ज्ञानाला आच्छादित करून बेसावधपणाविषयीं (चुकीकडे) प्रवृत्ति (आसक्ति) उत्पन्न करितो.

[ श्लोक ६।७।८ यांत प्रत्येक गुणाचे जे वेगळे वेगळे धर्म सांगितले आहेत त्यांचे विशेष बंधकारक परिणाम येथें एकत्र सांगितले आहेत. ज्ञानलालसा ही सत्त्वगुणापासूनच उत्पन्न होणारी असली तरी ती बंधकारक नसल्यामुळें, तिचा येथें उल्लेख केलेला नाहीं. रजोगुणापासून उत्पन्न होणारी काम्यकर्मांविषयींची किंवा कर्मस्वरूपाविषयींची आसक्ति येथेंही सांगितलीच आहे. तमोगुणापासून उत्पन्न होणारा मुख्य दोष प्रमाद होय. त्यापासूनच आळस व झोंप उत्पन्न होत असल्या-मुळें त्यांचा येथें निराळा उल्लेख केला नाहीं.]

**रजस्तमश्चाभिभूय सत्त्वं भवति भारत**
**रजःसत्त्वं तमश्चैव तमःसत्त्वं रजस्तथा** १०

**भारत, रजः तमः च अभिभूय, सत्वम् भवति। रजः सत्वम् च (अभिभूय) तमः (भवति), तथा तमः सत्वम् च (अभिभूय) रजः (भवति)।**

अर्जुना, रजोगुण व तमोगुण यांचें सामर्थ्य कमी करून, सत्त्वगुण वाढतो; आणि रजोगुण व सत्त्वगुण यांचें सामर्थ्य कमी करून,

तमोगुण वाढतो; त्याचप्रमाणें तमोगुण व सत्त्वगुण यांचें सामर्थ्य कमी करून रजोगुण वाढतो.

[ सृष्टि त्रिगुणात्मक असल्यामुळें सृष्टपदार्थांतील व त्याप्रमाणेंच मानवी देहांतील ह्या त्रिगुणांपैकीं कोणताही गुण अजिबात नाहींसा होणें शक्य नाहीं, तथापि हे तिन्ही गुण सर्व पदार्थांत सप्रमाण नसून प्रत्येकांत कोणत्या तरी एका गुणाचें प्राबल्य दिसून येते. ह्या तीन गुणांपैकीं जो गुण प्रधान असेल तो बाकीच्या दोन्ही हीनबल गुणांना आपल्या आधीन करून घेतो.]

या तीन गुणांपैकीं कोणत्या गुणाचें प्राधान्य आहे हें कसें ओळखावें तें पुढील तीन श्लोकांत अनुक्रमें सांगतातः—

**सर्वद्वारेषु देहेऽस्मिन् प्रकाश उपजायते**
**ज्ञानं यदा तदा विद्याद्विवृद्धं सत्त्वमित्युत** ११

**यदा अस्मिन् देहे सर्वद्वारेषु प्रकाशः उत ज्ञानम् उपजायते, तदा सत्वम् विवृद्धम् इति विद्यात् ।**

ज्यावेळीं ह्या (मानवी) देहांतील सर्व द्वारांत (बुद्धि, मन व ज्ञानेंद्रियें ह्यांमध्यें) प्रकाश म्हणजे तेजस्विता किंवा तरतरीतपणा आणि ज्ञान उत्पन्न होतें, तेव्हां सत्त्वगुण वृद्धिंगत झाला आहे, असें समजावें.

**लोभः प्रवृत्तिरारंभः कर्मणामशमः स्पृहा**
**रजस्येतानि जायंते विवृद्धे भरतर्षभ** १२

**भरतर्षभ, रजसि विवृद्धे, लोभः प्रवृत्तिः कर्मणाम् आरंभः, अशमः स्पृहा, एतानि जायंते ।**

अर्जुना, रजोगुण वाढला असतां, लोभ, चळवळ, (नवीन नवीन) कर्मांचा आरंभ, असंतोष, हावरेपणा हे (विकार) उत्पन्न होतात.

**अप्रकाशोऽप्रवृत्तिश्च प्रमादो मोह एव च**
**तमस्येतानि जायंते विवृद्धे कुरुनंदन** १३

**कुरुनंदन, तमसि विवृद्धे, अप्रकाशः अप्रवृत्तिः, च प्रमादः, मोहः एव च एतानि जायंते ।**

अर्जुना, तमोगुणाची वृद्धि झाली असतां, मंदपणा, सुंदपणा, बेसावधपणा व भ्रम हे (दोष) उत्पन्न होतात.

अंतकाळीं कोणत्या गुणाचें प्राधान्य असलें म्हणजे काय गति मिळते हें पुढील १४।१५ ह्या दोन श्लोकांत सांगतातः—

**यदा सत्त्वे प्रवृद्धे तु प्रलयं याति देहभृत्**
**तदोत्तमविदां लोकानमलान् प्रतिपद्यते** १४

**देहभृत् यदा तु सत्वे प्रवृद्धे प्रलयम् याति तत् उत्तमविदाम् अमलान् लोकान् प्रतिपद्यते ।**

मानवी प्राणी जेव्हां सत्त्वगुणाची वृद्धि असतां मरण पावतो, तेव्हां तो उत्तम ज्ञानी पुरुषांच्या दिव्य लोकांना (सत्यलोक, वैकुंठ, कैलास इत्यादिकांना) जातो.

**रजसि प्रलयं गत्वा कर्मसंगिषु जायते**
**तथा प्रलीनस्तमसि मूढयोनिषु जायते** १५

**रजसि प्रलयम् गत्वा कर्मसंगिषु जायते । तथा तमसि प्रलीनः मूढ-योनिषु जायते ।**

रजोगुणाची वृद्धि असल्या वेळीं (मानवी प्राणी) मरण पावला असतां, कर्मासक्त लोकांत (संसारांत) उत्पन्न होतो. त्याचप्रमाणें तमोगुणाच्या वृद्धिकालीं मरण पावलेला मनुष्य (पश्वादि) मूढ योनींत जन्म पावतो.

**कर्मणः सुकृतस्याहुः सात्त्विकं निर्मलं फलम्**
**रजसस्तु फलं दुःखमज्ञानं तमसः फलम्** १६

**सुकृतस्य कर्मणः फलम् निर्मलम् सात्विकम्, तु रजसः फलम् दुःखम्, तमसः फलम् अज्ञानम् आहुः ।**

पुण्यकर्माचा परिणाम निर्दोष व सात्त्विक असतो; परंतु राजस कर्माचा परिणाम दुःखकारक व तामस कर्माचा परिणाम अज्ञानकारक असतो, असें सांगितलें आहे.

**सत्त्वात्संजायते ज्ञानं रजसो लोभ एव च**
**प्रमादमोहौ तमसो भवतोऽज्ञानमेव च** १७

**सत्त्वात् ज्ञानम्, रजसः लोभः एव च संजायते तमसः प्रमादमोहौ भवतः च अज्ञानम् एव (संजायते) ।**

सत्त्वगुणापासून ज्ञान व रजोगुणापासून लोभच उत्पन्न होतो. आणि तमोगुणापासून बेसावधपणा व भ्रम उत्पन्न होतात, त्याच-प्रमाणें अज्ञानही उत्पन्न होतें.

**ऊर्ध्वं गच्छंति सत्त्वस्था मध्ये तिष्ठंति राजसाः**
**जघन्यगुणवृत्तिस्था अधो गच्छंति तामसाः** १८

**सत्वस्थाः ऊर्ध्वम् गच्छंति, राजसाः मध्ये तिष्ठंति, तामसाः जघन्य-गुणवृत्तिस्थाः अधः गच्छंति ।**

सात्त्विक वर्तनाचे पुरुष उन्नतीला जात असतात, राजस वर्तनाचे लोक मध्यम स्थितींत राहतात, ( त्यांची फारशी उन्नति किंवा अवनति होत नाहीं ), तामसी वर्तनाचे म्हणजे दुर्गुणानें वर्तणारे लोक अधोगतीला जातात ( त्यांचा अधःपात होतो ).

[ सत्त्वगुण हा ज्ञानाचें व सद्गुणांचें उगमस्थान असल्यामुळें त्याच्या आश्रया-नें मनुष्याची उन्नति होत जाते. रजोगुण तृष्णासंगादि दोषांनीं युक्त असल्यामुळें तो उन्नतीला प्रतिबंधक होतो; परंतु त्यांत सत्त्वगुणाचा अंश असल्यामुळें तो फारशी अवनतीही होऊं देत नाहीं. परंतु तमोगुण हा अज्ञानाचें व सर्व दुर्गुणांचें माहेरघरच असल्यामुळें त्यायोगें आसुरी पशुवृत्ति वाढत जाऊन शेवटीं तो अधः-पातासच कारण होतो.]

याप्रमाणें त्रिगुणात्मक स्वभाव म्हणजे अध्यात्म हें सर्व प्रवृत्तीला कारण असल्यामुळें त्याच्या यथार्थ ज्ञानाची आवश्यकता सांगतातः—

**नान्यं गुणेभ्यः कर्तारं यदा द्रष्टानुपश्यति**
**गुणेभ्यश्च परं वेत्ति मद्भावं सोऽधिगच्छति** १९

**यदा द्रष्टा गुणेभ्यः अन्यम् कर्तारम् न अनुपश्यति च गुणेभ्यः परम् वेत्ति, सः मद्भावम् अधिगच्छति ।**

ज्या वेळीं साक्षी ( क्षेत्रज्ञ जीवात्मा ) त्रिगुणांहून वेगळा ( असा कोणीही ) कर्ता पहात नाहीं ( समजत नाहीं ) आणि गुण व गुण-विकार ह्यांहून आत्मा अलिप्त आहे असें समजतो, तेव्हां तो ( जीवात्मा ) माझ्या स्वरूपाला परमात्मस्वरूपाला प्राप्त होतो.

[ आत्मतत्त्वाच्या अधिष्ठानानें व्यक्त होणारा त्रिगुणांचा समुच्चय म्हणजे स्वभाव किंवा अध्यात्म होय. प्रत्येक कर्माचें कर्तृत्व ह्या स्वभावास म्हणजे त्रिगुणात्मक प्रकृतीकडेच ( बुद्धीकडेच ) असतें. ह्या स्वभावांत ज्या गुणाचें प्राधान्य असतें, तदनुसार कर्म घडत असतात. त्याप्रमाणें सर्व कर्मांचें कर्तृत्व त्रिगुणात्मक स्वभावाकडेच असल्यामुळें, आत्मा हा त्या स्वभावाचा साक्षी व प्रकाशक असला तरी, त्याच्याकडे त्या कर्तृत्वाचा प्रत्यक्ष संबंध येत नाहीं. सारांश, आत्म्याच्या अधिष्ठानानें व्यक्त होणारा त्रिगुणात्मक स्वभाव हाच आत्मदर्शक बुद्धीला आवरक असून तोच अध्यात्म व सर्व कर्मांचा कर्ता होय, असें येथें ५ व्या श्लोकांतील विधानाचें निगमन केलें आहे. ह्या त्रिगुणात्मक स्वभावावांचून दुसऱ्या कोणाकडेही कर्माचें कर्तृत्व नाहीं, व आत्म्याशीं कोणत्याही कर्माचा कर्तृत्वसंबंध नाहीं असें ज्ञान झालें म्हणजे, कर्तृत्वाभिमान व फलासक्ति आपोआपच नष्ट होते व मनुष्य मुक्त होतो. येथें कर्तृत्वाभिमानाचा आणखी थोडासा खुलासा करणें अवश्य आहे. मी कर्ता आहें असें समजून त्या दृष्टीनें कर्माचा विचार करणें यालाच कर्तृत्वाभिमान म्हणतात. कर्तृत्वाभिमानाची कल्पना कांहींशी उपयुक्त दिसली तथापि तिचा संकुचितपणा नाहींसा करणें अत्यंत आवश्यक असतें. मी कर्ता आहें या कल्पनेमध्यें जर हा संकुचितपणा शिल्लक राहिला तरी तो अत्यंत बाधक होतो. माझें कर्म दुसऱ्याला केव्हांही चांगलेंच वाटलें पाहिजे असला हट्ट या संकुचितपणाला कारण होतो, मग तो चांगल्याबद्दल असो किंवा वाइटाबद्दल असो. हा आग्रह नाहींसा होणें म्हणजेच कर्तृत्वाचा अभिमान नष्ट होणें होय. आपल्या उच्चतम शुद्ध ध्येयावर दृष्टि कायम ठेवून तत्त्वनिष्ठेनें प्राप्तकर्म करणाऱ्या मनुष्याला मी कर्ता आहें अशी जाणीव असली तरी तो कर्तृत्वाचा अभिमान होत नाहीं, कारण कोणत्याही कर्माबद्दल या तत्त्वनिष्ठ मनुष्याचा आग्रह नसतो. व अशा तत्त्वनिष्ठ व दुराग्रहशून्य बुद्धीचाच कर्तृत्वाभिमान पूर्णपणें नष्ट झाला आहे असें समजावें. याच कर्तृत्वाभिमानाला व्यावहारिक दृष्ट्या व्यक्ति-माहात्म्य असें समजतात. म्हणजे तात्त्विक दृष्ट्या व्यक्तिमाहात्म्य व कर्तृत्वाभिमान या दोनही शब्दांचा अर्थ एकच असून हा दोष बुद्धींतून नाहींसा करणें बौद्धिक विकासाच्या दृष्टीनें अत्यंत आवश्यक आहे असें या श्लोकावरून ठरतें.]

गुणानेतानतीत्य त्रीन् देही देहसमुद्भवान्
जन्ममृत्युजरादुःखैर्विमुक्तोऽमृतमश्नुते २०

**देही देहसमुद्भवान् एतान् त्रीन् गुणान् अतीत्य जन्ममृत्युजरादुःखैः विमुक्तः अमृतम् अश्नुते।**

जीवात्मा देहापासून ( क्षेत्रापासून ) उत्पन्न होणाऱ्या ह्या तीन ( सत्त्व, रज, तम ) गुणांचें अतिक्रमण केल्यामुळें, जन्म, मरण, वार्धक्य इत्यादि दुःखांपासून मुक्त होत्साता अमृतत्वाला प्राप्त होतो ( जीवन्मुक्त होतो ).

[ येथपर्यंत त्रिगुणात्मक स्वभावाचें स्वरूप सांगून त्या तिन्ही गुणांना म्हणजे स्वभावाला आपल्या ताब्यांत ठेवणें जरूर आहे असें सांगितलें आहे. या त्रिगुणात्मक स्वभावाला स्वतःच्या ताब्यांत ठेवणें म्हणजेच गुणातीत होणें होय. ज्याला हें साधणार नाहीं, तो कितीही विद्वान्, धाडसी, शूर असा असला, तरी स्वभावाच्या आधीन असल्यामुळें, या स्वभाव—पारतंत्र्यानें म्हणजे व्यक्तिमाहात्म्यानें कोणत्याही सद्गुणाची कशी राखरांगोळी होते हें निराळें सांगावयास नको. आपण ज्याला व्यक्तिमाहात्म्य म्हणतों तेंच खरें स्वभावपारतंत्र्य होय; हेंच प्रस्तुत अध्यायाच्या अभ्यासानें कोणाच्याही लक्षांत येण्याजोगें आहे. हें व्यक्तिमाहात्म्य किंवा गुणाधीनत्व कर्मयोगांत किंवा सार्वजनिक कार्यांत विशेषच बाधक असल्यामुळें प्रत्येक विवेकी माणसानें या त्रिगुणांवर जय मिळणें ऐहिक व पारमार्थिक हिताच्या दृष्टीनें अत्यंत अवश्य आहे, असा भगवंतांचा अभिप्राय आहे.]

याप्रमाणें त्रिगुणातीत जीवन्मुक्ताचें लक्षण व आचरण कसें असतें हें समजून घेण्याकरितां अर्जुन विचारतोः—

**अर्जुन उवाच—**

**कैर्लिंगैस्त्रीन् गुणानेतानतीतो भवति प्रभो**
**किमाचारः कथं चैतांस्त्रीन् गुणानतिवर्तते** २१

**प्रभो, एतान् त्रीन् गुणान् अतीतः कैः लिंगैः भवति, च किमाचारः, एतान् त्रीन् गुणान् कथं अतिवर्तते।**

श्रीकृष्णा, ह्या ( सत्त्व, रज, तम ) तीन गुणांच्या पलीकडे गेलेला ( त्रिगुणातीत ) जीवन्मुक्त कोणत्या लक्षणांनीं युक्त असतो? त्याचें आचरण कसें असतें? व तो ह्या तीन गुणांचें अतिक्रमण कसें करितो? ( त्रिगुणातीत होण्याचें साधन कोणतें? )

**श्रीभगवानुवाच—**

**प्रकाशं च प्रवृत्तिं च मोहमेव च पांडव**
**न द्वेष्टि संप्रवृत्तानि न निवृत्तानि कांक्षति २२**

**पांडव, प्रकाशम् च, प्रवृत्तिम् च, मोहम् एव च संप्रवृत्तानि न द्वेष्टि, निवृत्तानि न कांक्षति।**

अर्जुना, तेजस्विता, चळवळ व मोह (भ्रांति) हे (अनुक्रमें सत्त्व, रज व तम ह्या तिन्ही गुणांचे) विकार उत्पन्न झाले तरी जो त्यांचा द्वेष करीत नाहीं (त्याबद्दल खेद करीत नाहीं) आणि ते विकार नाहींसे झाले तरी, त्यांची इच्छा करीत नाहीं, (तो गुणातीत होय.)

[प्रकृतिस्वभाव त्रिगुणात्मक असल्यामुळें, अंतःकरणांत त्या गुणांच्या लहरी प्रसंगवशात् क्षणमात्र उत्पन्न होणें साहजिक आहे. अज्ञ (त्रिगुणात्मक स्वभावाच्या आधीन म्हणजे प्रकृतिवश) पुरुष ह्या क्षणिक लहरींच्या नादानें हर्षविषाद पावतो, म्हणजे त्या सुखकारक असल्या तर त्यांच्याबद्दल हर्षभरित होतो व पुनःपुनः तशा सुखलहरी उत्पन्न व्हाव्या अशी इच्छा करूं लागतो. त्याचप्रमाणें त्या दुःखकारक असतील तर त्यांच्याबद्दल विषाद मानितो, व तसल्या दुःखलहरींचा द्वेष करूं लागतो. म्हणजे त्या पुन्हा उत्पन्न होऊं नयेत असें त्याला वाटूं लागतें. परंतु त्रिगुणातीत जीवन्मुक्त पुरुष या क्षणिक लहरींची उपेक्षा करून त्याबद्दल हर्षविषादही मानीत नाहीं किंवा द्वेष व आकांक्षाही करीत नाहीं. त्रिगुणांच्या या क्षणिक लहरी स्वभावानुसार उत्पन्न झाल्या तरी त्यामुळें गुणातीत जीवन्मुक्ताच्या शुद्ध बुद्धीवर हर्षविषादादि द्वंद्वांचा मुळींच परिणाम होत नाहीं, म्हणजे त्याची बुद्धि निर्द्वंद्व असते.]

**उदासीनवदासीनो गुणैर्यो न विचाल्यते**
**गुणा वर्तंत इत्येव योऽवतिष्ठति नेंगते २३**

**यः उदासीनवत् आसीनः गुणैः न विचाल्यते, गुणाः एव वर्तंते इति यः अवतिष्ठति, न इंगते।**

जो तटस्थाप्रमाणें (तिऱ्हाइताप्रमाणें) असून, त्रिगुणांनीं (त्रिगुणांच्या विकारांनीं) विचलित होत नाहीं, गुणच वर्तन करीत

आहेत ( आत्म्याकडे त्या कर्तृत्वाचा संबंध नाहीं ) असें जाणून जो स्थिर असतो, चंचल होत नाहीं, ( तो गुणातीत होय.)

[ सर्व कर्मांचें कर्तृत्व त्रिगुणात्मक स्वभावाचें असल्यामुळें, त्याचा कर्तृत्वाभिमान व फलासक्ति नष्ट झालेली असते. अर्थात् त्याचें कर्म कोणत्याही उपभोगाकरितां नसतें. म्हणजे त्याची बुद्धि निस्त्रैगुण्य झालेली असते. वरील दोन श्लोकांत अर्जुनाच्या पहिल्या प्रश्नाचें उत्तर आलें आहे.]

**समदुःखसुखः स्वस्थः समलोष्टाश्मकांचनः**
**तुल्यप्रियाऽप्रियो धीरस्तुल्यनिंदात्मसंस्तुतिः** २४

**समदुःखसुखः, स्वस्थः समलोष्टाश्मकांचनः तुल्यप्रियाप्रियः धीरः तुल्यनिंदात्मसंस्तुतिः ।**

ज्याला सुख व दुःख सारखेंच असतें ( परिणामकारक होत नाहीं ), जो शांत असतो, ज्याला माती, दगड व सोनें सारखेंच असतें ( स्वार्थी लोभ नसतो ), ज्याला आवड व नावड सारखी असते ( आवड व नावड नसते ) जो स्थितप्रज्ञ असतो, व ज्याला स्वतःच्या निंदेची किंवा स्तुतीची पर्वा वाटत नाहीं, ( तो गुणातीत होय.)

[ गांभीर्य, शान्ति, निर्लोभता, निर्ममत्व, विवेक व क्षमाशीलता हे सात्त्विक गुण ज्याच्या आचरणांत दिसून येतात तो गुणातीत होय. म्हणजे त्याची बुद्धि नित्यसत्त्वस्थ असते.]

**मानापमानयोस्तुल्यस्तुल्यो मित्रारिपक्षयोः**
**सर्वारंभपरित्यागी गुणातीतः स उच्यते** २५

**मानापमानयोः तुल्यः, मित्रारिपक्षयोः तुल्यः, सर्वारंभपरित्यागी सः गुणातीतः उच्यते ।**

जो आदर व अनादर यांविषयीं सारखा ( निस्पृह ) शत्रु व मित्र ह्या दोन्ही पक्षांशीं सारखा ( न्यायानें व हितबुद्धीनें वागणारा ) सर्व कर्मांचा, अर्थात् कर्मफलांचा त्याग करणारा ( फलाभिसंधिरहित कर्में करणारा ) असतो, त्याला गुणातीत असें म्हणतात.

[ ज्याला स्वार्थ नसतो, म्हणजे प्राप्त झालेल्या उपभोगाचें संरक्षण व नवीन

उपभोगांचें संपादन करावयाचें नसतें म्हणून सन्मान मिळविणे, अपमान टाकणें, मित्राचें हित करणें व शत्रूचें अहित करणें इत्यादि स्वार्थपर संकुचित मनोविकार ज्याच्या अंतःकरणांत उत्पन्न होत नाहींत व कोणत्याही कर्माच्या फलाची आसक्ति ज्याला असत नाहीं, म्हणजे ज्याची बुद्धि निर्योगक्षेम असते, तो गुणातीत होय. वरील दोन श्लोकांत अर्जुनाच्या दुसऱ्या प्रश्नाचें उत्तर आलें आहे.]

**मां च योऽव्यभिचारेण भक्तियोगेन सेवते**
**स गुणान् समतीत्यैतान् ब्रह्मभूयाय कल्पते** २६

**यः च अव्यभिचारेण भक्तियोगेन माम् सेवते, सः एतान् गुणान् समतीत्यं, ब्रह्मभूयाय कल्पते।**

आणि जो अस्खलित (व ज्ञानविज्ञानमय) भक्तियोगानें माझी (परमेश्वराची) सेवा (आराधना) करितो, तो ह्या (तीन) गुणांचें अतिक्रमण करून, ब्रह्मरूप होण्यास समर्थ (योग्य) होतो.

[ ज्ञानविज्ञानयुक्त परमेश्वरभक्ति ( उपासनामय कर्म ) या साधनानें पुरुष गुणातीत ( व्यक्तिमाहात्म्यशून्य ) व जीवन्मुक्त होतो, हें अर्जुनाच्या तिसऱ्या प्रश्नाचें उत्तर आहे व येथें अनन्य भगवद्भक्तांच्या उल्लेखानें बुद्धीचें आत्मवत्त्व दर्शविलें आहे. याप्रमाणें गुणातीताच्या वर्णनांत वरील पांच श्लोकांत, अ. २, श्लोक ४५ यांतील बुद्धियोगाचे पांचही अंश दाखविले आहेत.]

भगवद्भक्तीनें ब्रह्मरूप कां होतो हें सांगतात—

**ब्रह्मणो हि प्रतिष्ठाऽहममृतस्याव्ययस्य च**
**शाश्वतस्य च धर्मस्य सुखस्यैकांतिकस्य च** २७

**हि, अव्ययस्य च अमृतस्य च ब्रह्मणः शाश्वतस्य धर्मस्य च एकांतिकस्य सुखस्य च अहम् प्रतिष्ठा।**

कारण, अविकार्य व अविनाशी ब्रह्माचें (सगुणपरमेश्वराचें वा प्रकृतियुक्त पुरुषाचें) आणि सनातन (कर्मयोगरूप) धर्माचें व निरतिशय सुखाचें आश्रयस्थान (केंद्र) मी (परमात्मा) आहे.

[ परमात्मा हाच मूळ—प्रकृति पुरुषाचा ( हिरण्यगर्भाचा ) आधार, कर्मयोगाचें अंतिम साध्य व अक्षय सुखाचें उगमस्थान असल्यामुळें ज्ञानविज्ञानमय उपासनेच्या योगानें होणारी परमात्मप्राप्ति हीच ब्रह्मप्राप्ति होय. येथें सगुण-निर्गुण परमेश्वराचें ऐक्य व सच्चिदानंदस्वरूप दाखविलें आहे.]

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे गुणत्रयविभागयोगो नाम चतुर्दशोऽध्यायः ।**

याप्रमाणें श्रीभगवंतांनीं गाइलेल्या उपनिषदांतील ब्रह्मविद्यांतर्गत कर्मयोगशास्त्राविषयींच्या श्रीकृष्ण व अर्जुन यांच्या संवादांतील '**गुणत्रयविभाग प्रकरण**' या नांवाचा चवदावा अध्याय समाप्त झाला.

---

# चवदाव्या अध्यायाचा उपसंहार

## चवदाव्या अध्यायाची अनुक्रमणिका



आत्म्याच्या अधिष्ठानानें व्यक्त होणाऱ्या त्रिगुणात्मक स्वभावाचें स्वरूप, कार्य, व परिणाम कसकसे घडत असतात यांचें विवेचन हेंच अध्यात्मविवेचन होय. अध्यात्म म्हणजे वेदांतशास्त्र असें मानण्याची रूढि आहे. परंतु अध्यात्म म्हणजे स्वभाव असा भगवंतांनींच अ. ८, श्लोक ३ यांत निश्चित अर्थ केला आहे. स्वभाव हा शब्द गीतेंत अनेक ठिकाणीं त्रिगुणात्मक प्रकृति अशाच अर्थानें आलेला आहे. त्यावरून स्वभाव म्हणजे त्रिगुणात्मक प्रकृति हाच अर्थ येथेंही विवक्षित आहे हें उघड आहे. ह्या त्रिगुणात्मक प्रकृतीच्या ( स्वभावाच्या ) विवेचनाच्या प्रारंभीं, ह्या प्रकृतिज्ञानाचें महत्त्व प्रथम दोन श्लोकांत सांगून, पुढील दोन श्लोकांत पुरुष व प्रकृति यांच्यापासून सर्व सृष्टीची उत्पत्ति झाली आहे, असा पूर्वाध्यायातील विषयाचा रूपकानें अनुवाद केला आहे. नंतर ५ व्या श्लोकांत प्रकृतीचे सत्त्व, रज व तम हे तीन गुण जीवात्म्यास आवृत करितात, म्हणजे सर्व कर्तृत्व गुणांचेंच असून अज्ञानामुळें, त्यांचा आरोप जीवात्म्यावर होतो, असें सांगितलें आहे. पुढें श्लोक ६ ते १८ अखेर ह्या तीन गुणांचीं लक्षणें, स्वरूपें व

कार्ये सांगितलीं आहेत. सत्त्वगुण हा निर्मल, प्रकाशरूप, निर्विकार असून, तो सुख व ज्ञान यांविषयीं आसक्ति उत्पन्न करणारा असतो. सत्त्वगुणाचे प्राधान्य असलें म्हणजे, बाकीचे दोन गुण दुर्बल व त्याच्या आधीन होतात. सत्त्वगुणाच्या प्राधान्यानें उत्साह वाढतो व प्रत्येक गोष्टीचें यथार्थ ज्ञान होणें, आचरण सात्त्विक घडतें व त्याचें फलही निर्दोष असते. म्हणजे सत्त्वगुणाच्या प्राधान्यानें मनुष्याची उत्तरोत्तर उन्नति होत जाते, व ही सात्त्विक अवस्था अंतकाळीं कायम असली म्हणजे जीवास उत्तम गति प्राप्त होते. रजोगुण तृष्णास्वरूप असून, तो कर्मा-विषयीं आसक्ति उत्पन्न करितो. त्याच्या योगानें स्वार्थपरायणता व तळमळ वाढते. रजोगुण प्रबल झाला असतां बाकीचे दोन गुण दुर्बल होऊन, त्यालाच पोषक होतात. राजस वृत्तीचे लोक शहाणे पण स्वार्थी असल्यामुळें त्यांची फारशी उन्नति किंवा अवनति होत नाहीं, सारांश, पुढील जन्मीं देखील त्यांची ही मध्यम स्थिति कायम राहते. तमोगुण अज्ञानजनक व मोहस्वरूप असतो. त्याच्या योगानें बेसावधपणा, आळस, झोंप अज्ञान, भ्रम, औदासीन्य इत्यादि दोष वाढतात. तमोगुणाचें प्राबल्य झालें म्हणजे बाकीचे दोन्ही गुण दुर्बल होऊन जातात. तमोगुणी मनुष्याला नानाप्रकारचे दुर्गुण व दुर्व्यसनें जडत जाऊन, त्याची उत्तरोत्तर अवनति होत जाते व अखेरीस त्याला अधोगति प्राप्त होते. ह्याप्रमाणें उत्तम, मध्यम व कनिष्ठ ह्या तिन्ही प्रकारच्या कार्यांचें कर्तृत्व वरील तीन गुणांचेंच आहे, असें ज्ञान झाल्यावर जीवात्म्याचा कर्तृत्वाभिमान ( व्यक्तिमाहात्म्य ) व फलासक्ति नष्ट होऊन तो मुक्त होतो, असें १९।२० श्लोकांत सांगितलें आहे. पुढें २१ व्या श्लोकांतील अर्जुनाच्या प्रश्नावरून त्रिगुणातीताची लक्षणें, आचरण, व त्रिगुणातीत होण्याचें साधन, कर्मयोगाच्या पांच अंशास अनुसरून श्लोक २२ ते २६ अखेर सांगितलें आहे व शेवटीं, परमात्मा हाच सर्व ज्ञानाचा, धर्माचा व सुखाचा निधि असल्यामुळें, म्हणजे सच्चिदानंदस्वरूप असल्यामुळें, ज्ञानविज्ञान-पूर्वक अनन्य भक्तीनें त्याची उपासना केली असतां जीवब्रह्मैक्य होऊन अमृतत्व-प्राप्ति होते, असें सांगून अध्यायाची परिसमाप्ति केली आहे. तात्पर्य, देह असेपर्यंत अपरिहार्य असणाऱ्या त्रिगुणात्मक स्वभावामध्ये ( बुद्धीमध्यें ) सत्त्व-गुणाचें प्राधान्य कायम ठेवून, ज्ञानविज्ञानभक्तिपूर्वक यावज्जीव निष्काम कर्मयोगाचरण करून त्रिगुणातीत होणें हेंच मनुष्यजन्माचें सार्थक होय.

---

## पंचदशोऽध्यायः

त्रिगुणात्मक स्वभावाचें स्वरूप व कार्य आणि गुणातीत होण्याचें साधन, गुणातीताचीं लक्षणें व आचरण इत्यादि अध्यात्मनिरूपण पूर्वाध्यायांत पूर्ण झाल्यानंतर, अर्जुनाचा पहिला म्हणजे उत्तरांच्या क्रमांतील सातवा प्रश्न 'ब्रह्म' म्हणजे काय याचें विवेचन करणें, हा ह्या अध्यायाचा प्रतिपाद्य विषय आहे.

विसर्गरूप सृष्टिव्यापार व त्रिगुणात्मक स्वभाव, म्हणजे कर्म व अध्यात्म, यांचें अधिष्ठान ब्रह्मतत्त्वच असल्यामुळें, त्याचा नीट बोध होण्याकरितां, तेराव्या व चौदाव्या अध्यायांत प्रतिपादन केलेल्या विषयांचाच प्रथम रूपकद्वारा भगवान् अनुवाद करितात—

**श्रीभगवानुवाच**

**उर्ध्वमूलमधःशाखमश्वत्थं प्राहुरव्ययम्**
**छंदांसि यस्य पर्णानि यस्तं वेद स वेदवित् १**

ऊर्ध्वमूलम्, अधःशाखम्, अव्ययम् अश्वत्थम् प्राहुः। छंदांसि यस्य पर्णानि यः तम् वेद, सः वेदवित्।

श्रीभगवान म्हणाले—ज्याचें मूळ ऊर्ध्व (सर्वांत उच्च, अर्थात् मूल-प्रकृतियुक्त पुरुष) आहे, ज्याची शाखा म्हणजे अग्र खालीं (नामरूपात्मक जड सृष्टि) आहे, (अशा ह्या) अखंड सृष्टीला अश्वत्थ वृक्ष म्हणतात. वेद हीं या वृक्षाचीं पानें आहेत. जो ह्या वृक्षाला पूर्णपणें जाणतो, तो वेदवेत्ता ( ज्ञानविज्ञानसंपन्न) होय.

[ ह्या सृष्टिरूपी वृक्षाचें मूळ उच्च अव्यक्त तत्त्वांत असून त्याचें अग्र निकृष्ट जड द्रव्यांत आहे. मानवी प्राण्याच्या ज्ञानास या वृक्षाच्या अग्रापासूनच प्रारंभ होत असून त्या ज्ञानाचें पर्यवसान ह्या वृक्षाच्या मूळापर्यंत ( सर्वशक्तिमान् ब्रह्मापर्यंत ) पोंचतें. ह्याप्रमाणें ह्या विश्ववृक्षाचें आमूलाग्र ज्ञान ज्याला झालेलें असतें, तोच वेदरहस्य जाणणारा होय. अश्वत्थ म्हणजे क्षणभंगुर, नश्वर, असाही अर्थ होतो.]

**अधश्चोर्ध्वं प्रसृतास्तस्य शाखा गुणप्रवृद्धा विषयप्रवालाः**
**अधश्च मूलान्यनुसंततानि कर्मानुबंधीनि मनुष्यलोके २**

**गुणप्रवृद्धाः विषयप्रवालाः तस्य शाखाः अधः च ऊर्ध्वम् प्रसृताः अधः च (ऊर्ध्वम्) मनुष्यलोके कर्मानुबंधीनि मूलानि अनुसंततानि॥**

(सत्त्व, रज, तम ह्या तीन) गुणानीं वाढलेल्या व (शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध हे) विषय ज्याच्यावर अंकुरांप्रमाणें आहेत, अशा त्या वृक्षाच्या शाखा (खांद्या) खालींवर (पातालादि लोकापासून स्वर्गादि लोकांपर्यंत) पसरल्या आहेत. मानव जातीमध्यें व खालीं (तिर्यगादि) योनींमध्यें व वर (देवयोनींत) कर्मबंधरूप मुळ्या (पारंब्या) सारख्या भरलेल्या आहेत.

[ स्वर्ग, मृत्यु व पाताळलोक, असे जगताचे तीन विभाग मानिलेले आहेत. त्यांस अनुसरूनच मागील अध्यायांतही उत्तम मध्यम, व कनिष्ठ अशा तीन गतींचें वर्णन आलें आहे. ह्या तीन विभागांचें तात्पर्य मानवी जातीपेक्षां उच्च कोटि म्हणजे देवादिक व नीच कोटि म्हणजे पशु किंवा राक्षस इत्यादि होत. गुण व विषय यांचा विस्तार ह्या तिन्ही विभागांत असतो. त्याचप्रमाणें कर्मांचा ( साक्षात् किंवा परंपरागत ) संबंधही ह्या तिन्ही विभागांत असतोच.]

**न रूपमस्येह तथोपलभ्यते नांतो न चादिर्न न च संप्रतिष्ठा**
**अश्वत्थमेनं सुविरूढमूलमसंगशस्त्रेण दृढेन छित्वा ३**
**ततः पदं तत्परिमार्गितव्यं यस्मिन्गता न निवर्तंति भूयः**
**तमेव चाद्यं पुरुषं प्रपद्ये यतः प्रवृत्तिः प्रसृता पुराणी ४**

**इह अस्य रूपम् न उपलभ्यते, तथा अंतः न च, आदिः न च, संप्रतिष्ठा न (उपलभ्यते)। एनम् सुविरूढमूलम् अश्वत्थम् दृढेन असंगशस्त्रेण छित्वा, ततः यतः पुराणी प्रवृत्तिः प्रसृता तम् एव आद्यम् पुरुषम् च प्रपद्ये (इति) तत् पदम् परिमार्गितव्यम् यस्मिन् गताः भूयः न निवर्तंति।**

(अज्ञान दशेंत) ह्याचें (सृष्टिरूप वृक्षाचें) रूप (आकार) दिसत नाहीं. त्याप्रमाणेंच त्याचा अंतही, (दिसत नाहीं) आरंभही (दिसत नाहीं) व स्थिति (मध्यही) दिसत नाहीं. ज्याच्या मुळ्या पुष्कळ वाढल्या आहेत, अशा ह्या (सृष्टिरूप) अश्वत्थ वृक्षाला अनासक्तिरूप तीक्ष्ण शस्त्रानें तोडून नंतर, ज्यापासून आद्य विसर्ग

(क्षेत्रक्षेत्रज्ञ-संयोग) उत्पन्न झाला, त्या आदिपुरुषाला (परब्रह्माला) मी प्राप्त व्हावें अशा हेतूनें, ज्या (ब्रह्म) पदाच्या ठिकाणीं पोंचलेले (पुरुष) पुनः परत येत नाहींत, (जन्ममरणरूप संसारांत पडत नाहींत म्हणजे मुक्त होतात). तें पद (ब्रह्मपद) शोधावें (त्याचा साक्षात्कार-संपादण्याचा प्रयत्न करावा).

[ अज्ञानदशेंत मनुष्याची दृष्टि सृष्टीच्या बाह्यस्वरूपांत गुरफटलेली असल्या-मुळें ही सृष्टि कशापासून उत्पन्न झाली, तिचें खरें स्वरूप काय आहे व तिचा शेवट काय होणार; हें तत्त्व त्यांना कळत नाहीं. म्हणून सदसद्विवेकास प्रतिबंध करणारी उपभोगासक्ति प्रथम नाहींशी करणे अवश्य आहे. ह्याप्रमाणें अनासक्त अतएव शुद्ध झालेल्या बुद्धीने ब्रह्मप्राप्तीचा नितांत शुद्ध हेतु धारण करून, साक्षा-त्कार संपादन करण्याचा प्रयत्न करावा. ज्या पदाची प्राप्ति झाली असतां, पुनरा-वृत्ति नाहीं, तेंच प्राप्तव्य ब्रह्मपद होय, असें येथें विधान केलें आहे.]

ह्याप्रमाणें साक्षात्कार संपादन करणाऱ्यांची योग्यता सांगतातः—

निर्मानमोहा जितसंगदोषा अध्यात्मनित्या
विनिवृत्तकामाः
द्वंद्वैर्विमुक्ताः सुखदुःखसंज्ञैर्गच्छंत्यमूढाः पद-
मव्ययं तत् ५

निर्मानमोहाः जितसंगदोषाः अध्यात्मनित्याः विनिवृत्तकामाः सुख-
दुःखसंज्ञैः द्वंद्वैः विमुक्ताः अमूढाः तत् अव्ययम् पदम् गच्छंति ।

ज्यांना मानापमानाची पर्वा नसते व ज्यांचा मोह (काम) नाहींसा झालेला असतो, म्हणजे ज्यांची बुद्धि निर्योगक्षेम झालेली असते, ज्यांनी आसक्ति व तज्जन्य दोष जिंकलेले असतात, म्हणजे ज्यांची बुद्धि नित्य सत्त्वस्थ असते, जे प्रकृति व परमात्मा यांचा नित्य विचार करणारे ज्ञानविज्ञानसंपन्न असतात, म्हणजे जे आत्मवान् झालेले असतात, ज्यांच्या (सात्त्विक, राजस व तामस उपभोगांच्या) सर्व वासना नष्ट झालेल्या असतात, म्हणजे ज्यांची बुद्धि निस्त्रैगुण्य झालेली असते, जे सुखदुःख इत्यादि द्वंद्वापासून मुक्त

झालेले असतात म्हणजे ज्यांची बुद्धि निर्द्वंद्व झालेली असते, असे मोहरहित (स्थितप्रज्ञ) पुरुष त्या निर्विकार ब्रह्मपदाला पोंचतात.

[ अ. २, श्लोक ४५ यांतील बुद्धियोगाच्या पांचही अंशांनीं युक्त असलेले स्थितप्रज्ञ कर्मयोगी जीवन्मुक्त होतात, हेंच येथें पुनः दाखविलें आहे.]

**न तद्भासयते सूर्यो न शशांको न पावकः**
**यद्गत्वा न निवर्तन्ते तद्धाम परमं मम** ६

**सूर्यः तत् न भासयते, शशांकः न, पावकः न (भासयते)। यत् गत्वा न निवर्तंते, तत् मम परमम् धाम।**

सूर्य त्याला (त्या ब्रह्मपदाला) प्रकाशित करूं शकत नाहीं, (मग) चंद्रही नाहीं, अग्निही नाहीं (हें सांगावयास नकोच). म्हणजे, तें स्वयंप्रकाश व सूर्यादिकांसही प्रकाशक आहे. ज्याला (ज्या ब्रह्मपदाला) पोंचल्यावर पुनः परत येत नाहींत (पुनरावृत्ति होत नाहीं) तें माझें (परमात्म्याचें) धाम म्हणजे तेजोमय ब्रह्मपद होय.

[ वरील तीन श्लोकांत 'पद', 'धाम' असे शब्द आहेत, ते ब्रह्मरूप हेंच प्राप्तव्य आहे असें सुचविण्याकरितां आहेत. ब्रह्मपद म्हणून एखादें स्वतंत्र स्थान असणें शक्य नाहीं. ह्याप्रमाणें अव्यय, अविनाशी व स्वयंप्रकाश ब्रह्मस्वरूप हेंच प्राप्तव्य ब्रह्मपद असून तेथें पोंचल्यावर म्हणजे तत्स्वरूप झाल्यावर पुनरावृत्ति नाहीं असें येथें ४ थ्या श्लोकांतील विधानाचें निगमन केलें आहे.]

ब्रह्म प्राप्तव्य असलें तरी तें निराळें संपादन करावयाचें नसून, जीवात्मा हाच परमात्मा, म्हणजे जीवब्रह्मैक्याचा साक्षात्कार होणें, हेंच प्राप्तव्य असें सांगतातः

**ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः**
**मनःषष्ठानींद्रियाणि प्रकृतिस्थानि कर्षति** ७

**जीवलोके मम एव सनातनः अंशः जीवभूतः। (सः) प्रकृतिस्थानि मनःषष्ठानि इंद्रियाणि कर्षति।**

प्राणिवर्गामध्यें माझाच (परमात्म्याचाच) अव्यय (अविनाशी) अंश जीवस्वरूप झालेला आहे. (तो) क्षेत्रांत असणाऱ्या अंतःकरणासह सहा इंद्रियांचें (अंतःकरण व पांच ज्ञानेंद्रियें यांचें) आकर्षण करितो (नियमन करितो).

[ अंतःकरण व ज्ञानेंद्रियें यांचा समूह हा लिंगदेह, आत्मा जीवदशेंत असे-पर्यंत त्याच्याबरोबर असतो. म्हणजे या त्रिगुणात्मक उपाधीनें युक्त असलेला चिदंश हाच जीव होय. अर्थात् या जीवाचें शुद्ध स्वरूप व ब्रह्मतत्त्व एकच आहे असें येथें विधान केलें आहे.]

हा लिंगदेह जीवाबरोबर कसा असतो तें सांगतातः—

**शरीरं यदवाप्नोति यच्चाप्युत्क्रामतीश्वरः**
**गृहीत्वैतानि संयाति वायुर्गंधानिवाशयात्** ८

**ईश्वरः यत् शरीरम् अवाप्नोति, अपि च यत् उत्क्रामति, एतानि गृहीत्वा एव संयाति, वायुः आशयात् गंधान् इव।**

क्षेत्रज्ञ आत्मा जेव्हां एखादें शरीर (क्षेत्र) प्राप्त करून घेतो (जन्म पावतो) किंवा एखादें शरीर (क्षेत्र) सोडितो, तेव्हांही (मन व इंद्रियें) बरोबर घेऊनच जातो (व येतो), जसा वायु गंधस्थानांतून गंध घेऊन जातो (त्याप्रमाणें).

[ जीवात्मा उन्नतीच्या किंवा अवनतीच्या कोणत्याही योनींत गेला तरी हा लिंगदेह ( म्हणजे अंतःकरण व इंद्रियें ) त्याच्याबरोबरच जात असतो.]

**श्रोत्रं चक्षुः स्पर्शनं च रसनं घ्राणमेव च**
**अधिष्ठाय मनश्चायं विषयानुपसेवते** ९

**अयम् श्रोत्रम्, चक्षुः, स्पर्शनम् च, रसनम्, घ्राणम् च एव, मनः च अधिष्ठाय विषयान् उपसेवते।**

हा (जीवात्मा) कान, डोळे, स्पर्शेंद्रिय, जिव्हा व नासिका, (हीं पांच ज्ञानेंद्रियें) आणि अंतःकरण यांच्या आश्रयानें (द्वारें) विषयांचा उपभोग घेतो.

[ अंतःकरण व ज्ञानेंद्रियें हींच विषयसेवनाचीं साधनें आहेत.]

**उत्क्रामंतं स्थितं वाऽपि भुंजानं वा गुणान्वितम्**
**विमूढा नानुपश्यंति पश्यंति ज्ञानचक्षुषः** १०

**उत्क्रामंतम्, स्थितम्, अपि वा भुंजानम्, वा गुणान्वितम्, विमूढाः न अनुपश्यंति। ज्ञानचक्षुषः पश्यंति।**

(हा जीवात्मा) शरीर सोडून जात असतां, किंवा (शरीरांत)

असतां, किंवा विषयसेवन करीत असतां (मन व इंद्रियरूप त्रिगुणांनीं युक्त असलेला हा आत्मा) अज्ञानी लोक पहात (जाणत) नाहींत, ज्ञानदृष्टीचे (ज्ञानी) लोक पाहतात (जाणतात).

[ जन्म, मरण, विषयसेवन इत्यादि अवस्थांत सर्व कार्ये आत्माच करीत आहे, असें अज्ञानी मनुष्यास वाटतें; परंतु ज्ञानी मनुष्य हीं सर्व कार्यें त्रिगुणात्मक स्वभावाचीं आहेत, आत्मा त्यांपासून अलिप्त आहे असेंच जाणतात.]

**यतंतो योगिनश्चैनं पश्यंत्यात्मन्यवस्थितम्**
**यतंतोऽप्यकृतात्मानो नैनं पश्यंत्यचेतसः ११**

**यतंतः योगिनः च एनम् आत्मनि अवस्थितम् पश्यंति । अकृतात्मानः अचेतसः यतंतः अपि एनम् न पश्यंति ।**

प्रयत्नशील बुद्धियोगयुक्त (स्थितप्रज्ञच) जीवात्म्यामध्यें असणारा हा (परमात्मा) पाहतात (जाणतात). परंतु ज्यांच्या अंतःकरणास ज्ञानाचा संस्कार झालेला नाहीं असे अविवेकी लोक बाह्य प्रयत्न करीत असले तरी, ह्याला (परमात्म्याला) पाहात नाहींत (त्यांना जीवब्रह्मैक्यज्ञान होत नाहीं).

[ १० व्या श्लोकांत 'ज्ञानचक्षुषः' ह्या पदानें जे वर्णिले आहेत ते सिद्ध होत व येथें सांगितलेले प्रयत्नशील योगी हे साधक होत. ह्या दोघांनाही आत्मज्ञान होतें; परंतु वेदान्ताचें ज्ञान नसलेले अज्ञानी लोक व्रतें, उपवास, तप इत्यादि ज्ञानशून्य प्रयत्न करीत असले तरी ह्या उपायांनीं त्यांना जीवब्रह्मैक्यज्ञान होणें शक्य नाहीं. ह्याच श्लोकांतील पहिल्या चरणांत, जीवात्मा एकच आहे हें योगी जाणतात असें ७ व्या श्लोकांतील विधानाचें निगमन केलें आहे.]

परमात्म्याचीं अक्षर व क्षर स्वरूपें सांगण्याकरितां कांहीं विभूतिरूप उदाहरणें सांगतातः—

**यदादित्यगतं तेजो जगद्भासयतेऽखिलम्**
**यच्चंद्रमसि यच्चाग्नौ तत्तेजो विद्धि मामकम् १२**

**यत् आदित्यगतम् तेजः अखिलम् जगत् भासयते; यत् चंद्रमसि, यत् अग्नौ च तेजः तत् मामकम् विद्धि ।**

जें सूर्यांतील तेज सर्व जगाला प्रकाशित करितें व जें चंद्रांत आणि अग्नींत तेज आहे, तें माझेंच आहे असें समज.

[ मागें ६ व्या श्लोकांत सूर्य, चंद्र व अग्नि हे ब्रह्मपदाला प्रकाशित करणारे नाहींत असें सांगितलें आहे, त्याचेंच स्पष्टीकरण करण्याकरितां येथे तेच ( सूर्य, चंद्र व अग्नि हे ) ब्रह्माच्या तेजानें तेजस्वी होतात असें सांगितलें आहे. सूर्य, चंद्र व अग्नि हे क्षरस्वरूप असून त्यांच्यांतील सूक्ष्म तेजःशक्ति अक्षरस्वरूप आहे.]

ह्या तीन विभूतींत ईश्वरी सामर्थ्य कोणतें असतें त्याचा खुलासा करतात.

**गामाविश्य च भूतानि धारयाम्यहमोजसा**
**पुष्णामि चौषधीः सर्वाः सोमो भूत्वा रसात्मकः** १३

**अहम् गाम् आविश्य ओजसा भूतानि धारयामि, च रसात्मकः सोमः भूत्वा सर्वाः ओषधीः पुष्णामि च।**

मी (सूर्यरूप परमात्मा) पृथ्वीमध्यें (किरणरूपानें) प्रवेश करून (आपल्या) तेजानें (सर्व) पदार्थांस धारण करतों, आणि रसरूप सोम (चंद्र) होऊन (सर्व) वनस्पतींचें पोषण करितों.

[ जड पृथ्वी व तीवरील सर्व पदार्थ धारण करण्याचें सामर्थ्य म्हणजे आधुनिक भाषेनें सूर्याची गुरुत्वाकर्षणशक्ति हें ईश्वरी सामर्थ्यच होय. सर्व वनस्पतींचें पोषण होण्यास अवश्य असलेले जे अनेक रस त्या सर्वांत असणारें जें पोषकत्व ( तें चंद्रापासून उत्पन्न होतें अशी वैदिक कल्पना आहे ) ती चंद्ररूप पोषकशक्ति ईश्वराचीच आहे.]

**अहं वैश्वानरो भूत्वा प्राणिनां देहमाश्रितः**
**प्राणापानसमायुक्तः पचाम्यन्नं चतुर्विधम्** १४

**अहम् वैश्वानरः भूत्वा प्राणिनाम् देहम् आश्रितः, प्राणापानसमायुक्तः, चतुर्विधम् अन्नम् पचामि।**

मी (परमात्मा) अग्नि होऊन व प्राण्यांच्या देहाचा आश्रय करून, प्राण, अपान इत्यादि वायूंनीं युक्त होत्साता चतुर्विध (खाद्य, पेय, लेह्य, चोष्य) अन्नें पचवितों.

[ प्राणिमात्रांच्या देहांत असलेली उष्णता व श्वासोच्छ्वास हीं पचनाचीं मुख्य कारणें असल्यामुळें ही जठराग्निसंज्ञक शक्तीही ईश्वरी शक्तीच आहे.]

**सर्वस्य चाहं हृदि सन्निविष्टो**
**मत्तः स्मृतिर्ज्ञानमपोहनं च**
**वेदैश्च सर्वैरहमेव वेद्यो वेदांतकृद्वेदविदेव चाहम्** १५

**अहम् सर्वस्य हृदि सन्निविष्टः, च मत्तः स्मृतिः, ज्ञानम् अपोहनम् च। अहम् एव सर्वैः वेदैः वेद्यः, च अहम् एव वेदांतकृत्, वेदवित् च।**

मी (परमात्मा) सर्वांच्या बुद्धींत प्रविष्ट असतों. आणि माझ्यामुळेंच स्मृति (संस्कारजन्य ज्ञान), ज्ञान (स्वरूपज्ञान) व अपोहन (व्यावृत्तिरूपज्ञान म्हणजे सदसद्विवेकशक्ति) बुद्धीमध्यें उत्पन्न होते. मीच सर्व वेदांनीं वेद्य (ज्ञेय) आहे. त्याचप्रमाणें ब्रह्मज्ञानाचें उगमस्थान व वेदांचें तत्त्व जाणणारा, मीच आहें.

[ येथें परमात्म्याचें सर्वांतर्यामित्व, सर्वज्ञत्व व सर्वविद्यामूलत्व सांगितलें आहे.]

वरील सर्व विभूतिरूप उदाहरणांचें समष्टिरूप वर्णन करितात—

**द्वाविमौ पुरुषौ लोके क्षरश्चाक्षर एव च**
**क्षरः सर्वाणि भूतानि कूटस्थोऽक्षर उच्यते** १६

**लोके क्षरः च अक्षरः च इमौ द्वौ एव पुरुषौ। सर्वाणि भूतानि क्षरः, कूटस्थः अक्षरः उच्यते।**

सृष्टीमध्यें क्षर (नाशवंत) व अक्षर (अविनाशी) असे हे दोनच पुरुष (विभाग) आहेत. (त्यापैकीं) सर्व सृष्ट पदार्थ हा क्षर (विभाग) व सर्व पदार्थांच्या अंतर्यामीं असणारें आत्मतत्त्व हा अक्षर (विभाग) होय.

[ अ. ७, श्लोक ४।५ यांतील अपरा व परा प्रकृति आणि अध्याय १३, श्लोक १ यांतील क्षेत्र व क्षेत्रज्ञ हेच या श्लोकांतील क्षर व अक्षर पुरुष होत. क्षर हा रूपांतर पावणारा व अक्षर हा अव्यय असून ह्या दोन विभागांच्या मिश्रणानेंच सर्व सृष्टि बनलेली आहे.]

**उत्तमः पुरुषस्त्वन्यः परमात्मेत्युदाहृतः**
**यो लोकत्रयमाविश्य बिभर्त्यव्यय ईश्वरः** १७

**अन्यः तु उत्तमः पुरुषः परमात्मा इति उदाहृतः। यः अव्ययः ईश्वरः लोकत्रयम् आविश्य बिभर्ति।**

दुसरा (अक्षर विभाग हा अक्षर ब्रह्मतत्त्वाहून तत्त्वतः निराळा नव्हे) हाच उत्तम पुरुष होय. (त्याला) परमात्मा असें म्हणतात, जो (तो) निर्विकार परमेश्वर (सर्वसत्ताधीश) त्रैलोक्यामध्यें प्रवेश करून त्याचें धारणपोषण करितो.

[ परमात्मतत्त्वाच्या एका अंशावर विवर्तानें भासमान होणाऱ्या प्रकृतीचे ठिकाणीं तिला नियामक व प्रकाशक होणारें चैतन्य हाच क्षराच्या जोडीचा अक्षर पुरुष (विभाग) होय. ह्या श्लोकांत सांगितलेला उत्तम पुरुष म्हणजे प्रकृति-पुरताच अंश नसून अनंत अपार ब्रह्मतत्त्वच होय. प्रकृतीशीं संयुक्त असलेल्या चैतन्यामध्यें असणारें ऐश्वर्य म्हणजे ईशशक्ति, जी सर्व जग व्यापून त्याचें धारण-पोषण करिते, ती शक्ति त्या चैतन्यांशांत प्रकृतिसंयोगानें नवीन उत्पन्न होत नसून तें अनंत व अपार परमात्मतत्वाचें अचिंत्य सामर्थ्य आहे. हें शुद्ध ब्रह्मच उत्तम पुरुष किंवा पुरुषोत्तम होय असें येथें विधान केलें आहे.]

**यस्मात्क्षरमतीतोऽहमक्षरादपि चोत्तमः**
**अतोऽस्मि लोके वेदे च प्रथितः पुरुषोत्तमः** १८

**यस्मात् अहम् क्षरम् अतीतः, अपि च अक्षरात् उत्तमः, अतः लोके वेदे च पुरुषोत्तमः प्रथितः अस्मि ।**

ज्या अर्थी मी (परमात्मा) क्षराच्या (नाशवंत सृष्टीच्या) पलीकडचा व अक्षराहून ( प्रकृतिसंयुक्त क्षेत्रज्ञ पुरुषाहून ) उत्तम (शुद्ध) आहें, त्या अर्थी लोकांत (इतिहास–पुराणांत) व वेदांत मी पुरुषोत्तम ह्या संज्ञेनें प्रसिद्ध आहे, (श्वेताश्वतर उपनिषदांत या-प्रमाणेंच क्षर, अक्षर व परमात्मा या तिहींचें वर्णन आलें आहे. श्वेताश्वतर उपनिषद् अध्याय १, श्लोक ९-१०-११).

[ क्षराच्या म्हणजे क्षेत्राच्या पलीकडचा ( त्याहून वेगळा ) व अक्षराहून उत्तम म्हणजे क्षेत्रज्ञाहून ( अक्षररूप प्रकृतिसंयुक्त अंशाहून ) शुद्ध असें जें स्वयंप्रकाश, सर्वशक्तिमान, अनंत, अपार, शुद्ध ब्रह्मतत्त्व हाच पुरुष उत्तम होय असें येथें मागील श्लोकांतील विधानाचें निगमन केलें आहे.]

ह्या पुरुषोत्तम ज्ञानाचें फल सांगतातः—

**यो मामेवमसंमूढो जानाति पुरुषोत्तमम्**
**स सर्वविद्भजति मां सर्वभावेन भारत** १९

**भारत, यः असंमूढः माम् एवम् पुरुषोत्तमम् जानाति सः सर्ववित्, सर्वभावेन माम् भजति ।**

अर्जुना, जो मोहरहित (स्थितप्रज्ञ) मी (परमात्मा) ह्याप्रमाणें पुरुषोत्तम आहें असें जाणतो, तो सर्वज्ञ होत्साता, सर्व भावानें म्हणजे सर्वत्र परमात्मा भरला आहे अशा भावनेनें माझें (परमात्म्याचें) आराधन करितो.

[ श्लोक १७।१८ यांत वर्णिल्याप्रमाणें पुरुषोत्तम स्वरूपाचें ज्याला यथार्थ ज्ञान झालेलें असतें तो सर्व विश्व हें परमेश्वराचेंच स्वरूप आहे असें जाणून जगताच्या धारणपोषणार्थ जें कांहीं करतो तें सर्व परमेश्वराचेंच आराधन होतें.

येथवर प्रतिपादन केलेलें ज्ञान विज्ञान बुद्धीमध्यें चांगलें ठसलें तरच मानवी बुद्धि परिपूर्ण होते. म्हणजे तिचा पूर्ण विकास होतो आणि अशा परिपूर्ण बुद्धीच्या मनुष्याच्या अंतःकरणांत सर्वभूतहिताची शुद्ध भावना जागृत होऊन तो समष्टिधर्मास म्हणजे राष्ट्रधर्मास समर्थ होतो. या श्लोकांतील 'सर्ववित्' या शब्दानें बुद्धीची ( ज्ञानाची ) पूर्णता दर्शविली असून 'सर्वभावेन' या पदानें समष्टिधर्म दर्शविला आहे. हेंच तत्त्व छांदोग्यांतही आलें आहे ( छां. अ. २, खं २१, मं. ४ ). यावरून अमृतत्वाप्रमाणेंच राष्ट्रोन्नतीच्या कार्यालादेखील गीताशास्त्राची ( ज्ञानविज्ञानाची ) कशी आवश्यकता आहे हें सहज लक्षांत येण्याजोगें आहे.]

आतांपर्यंत सांगितलेल्या ज्ञानविज्ञानाचें फल सांगतातः—

**इति गुह्यतमं शास्त्रमिदमुक्तं मयाऽनघ**
**एतद्बुद्ध्वा बुद्धिमान्स्यात्कृतकृत्यश्च भारत** २०

**अनघ, इति इदम् गुह्यतमम् शास्त्रम् मया उक्तम् । भारत, एतत् बुद्ध्वा बुद्धिमान् कृतकृत्यः च स्यात् ।**

हे निष्पाप अर्जुना, असें हें अत्यंत गुह्य शास्त्र ( ज्ञानविज्ञान ) मीं ( तुला ) सांगितलें आहे. अर्जुना, हें शास्त्रीय ज्ञान झालें म्हणजे पुरुष बुद्धियोगयुक्त व कृतार्थ होतो.

[ 'इति' ह्या शब्दानें येथें अध्याय ८ ते १५ अखेर सांगितलेलें सर्व ज्ञान-विज्ञान विवक्षित आहे. आठव्या अध्यायाच्या प्रारंभीं अर्जुनानें केलेल्या सात प्रश्नांचीं भगवंतानीं जी प्रथम संक्षिप्त उत्तरें दिलीं आहेत, त्यांचेंच विवरण ह्या सात अध्यायांत बरोबर उलट क्रमानें केलेलें आहे. हें ज्ञान–विज्ञानमय शास्त्र बुद्धियोगाच्या पूर्णतेस अवश्य असून तेंच मोक्षप्राप्तीचें साधन आहे असें भगवंतांनीं स्पष्ट सांगितलें आहे.]

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायाम् योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे पुराणपुरुषोत्तमयोगो नाम पंचदशोऽध्यायः ।

याप्रमाणें श्रीभगवंतानीं गाइलेल्या उपनिषदांतील ब्रह्मविद्यांतर्गत कर्मयोग-शास्त्राविषयींच्या श्रीकृष्ण व अर्जुन यांच्या संवादांतील 'पुराण-पुरुषोत्तमप्रकरण' नांवाचा पंधरावा अध्याय समाप्त झाला.

---

# पंधराव्या अध्यायाचा उपसंहार

## पंधराव्या अध्यायाची विषयानुक्रमणिका



तेराव्या अध्यायांत वर्णन केलेला प्रकृति पुरुष-संयोग व सृष्टीचा विस्तार आणि चवदाव्या अध्यायांत वर्णिलेलीं त्रिगुणाचीं कार्यें ह्यांचाच अनुवाद पहिल्या तीन श्लोकांत अश्वत्थ वृक्षाच्या रूपकानें केला आहे. ह्या सृष्टिविस्ताररूप वृक्षाच्या रमणीय दिसणाऱ्या बाह्य स्वरूपांत गुरफटून राहिलेली दृष्टि त्यावरून काढून सृष्टीच्या अंतर्यामीं असणाऱ्या, सर्वांचें आदिकारण अशा अविनाशी ब्रह्मपदाकडे

लावण्यास अनासक्ति म्हणजे स्वार्थत्याग हेंच एक उत्कृष्ट साधन आहे असें सांगितलें आहे. नंतर श्लोक ४।५।६ यांतील ब्रह्मपदाधिकरणांत अमृतत्वप्राप्ती-चा शुद्ध हेतु धारण करणारे कर्मयोगी ह्या ब्रह्मपदाचा शोध विवेकदृष्टीनें करूं लागले म्हणजे अ. २, श्लो. ४५ यांतील पांचही अंशांनीं परिपूर्ण असा बुद्धियोग सिद्ध होऊन ते ब्रह्मपदास प्राप्त होतात. म्हणून जन्ममरणरूप संसारांतून मुक्त होतात असें सांगितलें आहे. ब्रह्मपदप्राप्ति म्हणजे एखादी नसलेली वस्तु मिळवावयाची नसून, ती आत्म्याची स्वयंसिद्ध स्थितिच आहे, हें दाखविण्याकरितां श्लोक ७ ते ११ अखेरच्या जीवब्रह्मैक्याधिकरणांत जीव हा परमात्म्याचा अंश म्हणजे ब्रह्मरूपच असून बुद्धि, मन व इंद्रियें यांचा नियामक आहे, ( ब्रह्मतत्त्व निरवयव, नित्य व अव्यय असल्यामुळे, त्यासंबंधानें 'अंश' किंवा 'पद' अशी शब्दयोजना विवेचनाच्या सोयीसाठीं औपचारिक रीतीनें केलेली आहे हें उघड आहे ) हा जीवात्मा म्हणजे आत्म्याचा लिंगदेह—विशिष्ट अंश कोणत्याही क्षेत्रांत (शरीरांत) प्रवेश करतांना किंवा तें शरीर सोडताना हें अंतःकरण व इंद्रियशक्ति ( लिंगदेह ) बरोबर घेऊन जातो, ह्या लिंगदेहाच्या द्वारानेंच त्याचा बाह्य विषयांशीं संबंध असतो, ह्या जीवात्म्याच्या ठिकाणीं दिसत असलेलें कर्तृत्व किंवा भोक्तृत्व शुद्ध आत्म्याचें नसून, त्याच्याशीं संयुक्त असणाऱ्या लिंगदेहाचें म्हणजे त्रिगुणात्मक उपाधीचें असतें, हा विवेक अज्ञानी मनुष्यास नसल्यामुळें, त्याच्या ठिकाणीं कर्तृत्वाभिमान व उपभोगासक्ति इत्यादि दोष उत्पन्न होऊन, ते संसारचक्रांत फिरत राहतात; परंतु ज्ञानदृष्टि पुरुषांना हा पूर्ण विवेक बाणलेला असल्यामुळें त्यांच्या ठिकाणीं कर्तृत्वाभिमान व उपभोगासक्ति नसते, म्हणून ते मुक्त होतात, म्हणजे त्यांना जीवब्रह्मैक्य अर्थात् अद्वैत साक्षात्कार होतो, असें सांगितलें आहे. हा चैतन्यांश केवळ जीवांतच आहे असें नसून तो पंचमहाभूतात्मक सर्व सृष्टींत भरलेला आहे, हें दाखविण्याकरितां पुढील १२ ते १५ ह्या चार श्लोकांत कांहीं विभूतिरूप उदाहरणें सांगितलीं आहेत. नंतर १६ व्या श्लोकांत सर्व सृष्टीचे क्षर ( नाशवंत ) व अक्षर ( अविनाशी ) असे दोन विभाग केले आहेत. त्यांतील अध्यात्म, कर्म व अधिभूत हा क्षरविभाग असून, ब्रह्म, अधिदैव व अधियज्ञ हा अक्षरविभाग होय. पुढें १७।१८ श्लोकांतील पुरुषोत्तमाधिकरणांत, ह्या क्षर विभागाहून निराळा आणि अक्षर विभागांतील उत्तम जो विभाग तोच सर्व क्षराक्षर सृष्टीचा ईश्वर शुद्ध परब्रह्म किंवा परमात्मा असल्यामुळें तो पुरुषोत्तम ह्या संज्ञेनें

प्रसिद्ध आहे, असें सांगितलें आहे. ह्या पुरुषोत्तमस्वरूपाचें यथार्थ ज्ञान झालें म्हणजे संपूर्ण विश्व परमात्मस्वरूपच आहे अशी भावना होऊन, ज्ञानविज्ञानयुक्त स्थितप्रज्ञाचे सर्व व्यवहार उपासनामय होत असतात, असे १९ व्या श्लोकांत सांगितलें आहे. ह्याप्रमाणें ८ व्या अध्यायांत प्रयाणकालीन ईशस्मरण, ९ व्यांत विश्वांतील व देहांतील अधियज्ञ, १० व्यांत अधिदैव, ११ व्यांत विश्वरूप–अधिभूत, ( १२ व्यांत ९।१०।११ तील व्यक्तोपासनेचा उपसंहार आहे.) १३ व्यांत विसर्ग–कर्म, १४ व्यांत त्रिगुणात्मक स्वभाव म्हणजे अध्यात्म आणि प्रस्तुत अध्यायांत परब्रह्माचें स्वरूप असें अर्जुनाच्या सातही प्रश्नांचें विवरण पूर्ण केलें आहे व शेवटीं हें कर्मयोगाच्या पूर्णतेस अवश्य असलेलें ज्ञानविज्ञानशास्त्र म्हणजे ब्रह्मविद्या संपादन केल्यानें मनुष्य बुद्धियोगयुक्त व जीवन्मुक्त होतो असें सांगून अध्याय समाप्त केला आहे. तात्पर्य, अर्जुनाच्या सात प्रश्नांच्या विवरणाचें पूर्ण व यथार्थ ज्ञान हीच ब्रह्मविद्या होय व ती मोक्षदायक आहे.



# षोडशोऽध्यायः।

दुसऱ्या अध्यायापासून. 'युक्त' व 'अयुक्त' किंवा 'व्यवसायी' व 'अव्यवसायी' श्रद्धावान् अनसूय व अश्रद्धावान् असूयावान्, आत्मवान् छिन्नसंशय व अनात्मवान् संशयी, 'ज्ञानी व अज्ञानी', 'आत्मबंधु व आत्मरिपु', 'सुकृति व दुष्कृति', 'अनावृत्ति व पुनरावृत्ति', 'दैवी व आसुरी किंवा राक्षसी', 'असंमूढ व संमूढ', 'भक्त, अभक्त', 'ज्ञानचक्षु व अज्ञानांध', 'सात्त्विक, राजस व तामस', 'कृतात्मा व अकृतात्मा', याप्रमाणें परस्परविरोधी स्वभावांचे जे उल्लेख आतांपर्यंत प्रत्येक अध्यायांत निरनिराळ्या तऱ्हेनें आले आहेत, त्यांचें खुलासेवार वर्गीकरण करण्याकरितां 'दैवी संपत्ति व आसुरी संपत्ति' यांचें विवेचन करणें हा ह्या अध्यायाचा प्रतिपाद्य विषय आहे.

प्रथम दैवी संपत्ति सांगतात—

**श्रीभगवानुवाच**

**अभयं सत्त्वसंशुद्धिर्ज्ञानयोगव्यवस्थितिः**
**दानं दमश्च यज्ञश्च स्वाध्यायस्तप आर्जवम्** १

**अभयम्, सत्त्वसंशुद्धिः, ज्ञानयोगव्यवस्थितिः, दानम्, दमः च, यज्ञः च, स्वाध्यायः, तपः, आर्जवम्,**

धैर्य, अंतःकरणशुद्धि ( शुद्ध बुद्धि ) ज्ञानविज्ञानपूर्वक कर्तव्यनिष्ठा, ( पात्रापात्रविचारपूर्वक ) परोपकार, इंद्रियनिग्रह, भगवदुपासना, वेदशास्त्राध्ययन, नियमितपणा, सरळ वर्तन,—

**अहिंसा सत्यमक्रोधस्त्यागः शांतिरपैशुनम्**
**दया भूतेष्वलोलुप्त्वं मार्दवं ह्रीरचापलम्** २

**अहिंसा, सत्यम्, अक्रोधः, त्यागः, शांतिः, अपैशुनम्, भूतेषु दया, अलोलुप्त्वम्, मार्दवम्, ह्रीः, अचापलम्,**

निष्कारण पीडा न देणें, सत्य भाषण ( विचार व उच्चार यांतील सुसंगतता ), न चिडणें, स्वार्थत्याग, शांति, निष्कपटपणा, सर्वांभूती दया, निर्लोभता, ( मनाचा ) कोमलपणा, मुर्वत, धिमेपणा,

**तेजः क्षमा धृतिः शौचमद्रोहो नातिमानिता**
**भवंति संपदं दैवीमभिजातस्य भारत ३**

**तेजः, क्षमा, धृतिः, शौचम्, अद्रोहः, न अतिमानिता, भारत दैवीम् संपदम् अभिजातस्य भवंति।**

पाणीदारपणा, ( शरणागताच्या अपराधाची ) माफी करणें, धारणा, अंतर्बाह्य पवित्रता, द्वेषबुद्धीचा अभाव, अहंमन्यता नसणें, ( हे गुण ) हे अर्जुना, दैवी संपत्तीला योग्य असलेल्या कर्मयोग्याचे अंगीं असतात.

[ वरील तीन श्लोकांत सांगितलेले २६ गुण अ. २, श्लोक ४५ यांतील बुद्धियोगाच्या पांच अंशांतच अंतर्भूत होतात. ते असे—१ 'निस्त्रैगुण्य' ह्या अंशांत सत्त्वसंशुद्धि, त्याग, शांति, आर्जव व अपैशुन ह्या पांच गुणांचा समावेश होतो. २ 'निर्द्वंद्व' ह्या अंशांत अभय, अहिंसा, अक्रोध व अद्रोह ह्या चार गुणांचा अंतर्भाव होतो. ३ 'नित्यसत्वस्थ' ह्या अंशांत दान, सत्य, दया, मार्दव, ह्री, तेज, क्षमा, धृति, शौच व नातिमानिता हे दहा गुण येतात. ४ 'निर्योगक्षेम' ह्या अंशांत अलोलुप्त्व व अचापल ह्या दोन गुणांचा समावेश होतो आणि ५ 'आत्मवान्' ह्या अंशांत ज्ञानयोगव्यवस्थिति, दम, यज्ञ, स्वाध्याय व तप ह्या पांच गुणांचा अंतर्भाव होतो. ह्याप्रमाणें दुसऱ्या अध्यायांतील 'स्थितप्रज्ञाचें' वर्णन पांचव्या अध्यायांतील 'जीवन्मुक्ताचें' ( समदर्शी ) वर्णन, सहाव्या अध्यायांतील 'योगारूढाचें' वर्णन, बाराव्या अध्यायांतील 'भगवद्भक्ताचें' वर्णन, तेराव्या अध्यायांतील 'ज्ञान्याचें' वर्णन, चौदाव्या अध्यायांतील 'गुणातीताचें' वर्णन, व सोळाव्या अध्यायांतील ५ व्या श्लोकांतील वर्णन व याचा निष्कर्ष म्हणून येथें सांगितलेली दैवी संपत्ति हीं सर्व वर्णनें अ. २, श्लोक ४५ यांतील बुद्धियोगाच्या पांच अंशांसच धरून असल्यामुळें तीं स्थितप्रज्ञ कर्मयोग्याचींच लक्षणें आहेत हें सिद्ध आहे.]

आतां आसुरी संपत्ति सांगतातः—

**दंभो दर्पोऽभिमानश्च क्रोधः पारुष्यमेव च**
**अज्ञानं चाभिजातस्य पार्थ संपदमासुरीम् ४**

**पार्थ, आसुरीम् संपदम् अभिजातस्य, दंभः, दर्पः, अभिमानः, क्रोधः, पारुष्यम् एव च, अज्ञानम् च ( भवंति )।**

अर्जुना, आसुरी संपत्तीला योग्य असलेल्या ( अयुक्त ) मनुष्याचे अंगीं ढोंगीपणा, उर्मटपणा, गर्व, चिडखोरपणा, क्रूरपणा आणि त्याचप्रमाणें अज्ञान ( हे दोष असतात ).

ह्या दोन संपत्तींचे परिणाम सांगतातः—

**दैवी संपद्विमोक्षाय निबंधायासुरी मता**
**मा शुचः संपदं दैवीमभिजातोऽसि पांडव** ५

**पांडव, दैवी संपत् विमोक्षाय, आसुरी निबंधाय मता। दैवीम् संपदम् अभिजातः असि। मा शुचः।**

अर्जुना, दैवी संपत्ति मोक्षाला ( कारण होते ) व आसुरी संपत्ति बंधनाला ( कारण होते ), असें मानिलें आहे. तूं दैवी संपत्तीस योग्य आहेस. शोक ( काळजी ) करूं नको.

[ दैवी संपत्ति मोक्षाला प्रत्यक्ष कारण असलेल्या अपरोक्ष ज्ञानाची निदर्शक आहे. ह्या दैवी संपत्तीचे जे २६ गुण सांगितले आहेत त्यांवरून दैवी संपत्ति हीच अभ्युदयाची म्हणजे उत्कर्षाची पूर्णता होय, हें उघड आहे. आसुरी संपत्ति ही नाशाची सामग्री असून, त्यांतील दोषांच्या योगानें अवनति व शेवटीं अधःपात होणार हेंही उघड आहे. दैवी संपत्ति संपादन करण्याकरितां सांगितली आहे आणि आसुरी संपत्ति त्यागाकरितां सांगितली आहे. मानवी प्राण्याच्या त्रिगुणात्मक स्वभावांत ह्या दोन्ही संपत्तींची बीजें जन्मतःच कमीजास्त प्रमाणानें असतात. त्यांपैकीं आसुरी दोषांचा नाश करून दैवी गुणांचा परिपोष करणें हेंच मानवी जन्मांतील श्रेष्ठ कर्तव्य होय. ह्या दैवी संपत्तीचे गुण अर्जुनाच्या अंगीं वास करीत असल्यामुळें त्याच्या अंतःकरणांत धर्माधर्माविषयीं तात्त्विक जिज्ञासा उत्पन्न झाली होती. भगवंतांनीं त्याला येथपर्यंत सांगोपांग ज्ञानविज्ञानपूर्वक कर्मयोगाचा उपदेश करून, ती जिज्ञासा तृप्त केली आहे. आणि 'तूं दैवी संपत्तीच्या योग्य झाला आहेस' असें त्याला आश्वासन देऊन, त्याच्या ठिकाणीं आत्मप्रत्यय उत्पन्न केला आहे.]

दैवी स्वभावाचें वर्णन जसें अनेक स्थलीं विस्तारानें केलें आहे. तसें आसुरी स्वभावाचें वर्णनही विस्तृत रीतीनें केलें म्हणजे त्याचें नीचत्व स्पष्ट समजून त्याच्या

त्यागाविषयींची प्रवृत्ति उत्कट होईल म्हणून, आसुरी स्वभावाचें विस्तृत वर्णन करण्याकरितां म्हणतात.—

**द्वौ भूतसर्गौ लोकेऽस्मिन्दैव आसुर एव च**
**दैवो विस्तरशः प्रोक्त आसुरं पार्थ मे शृणु** ६

**पार्थ, अस्मिन् लोके दैवः आसुरः एव च द्वौ भूतसर्गौ, दैवः विस्तरशः प्रोक्तः, आसुरम् मे शृणु ।**

अर्जुना, ह्या लोकीं दैव व आसुर असे मानवी प्राण्यांचे दोन स्वाभाविक प्रकार असतात (त्यांपैकीं) दैवीप्रकाराचें वर्णन येथ-पर्यंत ठिकठिकाणीं विस्तारानें केलें आहे. (आतां) आसुर प्रकार मी सांगतों तो ऐक.

**प्रवृत्तिं च निवृत्तिं च जना न विदुरासुराः**
**न शौचं नापि चाचारो न सत्यं तेषु विद्यते** ७

**आसुराः जनाः प्रवृत्तिम् च निवृत्तिम् च न विदुः । तेषु शौचम् न, आचारः अपि न च, सत्यम् न विद्यते ।**

आसुरी स्वभावाचे लोक कर्तव्य–अकर्तव्य म्हणजे विधिनिषेध जाणत नाहींत. त्याच्या अंगीं पवित्रता नसते व सदाचार नसतो आणि खरेपणाही नसतो.

**असत्यमप्रतिष्ठं ते जगदाहुरनीश्वरं**
**अपरस्परसंभूतं किमन्यत्कामहैतुकम्** ८

**ते जगत् असत्यम्, अप्रतिष्ठम्, अनीश्वरम्, अपरस्परसंभूतम्, काम-हैतुकम्, अन्यत् किम् ( इति ) आहुः ।**

ते (आसुरी स्वभावाचे लोक) हें जग असत्य (ज्यामध्यें खरे-पणा नाहीं असें), ज्याला आधार नाहीं, ज्याला शास्ता किंवा नियामक नाहीं, कार्यकारण संबंधावांचून (आकस्मिक) उत्पन्न झालेलें. उपभोग एवढेंच ज्याचें प्रयोजन आहे, दुसरें काय ? (दुसरें कांहीं प्रयोजन नाहीं) असें म्हणतात.

[ ह्या श्लोकांत जगताच्या उत्पत्तिस्थितीसंबंधानें नास्तिकांची विचारसरणी

सांगितली आहे. नास्तिकांना ईश्वराचें अस्तित्व, पापपुण्य, परलोक, पुनर्जन्म व मोक्ष इत्यादि पारमार्थिक तत्त्वें मान्य नसल्यामुळें, 'बळी तो कान पिळी' हाच त्यांचा सर्वमान्य सिद्धान्त असतो. विषयोपभोग हीच मानवी जन्माची इतिकर्तव्यता व हेंच परमसाध्य, अशी त्यांची भावना असते. ईश्वर, धर्माधर्म, पापपुण्य किंवा नीति–अनीति वगैरे गोष्टी दुर्बल लोकांनीं स्वतःच्या बचावाकरितां कल्पित रचलेल्या आहेत, असें त्यांचें मत असतें.]

**एतां दृष्टिमवष्टभ्य नष्टात्मानोऽल्पबुद्धयः**
**प्रभवंत्युग्रकर्माणः क्षयाय जगतोऽहिताः ९**

**एताम् दृष्टिम् अवष्टभ्य, नष्टात्मानः, अल्पबुद्धयः, उग्रकर्माणः, जगतः अहिताः क्षयाय प्रभवंति ।**

ह्या दृष्टीचा (विचारसरणीचा) आश्रय केल्यामुळें, अंतःकरणशून्य. कोत्या बुद्धीचे, क्रूर कर्में करणारे, जगताचे शत्रु (बनलेले) नाशाला कारण होतात.

[ नास्तिक विचारसरणीचें अवलंबन केलें म्हणजे, सदसद्विचारशक्ति नष्ट होते, बुद्धि भ्रष्ट होते, दुसऱ्याच्या सुखदुःखाची पर्वा वाटेनाशी होते, स्वतःच्या चैनीकरितां जगाचा नाश झाला तरी बेहेत्तर, इतकी स्वार्थपरायणतेची कमाल होते. असले आसुरी लोक मानवी जातीचे शत्रु होत.

नास्तिक तत्त्वज्ञानानें किंवा मतानें समाजास आसुरी वळण लागतें व त्यायोगें अखिल मानवजातीचें नुकसान होतें, असें वरील श्लोकाचें तात्पर्य आहे.]

**काममाश्रित्य दुष्पूरं दंभमानमदान्विताः**
**मोहाद्गृहीत्वाऽसद्ग्राहान् प्रवर्ततेऽशुचिव्रताः १०**

**दुष्पूरम् कामम् आश्रित्य दंभमानमदान्विताः, अशुचिव्रताः, मोहात् असद्ग्राहान् गृहीत्वा प्रवर्तंते ।**

पूर्ण होण्यास अशक्य अशा उपभोगवासनांचें अवलंबन करून, ढोंग, गर्व व उन्मत्तपणा ह्यांनीं युक्त, (अतएव) अशुद्धाचरण करणारे (आसुरी लोक) भ्रमानें अपसिद्धान्त खरे मानून, (त्याप्रमाणें ) वर्तन करीत असतात.

[ हे नास्तिक लोक आपल्या विषयवासना तृप्त करण्याकरितां नाना प्रकारची

ढोंगें माजवून गर्विष्ठपणानें इतरांस तुच्छ समजतात असे लोक मनानें व शरीरानेंही भ्रष्ट झालेले असतात.]

**चिंतामपरिमेयां च प्रलयांतामुपाश्रिताः**
**कामोपभोगपरमा एतावदिति निश्चिताः ११**

**अपरिमेयाम् चिंताम् च प्रलयांताम् उपाश्रिताः, कामोपभोगपरमाः, एतावत् इति निश्चिताः ।**

ते (विषयोपभोगाची) अपार चिंता आमरणान्त वाहत असतात, विषयोपभोग हाच त्यांना परमपुरुषार्थ वाटत असतो, आणि जेवढें प्रत्यक्ष दिसतें तेवढेंच खरें अशी त्यांची ठाम समजूत झालेली असते.

**आशापाशशतैर्बद्धाः कामक्रोधपरायणाः**
**ईहंते कामभोगार्थमन्यायेनार्थसंचयान् १२**

**आशापाशशतैः बद्धाः, कामक्रोधपरायणाः, कामभोगार्थम् अन्यायेन अर्थसंचयान् ईहंते।**

शेंकडों आशारूपी पाशांनीं बांधले गेल्यामुळें कामक्रोधाधीन झालेले (ते) विषयोपभोगाच्या हेतूनें अन्यायानें द्रव्य संपादन करण्याची इच्छा करितात.

[ विषयवासनांच्या स्वाधीन झालेल्या लोकांच्या आशा एकसारख्या वाढत जातात. त्यामुळें, स्वतःची चैन चालविण्याकरितां वाटेल त्या अन्यायाच्या मार्गानें द्रव्य मिळविण्यास ते मागेंपुढें पाहात नाहींत.]

**इदमद्य मया लब्धमिमं प्राप्स्ये मनोरथम्**
**इदमस्तीदमपि मे भविष्यति पुनर्धनम् १३**

**अद्य मया इदम् लब्धम्, इमम् मनोरथम् प्राप्स्ये, इदम् धनम् मे अस्ति, इदम् अपि पुनः भविष्यति ।**

आज मला हा लाभ झाला, हा माझा मनोरथ (खचित) पूर्ण होणार, हें द्रव्य माझें (माझ्याजवळ) आहे, आणि हेंही (आणखीही) पुनः (हस्तगत) होणार आहे,—

**असौ मया हतः शत्रुर्हनिष्ये चापरानपि**
**ईश्वरोऽहमहं भोगी सिद्धोऽहं बलवान् सुखी १४**

**मया असौ शत्रुः हतः, अपरान् अपि हनिष्ये च, अहम् ईश्वरः, अहम् भोगी, अहम् सिद्धः, बलवान्, सुखी।**

मीं ह्या शत्रूला ठार केलें, दुसऱ्या (शत्रूंना) देखील असेंच ठार करीन, (मीच) सत्ताधारी, मीच चैनी, मीच (वाटेल तें करण्यास) समर्थ (कृतकृत्य), (मीच) बलवान्, (मीच) सुखी (असें ते समजत असतात).

**आढ्योऽभिजनवानस्मि कोऽन्योऽस्ति सदृशो मया**
**यक्ष्ये दास्यामि मोदिष्य इत्यज्ञानविमोहिताः १५**

**आढ्यः, अभिजनवान् अस्मि, मया सदृशः अन्यः कः अस्ति, यक्ष्ये, दास्यामि, मोदिष्ये, इति अज्ञानविमोहिताः (संति)।**

(मी) श्रीमान्, मी कुलीन आहें, माझ्यासारखा दुसरा कोण आहे, मी उत्सव व समारंभ करीन, मी बिदाग्या देईन, मी चैन करीन इत्यादि अज्ञानानें (अज्ञानमय विचारांनीं) मोहित झालेले असतात.

**अनेकचित्तविभ्रांता मोहजालसमावृताः**
**प्रसक्ताः कामभोगेषु पतंति नरकेऽशुचौ १६**

**अनेकचित्तविभ्रांताः, मोहजालसमावृताः कामभोगेषु प्रसक्ताः, अशुचौ नरके पतंति।**

ज्यांच्या अंतःकरणांत अनेक प्रकाराचे भ्रम उत्पन्न झालेले असतात, जे मोहरूप जाळ्यांत गुरफटलेले असतात. जे विषयोपभोगाविषयीं लंपट झालेले असतात ते अपवित्र नरकांत पडतात (अधोगतीला जातात).

आठव्या श्लोकापासून येथपर्यंत आसुरी स्वभावाच्या नास्तिक लोकांचें वर्णन झालें; परंतु आसुरी वृत्ति केवळ नास्तिकांतच असते असें नाहीं, तर आस्तिक म्हणविणारेही कांहीं लोक आसुरी वृत्तीचे कसे असतात तें सांगतातः—

**आत्मसंभाविताः स्तब्धा धनमानमदान्विताः**
**यजंते नामयज्ञैस्ते दंभेनाविधिपूर्वकम् १७**

**ते आत्मसंभाविताः, स्तब्धाः धनमानमदान्विताः, नामयज्ञैः दंभेन अविधिपूर्वकम् यजंते।**

ते (आस्तिक म्हणविणारे आसुरी स्वभावाचे लोक) आपली आपणच बढाई मानणारे, गर्वानें ताठलेले, संपत्ति व मोठेपणा यांच्या मदानें उन्मत्त झालेले, नांव मिळविण्याच्या उद्देशानें (आपल्याला मोठी पदवी मिळावी म्हणून) केलेल्या दिखाऊ यज्ञांनीं, ढोंगानें व विधिविधानाचा विचार न करितां (कसे तरी) यज्ञ करीत असतात.

**अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं च संश्रिताः**
**मामात्मपरदेहेषु प्रद्विषंतोऽभ्यसूयकाः १८**

**अहंकारम्, बलम्, दर्पम्, कामम्, क्रोधम् च संश्रिताः, अभ्यसूयकाः (ते) आत्मपरदेहेषु माम् प्रद्विषंतः भवंति।**

मीपणा, दुराग्रह, उर्मटपणा, विषयवासना, क्रोध इत्यादि दोषांनीं भरलेले आणि मत्सरी स्वभावाचे (ते लोक) आपल्या व इतरांच्या हृदयांत वास करणाऱ्या माझा (परमेश्वराचा फार) द्वेष करीत असतात.

**तानहं द्विषतः क्रूरान् संसारेषु नराधमान्**
**क्षिपाम्यजस्रमशुभानासुरीष्वेव योनिषु १९**

**अहम् तान् द्विषतः क्रूरान्, अशुभान्, नराधमान्, संसारेषु आसुरीषु योनिषु एव अजस्रम् क्षिपामि।**

मी परमेश्वर त्या भगवद्द्वेषी, क्रूर, पातकी, नराधमांना, जन्ममरणरूप संसारांतील क्रूर योनींमध्येंच नेहमीं (कायमचे) ढकलून देतों.

**आसुरीं योनिमापन्ना मूढा जन्मनि जन्मनि**
**मामप्राप्यैव कौंतेय ततो यांत्यधमां गतिम् २०**

**कौंतेय, ततः मूढाः आसुरीम् योनिम् आपन्नाः जन्मनि जन्मनि माम् अप्राप्य एव अधमाम् गतिम् यांति।**

अर्जुना, तदनंतर ते मूढ लोक आसुरी योनीला प्राप्त होऊन जन्मोजन्मीं माझी (परमेश्वराची) प्राप्ति न होतांच अधोगतीला जातात.

**अशा आसुरी स्वभाव उत्पन्न होण्याचीं मुख्य कारणें सांगतातः—**

**त्रिविधं नरकस्येदं द्वारं नाशनमात्मनः**
**कामः क्रोधस्तथा लोभस्तस्मादेतत्त्रयं त्यजेत्** २१

**कामः क्रोधः तथा लोभः इदम् त्रिविधम् आत्मनः नाशनम् नरकस्य द्वारम्। तस्मात् एतत् त्रयम् त्यजेत्।**

काम, क्रोध व लोभ असें हें तीन प्रकारचें आत्मविघातक नरकाचें द्वार आहे. म्हणून हे तिन्ही दोष वर्ज करावे.

[ वर सांगितलेल्या आसुरी स्वभावांतील सर्व दोषांचा, किंबहुना जगांतील सर्व अनर्थांचा उगम काम, क्रोध व लोभ यांपासूनच होतो, म्हणून ह्या तीन दोषांचें निरसन करण्याचा प्रयत्न केला असतां सर्व दोषांचें निवारण सहज होऊं शकतें.]

**एतैर्विमुक्तः कौंतेय तमोद्वारैस्त्रिभिर्नरः**
**आचरत्यात्मनः श्रेयस्ततो याति परां गतिम्** २२

**कौंतेय, एतैः त्रिभिः तमोद्वारैः विमुक्तः नरः आत्मनः श्रेयः आचरति, ततः पराम् गतिम् याति।**

अर्जुना, ह्या (तीन दोषरूप) नरकद्वारांपासून मुक्त झालेला (दूर राहिलेला) पुरुष आत्मकल्याणाचें आचरण करितो, व तेणें-करून श्रेष्ठ गतीला जातो (मुक्त होतो).

[ वर सांगितलेले काम, क्रोध, लोभ हे तीन दोष नाहींसे झाल्यावांचून श्रेयोमार्गाचें अवलंबन करितां येणें शक्य नाहीं. म्हणून या तीन दोषांचें प्रथम निरसन करणें अवश्य आहे.]

हे तीन दोष निरसन होण्याचें साधन शास्त्रशुद्ध आचरण हेंच आहे असें व्यतिरेकानें म्हणजे विरुद्ध क्रियेचा परिणाम दाखवून सांगतातः—

**यः शास्त्रविधिमुत्सृज्य वर्तते कामकारतः**
**न स सिद्धिमवाप्नोति न सुखं न परां गतिम्** २३

**यः शास्त्रविधिम् उत्सृज्य कामकारतः वर्तते, सः सिद्धिम् न अवाप्नोति, सुखम् न, पराम् गतिम् न (अवाप्नोति)।**

जो शास्त्राचे नियम झुगारून देऊन, विषयवासनांच्या लहरींप्रमाणें वर्तन करितो, त्याला (कोणत्याही कार्यांत) यश मिळत नाहीं, सुख होत नाहीं व श्रेष्ठ गति प्राप्त होत नाहीं.

[ मनसोक्त वागणाऱ्या मनुष्याच्या हातून शास्त्रशुद्ध आचरण होणें शक्य नसतें. कारण, शास्त्राप्रमाणें वागणूक ठेवावयाची असल्यास कामादि दोषांस आळा घालणें भाग पडतें. परंतु विषयलंपट मनुष्याची तशी तयारी नसल्यामुळें त्याच्या हातून शुद्ध आचरण घडत नाहीं. अर्थात् त्याला सुख, सिद्धि व उत्तम गतिही मिळत नाहीं. ]

**तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ**
**ज्ञात्वा शास्त्रविधानोक्तं कर्म कर्तुमिहार्हसि २४**

**ते कार्याकार्यव्यवस्थितौ शास्त्रम् प्रमाणम्, तस्मात् शास्त्रविधानोक्तम् कर्म ज्ञात्वा, इह कर्तुम् अर्हसि ।**

(अर्जुना) तुला कर्तव्याकर्तव्य निश्चित करण्याच्या बाबतीत शास्त्र हेंच प्रमाण आहे. म्हणून शास्त्रानें विहित ठरविलेल्या कर्माचें यथार्थ ज्ञान संपादन करून (त्या कर्माचें) सांप्रत आचरण करणें हेंच तुला योग्य आहे.

[ आर्यधर्मांतील प्रमाणशास्त्र श्रुति म्हणजे वेद होत. ज्याला शास्त्रशुद्ध आचरण करावयाचें असेल, त्यानें करावयाचें काय व न करावयाचें काय, हें ह्या शास्त्रावरून ठरवून, त्यांत सांगितलेले विधिनिषेध पाळले पाहिजेत. ह्याप्रमाणें शास्त्रशुद्ध मार्गाचें अवलंबन करून व (अ. ४, श्लोक १८ यांत सांगितल्याप्रमाणें ) कर्माचें तात्त्विक ज्ञान संपादन करून निष्कामकर्मयोगाचरण करणें हेंच मनुष्यास योग्य होय. ]

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायाम् योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे दैवासुरसंपद्विभागयोगो नाम षोडशोऽध्यायः ।**

याप्रमाणें श्रीभगवंतांनीं गाइलेल्या उपनिषदांतील ब्रह्मविद्यांतर्गत कर्मयोगशास्त्राविषयींच्या श्रीकृष्ण व अर्जुन यांच्या संवादांतील दैवासुरसंपद्विभाग प्रकरण नांवाचा सोळावा अध्याय समाप्त झाला.

---

## सोळाव्या अध्यायाचा उपसंहार

'दिव्' म्हणजे प्रकाशणें ह्या धातूपासून देव म्हणजे प्रकाशमान् व दैवी म्हणजे देवसंबंधीं, अर्थात् प्रकाशमय असा अर्थ होतो. संपत्ति म्हणजे सामग्री किंवा

वैभव. यावरून दैवी संपत्ति म्हणजे प्रकाशमय अथवा ज्ञानमय सामग्री किंवा ज्ञानयुक्त ऐश्वर्य असा अर्थ होतो. आणि 'असुर' ह्याचा अर्थ 'अस्' म्हणजे फेंकणें, नाश करणें, यापासून असुर म्हणजे फेंकणारे अथवा नाश करणारे, किंवा असु म्हणजे प्राण यांचे ठिकाणींच 'र' म्हणजे रममाण असणारे अर्थात् विषयलंपट असा अर्थ आहे. आसुरी म्हणजे असुरसंबंधीं ( नाशकारक किंवा विषयभोगात्मक ), अज्ञानमय, संपत्ति म्हणजे साधनसामग्री होय. पहिल्या तीन श्लोकांत दैवी संपत्तीचीं मुख्य लक्षणें व ४ थ्या श्लोकांत आसुरी संपत्तीचे प्रमुख दोष सांगून, पांचव्या श्लोकांत दैवी संपत्ति ही स्वतःस कल्याणकारक व इतरांस सन्मार्गप्रवर्तक होते, असें भगवंतांनीं सांगितलें आहे. या दैवी संपत्तीस अर्वाचीन भाषेत नीति असें म्हणण्याचा प्रघात आहे. मनुष्यानें जगांत नीतीनेंच कां वागलें पाहिजे व अनीतीनें कां वागतां कामा नये, या प्रश्नाचें उत्तर 'समाजाच्या सुख-सोयी' एवढेंच केवळ नसून, मनुष्यप्राण्याचें मोक्ष हें प्राप्तव्य व लोकसंग्रह हें कर्तव्य असल्यामुळें प्रत्येकानें नीतीनेंच वागलें पाहिजे असें गीताशास्त्राचें उत्तर आहे. मनुष्यानें आपला स्वतःचा उद्धार करून घेतलाच पाहिजे. आत्मघात करतां कामा नये, अशी भगवंतांची आज्ञा आहे. (अ. ६, श्लोक५-६). व्यवहारांतही आत्मघात हा गुन्हा समजण्यांत येतो. ह्याप्रमाणें मोक्षसंपादनाची आवश्यकता सिद्ध असल्यामुळें, मोक्षसाधनीभूत असणारी दैवी संपत्ति संपादन करण्याचा प्रयत्न करणें हें प्रत्येकाचें अवश्य कर्तव्यच होय, असें सहजच सिद्ध होतें. ह्या दैवी संपत्तीच्या योगानेंच सिद्धावस्थेंत तरी लोकसंग्रह होत असतो. ६व्या श्लोकांत आसुरी संपत्तीची प्रस्तावना करून, श्लोक७ते२०अखेर आसुरी स्वभावांतील दोष व दुष्ट विचार यांचें वर्णन केलें आहे, व २१ व्या श्लोकांत, सर्व अनीतीचें व अनर्थाचें मूळ काम, क्रोध व लोभ ह्या तीन दोषांत असल्यामुळें, त्यांचा पूर्णपणें त्याग केला पाहिजे असें सांगितलें आहे. हे दोष जसजसे क्षीण होत जातील तसतसा मनुष्य श्रेयस्कर कर्मयोगाचरणास प्रवृत्त होतो व शेवटीं मोक्ष प्राप्त करून घेण्यास समर्थ होतो, असें २२ व्या श्लोकांत सांगितलें आहे. काम, क्रोध व लोभ हे दोष अंतःकरणांत जर प्रबल असतील तर, तो मनुष्य ह्या दोषांच्या आधीन होऊन स्वेच्छाचारी बनतो, व त्याला शास्त्रांतील विधिनिषेधांची म्हणजे नीति-अनीतीची पर्वा रहात नाहीं. ह्या स्वैर वर्तनानें त्याला ऐहिक सुख होत नाहीं आणि शेवटीं अधःपातही होतो. म्हणून हे तीन दोष घालविण्याकरितां, मनुष्यानें

प्रथम शास्त्रांतील विधिनिषेध पाहून विहित मार्गाचेंच अवलंबन करावयास पाहिजे. अंतःकरणांतील दोष जोंपर्यंत पूर्णपणें नाहींसे झालेले नसतात, तोंपर्यंत कर्तव्याकर्तव्यनिश्चयाच्या बाबतींत विधिनिषेधात्मक शास्त्रांवरच सर्वथैव अवलंबून रहाणें भाग असतें. कारण, दोषयुक्त बुद्धि धर्माधर्माचा निर्णय करण्यास असमर्थ असते. हे तीन प्रमुख दोष नाहींसे होऊन ज्ञानविज्ञानाच्या योगानें शुद्ध झालेल्या बुद्धीच्या साह्यानें स्थितप्रज्ञ पुरुष जो कार्याकार्यनिर्णय करितो तो धर्मशास्त्रस्वरूपच असतो असें २३।२४श्लोकांत सांगून व शेवटीं प्रामाण्यबुद्धीनें शास्त्रविहित कर्म ज्ञानपूर्वक करणें हेंच योग्य आहे, असें भगवंतांनीं अर्जुनास सांगून अध्यायाची परिसमाप्ति केली आहे. सारांश, आसुरी दोषांचा त्याग करून व दैवी सद्गुण संपादन करून ज्ञानपूर्वक शास्त्रविहित कर्म अर्थात् कर्मयोग आचरण करीत राहणें हीच मानवी जन्माची इतिकर्तव्यता होय.



# सप्तदशोऽध्यायः ।

सोळाव्या अध्यायाचे शेवटीं बुद्धि दोषरहित म्हणजे नितांतशुद्ध होईपर्यंत मनुष्यानें शास्त्रविहित कर्माचरण केलें पाहिजे असें सांगितलें आहे. त्याचप्रमाणें अ. ३, श्लोक ३१ यांतही श्रद्धापूर्वक सत्कर्माचरण करणें हाच अगदीं आरंभींचा मार्ग सांगितला आहे. ह्यावरून कर्मयोगाचा प्रारंभ श्रद्धेपासून आहे हें उघड आहे. सोळाव्या अध्यायांत ज्याप्रमाणें सद्गुण व दुर्गुण यांचें वर्गीकरण सांगून पूर्वी येऊन गेलेल्या गुणदोषांचें विवेचन केलें आहे त्याचप्रमाणें कर्मयोगाच्या प्रारंभीं अवश्य असलेल्या श्रद्धेचें पूर्ण विवेचन करणे हा या अध्यायांतील प्रतिपाद्य विषय आहे.

शास्त्रांतील विधिनिषेधज्ञान नसून नुसतीच श्रध्दा असेल, तर त्या श्रद्धेचा परमार्थमार्गांत कांहीं उपयोग होतो कीं नाहीं, हें समजून घेण्याकरितां अर्जुन विचारतो:—

**अर्जुन उवाच**

**ये शास्त्रविधिमुत्सृज्य यजंते श्रद्धयान्विताः**
**तेषां निष्ठा तु का कृष्ण सत्त्वमाहो रजस्तमः ॥ १**

कृष्ण, ये शास्त्रविधिम् उत्सृज्य श्रद्धयान्विताः यजंते, तेषाम् निष्ठा तु का? सत्त्वम् आहो, रजः, तमः?

अर्जुन म्हणाला—हे श्रीकृष्णा, जे शास्त्रविधि सोडून (विधीचा विचार न करितां) श्रद्धापूर्वक उपासना करतात, त्यांची स्थिति तरीं कोणती? सात्त्विक किंवा राजस अथवा तामस असते?

[ विहित कर्म कोणतें, कसें व कां करावें अशा तीन आकांक्षा असतात. या तिन्ही गोष्टींचा निर्णय शास्त्रांत केलेला असतो. त्यावरून कोणतें कर्म कोणत्या कालीं, कोणत्या ठिकाणीं व कोणत्या सामग्रीनें केलें असतां काय फलप्राप्ति होते याचें यथार्थ ज्ञान होतें. परंतु इतका सर्व विचार करण्याचें सामर्थ्य किंवा संधि सर्वांस सर्वकाळ अनुकूल असतेच असा नियम नाहीं. तथापि श्रद्धा हा मनुष्याचा नैसर्गिक मनोधर्म असल्यामुळें ती नवीन संपादन करावयाची नसते. या श्रद्धेचेच तेवढें अवलंबन करून, शास्त्रविधीच्या ज्ञानाचा विचार न करितां जे कोणी

उपासनारूप कर्म करितात, ती त्यांची वृत्ति सात्त्विक, राजस किंवा तामस समजावयाची? असा अर्जुनाचा प्रश्न आहे. म्हणजे शास्त्रविधि व श्रद्धा या दोहोंमध्ये श्रेष्ठ कोणतें असा प्रश्नाचा अभिप्राय आहे.]

**श्रीभगवानुवाच**

**त्रिविधा भवति श्रद्धा देहिनां सा स्वभावजा।**
**सात्त्विकी राजसी चैव तामसी चेति तां शृणु ॥ २**

**देहिनाम् सा स्वभावजा श्रद्धा त्रिविधा भवति। सात्त्विकी, राजसी, एव च तामसी च इति, ताम् शृणु।**

श्रीभगवान् म्हणाले–मानवी प्राण्यांची ती स्वभावजन्य श्रद्धा तीन प्रकारची असते. सात्त्विक, राजस, आणि त्याचप्रमाणें तामसही असूं शकते. ती (मी सांगतों) ऐक.

[ अर्जुनानें विचारलेल्या शास्त्रविधिज्ञानविरहित स्वाभाविक श्रद्धेंत, सात्त्विक, राजस व तामस असे तिन्ही प्रकार असणें संभवनीय आहे. तें कसें, हें भगवान् पुढें सांगत आहेत. गीतेंत श्रद्धा हा शब्द पुष्कळ ठिकाणीं आला आहे. त्या सर्वांचा विचार केल्यास श्रद्धा म्हणजे आवड किंवा आदर असाच अर्थ गीताशास्त्रांत विवक्षित आहे. प्रस्तुत अध्याय तर श्रद्धेच्या विस्तृत विवेचनाकरितांच आहे. श्रद्धा म्हणजे आवड, हाच अर्थ पुढील विवेचनांत भगवंतास अभिप्रेत आहे.]

असे तीन प्रकार कां होतात, ह्याचें कारण सांगतात.

**सत्त्वानुरूपा सर्वस्य श्रद्धा भवति भारत।**
**श्रद्धामयोऽयं पुरुषो यो यच्छ्रद्धः स एव सः ॥ ३**

**भारत, सर्वस्य श्रद्धा सत्त्वानुरूपा भवति। अयम् पुरुषः श्रद्धामयः। यः यच्छ्रद्धः, सः एव सः।**

अर्जुना, सर्वांची श्रद्धा त्यांच्या त्यांच्या अंतःकरणास अनुरूप अशी असते. हा मनुष्यप्राणी श्रद्धामय आहे. (त्याच्या ठिकाणीं श्रद्धा नैसर्गिक असते). ज्याची जशी श्रद्धा असेल, तशाच प्रकारचा तो असतो.

[ त्रिगुणांच्या निरनिराळ्या कमीजास्ती मिश्रणानें प्राण्यांचा स्वभाव बनलेला असल्यामुळें त्या मिश्रणांतील प्रधान गुणाप्रमाणेंच त्याची श्रद्धा बनते. जीव श्रद्धे-

वर अवलंबून असतो, म्हणजे त्याचे पुष्कळ व्यापार नुसत्या श्रद्धेवर चाललेले असतात. ज्याची ज्या गुणाच्या प्राधान्यानें युक्त श्रद्धा असेल तो तशा प्रकारचा आहे असें समजावें. म्हणजे ज्याची श्रद्धा सत्त्वगुणप्रधान असते तो सात्त्विक, ज्याची रजोगुण-प्रधान असते तो राजस व ज्याची तमोगुणप्रधान असते तो तामस होय.]

ह्या तीन प्रकारच्या लोकांची उपासना कशी असते, तें सांगतात.

**यजंते सात्त्विका देवान्यक्षरक्षांसि राजसाः**
**प्रेतान्भूतगणांश्चान्ये यजंते तामसा जनाः ४**

**सात्त्विकाः देवान् यजंते, राजसाः यक्षरक्षांसि ( यजंते ), अन्ये तामसाः जनाः प्रेतान् भूतगणान् च यजंते ।**

सात्त्विक पुरुष देवांची उपासना करितात, राजस ( पुरुष ) यक्ष व राक्षस यांची उपासना करितात आणि तिसरे तामस लोक प्रेतें ( पिशाचें ) व भुतें यांची उपासना करितात.

[ मनुष्याचा जसा स्वभाव असेल तशाच प्रकारची त्याची श्रद्धा (आवड) सात्त्विक, राजस किंवा तामस ह्या तीन प्रकारच्या उपास्यांपैकीं स्वभावानुकूल उपास्याच्या ठिकाणीं दृढ होते.]

आसुरी ( तामसी ) उपासनेचें स्वरूप सांगतात—

**अशास्त्रविहितं घोरं तप्यंते ये तपो जनाः**
**दंभाहंकारसंयुक्ताः कामरागबलान्विताः ५**
**कर्षयंतः शरीरस्थं भूतग्राममचेतसः**
**मां चैवांतःशरीरस्थं तान्विद्ध्यासुरनिश्चयान् ६**

**दंभाहंकारसंयुक्ताः, कामरागबलान्विताः, शरीरस्थम् भूतग्रामम् अंतःशरीरस्थम् माम् च कर्षयंतः, अचेतसः ये जनाः अशास्त्रविहितम् घोरम् तपः तप्यंते, तान् आसुरनिश्चयान् विद्धि ।**

ढोंग व अहंकार यांनीं भरलेले, वासना व लोलुपता यांना उत्तेजक अशा सामर्थ्यानें युक्त असलेले, शरीरांतील इंद्रियांना आणि बुद्धीच्या ठिकाणीं वास करणाऱ्या मला ( परमात्म्याला म्हणजे पर्यायानें बुद्धीला ) क्षीण व दुर्बल करणारे, अतएव मूढ असलेले

लोक शास्त्रांत न सांगितलेलें किंवा शास्त्रनिषिद्ध घोर अनुष्ठान (जारण, मारण, उच्चाटणादि) आचरितात, ते आसुरी निश्चयाचे (निष्ठेचे) आहेत, असें समज.

[ दांभिकता, अभिमान, विषयवासना इत्यादि मनोविकारांनीं प्रेरित होऊन केलेली उपासना राजस होय व अशाच स्वार्थपर किंवा दुष्ट मनोविकारांच्या नादीं लागून केलेली, स्वतःच्या इंद्रियांस व बुद्धीस दौर्बल्य उत्पन्न करणारी घोर उपासना तामस होय. शास्त्रांनीं निषिद्ध मानिली असून, दुसऱ्याच्या नाशाकरितां किंवा स्वतःच्या इंद्रियतर्पणाकरितां जीं कर्में करण्यास मनुष्य प्रवृत्त होतो तीं स्वतःला दुःखदायक होणार हें माहीत असूनदेखील विकारवशतेमुळें तो असल्या घोर कर्मांसही प्रवृत्त होतो. अशा प्रकारचीं कर्में करणाऱ्या मनुष्यांच्या अंतःकरणांत एक प्रकारची श्रद्धा असते. पण त्या श्रद्धेमुळें त्याची उन्नति न होतां अधःपात मात्र होतो. म्हणून ही आसुरी (तामसी) श्रद्धा होय.]

ह्या तीन प्रकारच्या श्रद्धांचें विशेष स्पष्टीकरण करण्याकरितां म्हणतात:—

**आहारस्त्वपि सर्वस्य त्रिविधो भवति प्रियः**
**यज्ञस्तपस्तथा दानं तेषां भेदमिमं शृणु ७**

सर्वस्य प्रियः आहारः अपि तु त्रिविधः भवति। यज्ञः तपः तथा
दानम् (अपि त्रिविधम् भवति) तेषाम् इमम् भेदम् शृणु।

मनुष्यांना आवडणारे आहार देखील तीन प्रकारचे असतात. त्याचप्रमाणें यज्ञ, तप व दान यांचेही तीन प्रकार होतात. त्याचा हा (भेद) वेगळेपणा (मी सांगतों) ऐक.

[ आहारासारख्या केवळ दृश्य व्यावहारिक गोष्टी व उपासनेसारख्या पारमार्थिक गोष्टी यांतही कर्त्यांच्या स्वभावांतील प्रधान गुणास अनुसरून सात्त्विक, राजस व तामस असे तीन प्रकार होतात.]

**आयुःसत्त्वबलाऽऽरोग्यसुखप्रीतिविवर्धनाः**
**रस्याः स्निग्धाः स्थिरा हृद्या आहाराः सात्त्विकप्रियाः ८**

आयुःसत्त्वबलाऽऽरोग्यसुखप्रीतिविवर्धनाः, रस्याः, स्निग्धाः, स्थिराः
हृद्याः, आहाराः सात्त्विकप्रियाः।

आयुष्य, बुद्धि, शक्ति, आरोग्य, सुख व प्रीति वाढविणारे

असून रुचिकर, स्निग्ध, शरीरावर कायमचा हितकारक परिणाम करणारे, आल्हादजनक आहार सात्त्विक लोकांना प्रिय असतात.

**कट्वम्ललवणात्युष्णतीक्ष्णरूक्षविदाहिनः**
**आहारा राजसस्येष्टा दुःखशोकामयप्रदाः** ९

कट्वम्ललवणात्युष्णतीक्ष्णरूक्षविदाहिनः दुःखशोकामयप्रदाः आहाराः राजसस्य इष्टाः।

तिखट, आंबट, खारट, कडत, झणझणीत, नीरस व दाहकारक इत्यादि दुःख, शोक व रोग उत्पन्न करणारे आहार राजस स्वभावाच्या लोकांना आवडतात (प्रिय वाटणारे असतात).

**यातयामं गतरसं पूति पर्युषितं च यत्**
**उच्छिष्टमपि चामेध्यं भोजनं तामसप्रियम्** १०

यत् च यातयामम्, गतरसम्, पूति पर्युषितम्, उच्छिष्टम् अपि च अमेध्यम् भोजनम् (तत्) तामसप्रियम्।

जें शिळें, वाळलेलें, दुर्गंधयुक्त, नासलेलें आणि उष्टें (देखील) व अपवित्र भोजन (अन्न) तें तामसी स्वभावाच्या मनुष्यांस प्रिय असतें.

[ श्लोक ८।९।१० यांत जरी केवळ तीन प्रकारच्या आहारांचेंच वर्णन केलें आहे, तथापि तें इतर सर्व विषयसेवनांच्या उपलक्षणार्थ आहे असें मानण्यास हरकत नाहीं. यावरून प्रत्येकानें आपल्या स्वभावांतील श्रद्धेचें स्वरूप ओळखावें व तें तामस किंवा राजस असल्यास सात्त्विक करण्याचा प्रयत्न करावा, एवढाच हें सांगण्याचा उद्देश आहे.]

**अफलाकांक्षिभिर्यज्ञो विधिदृष्टो य इज्यते**
**यष्टव्यमेवेति मनः समाधाय स सात्त्विकः** ११

अफलाकांक्षिभिः यष्टव्यम् एव इति मनः समाधाय, यः विधिदृष्टः यज्ञः इज्यते, सः सात्त्विकः।

फलाची इच्छा नसणारे पुरुष उपासना करणें एवढेंच आपलें कर्तव्य आहे अशा बुद्धीनें अंतःकरण शांत ठेवून, जी यथाविधि

उपासना करितात, ती सात्त्विक उपासना होय. ( ही उपासना सात्विक स्वभावाच्या लोकांना प्रिय असते.)

[ सात्त्विक उपासना करणारे म्हणजे सात्त्विक श्रद्धावान् लोक जाणूनबुजून शास्त्रविधीची अवहेलना करीत नाहींत, तथापि श्रद्धा ही मुख्य असून तिचा आनुषंगिकपणाच शास्त्रविधीकडे येतो असें या श्लोकांत दर्शविलें आहे. यावरून शास्त्रविधीपेक्षां श्रद्धा श्रेष्ठ आहे असें अर्जुनाच्या प्रश्नाचें उत्तरदेखील येथें सूचित केलें आहे.]

**अभिसंधाय तु फलं दंभार्थमपि चैव यत्**
**इज्यते भरतश्रेष्ठ तं यज्ञं विद्धि राजसम्** १२

**भरतश्रेष्ठ तु फलम् अभिसंधाय, अपि च दंभार्थम् एव यत् इज्यते, तम् यज्ञम् राजसम् विद्धि ।**

अर्जुना, परंतु फलाची इच्छा ठेवून किंवा केवळ दंभाकरितां जी उपासना करितात ती उपासना राजस होय, असें जाण. (ही उपासना राजस स्वभावाच्या लोकांना प्रिय होते.)

**विधिहीनमसृष्टान्नं मंत्रहीनमदक्षिणम्**
**श्रद्धाविरहितं यज्ञं तामसं परिचक्षते** १३

**विधिहीनम्, असृष्टान्नम्, मंत्रहीनम्, अदक्षिणम्, श्रद्धाविरहितम् यज्ञम् तामसम् परिचक्षते ।**

(जी उपासना) शास्त्रविहित नसते, ज्यांत अन्नसंतर्पण नसतें, ज्यांत मंत्र ( ईशस्तुति नाहीं ), ज्यांत दक्षिणा (दानधर्म) नाहीं, व ज्यांत श्रद्धा (आवड) ही नाहीं, त्या उपासनेला तामस म्हणतात.

[ या श्लोकांत अर्जुनाच्या प्रश्नाचें उत्तर दिलें आहे. मनुष्य श्रद्धावान् असेल तर त्याच्या हातून शास्त्रविधीचा त्याग होणें अशक्य आहे. म्हणून श्रध्दाळू मनुष्य शक्य तितकें विधीचें पालन करूनच कर्म करील. शास्त्रविधीपेक्षां श्रद्धा श्रेष्ठ असली तरी तिला विधीची अपेक्षाच नाहीं असें समजणें बरोबर नाहीं.

उपासना निष्कामबुद्धीनें यथाविधि केली तरच ती सात्त्विक होते. तीच फलाच्या इच्छेनें केली तर राजस होते. आणि विधिहीन व श्रद्धाविरहित केली तर

तामस होते. राजस किंवा तामस उपासना न करतां सात्त्विक उपासनाच करीत राहण्याचा प्रत्येकानें प्रयत्न केला पाहिजे.]

आतां तपांतील कायिक, वाचिक, मानसिक भेद सांगतातः—

**देवद्विजगुरुप्राज्ञपूजनं शौचमार्जवम्**
**ब्रह्मचर्यमहिंसा च शारीरं तप उच्यते** १४

देवद्विजगुरुप्राज्ञपूजनम्, शौचम्, आर्जवम्, ब्रह्मचर्यम्, अहिंसा च शारीरम् तपः उच्यते।

देव, ब्राह्मण, गुरु व विद्वज्जन यांचा आदरसत्कार करणें, पवित्र असणें, सरळपणानें वागणें, इंद्रियनिग्रह करणें व दुसऱ्याला निष्कारण पीडा न देणें हें शारीरिक ( कायिक ) तप म्हणतात.

**अनुद्वेगकरं वाक्यं सत्यं प्रियहितं च यत्**
**स्वाध्यायाभ्यसनं चैव वाङ्मयं तप उच्यते** १५

यत् अनुद्वेगकरम्, सत्यम्, प्रियहितम् च वाक्यम्, एव च स्वाध्याया-भ्यसनम्, वाङ्मयम् तपः उच्यते।

जें कोणाला उद्वेग (खेद किंवा भीति) उत्पन्न न करणारें, खरें व मधुर आणि हितकारक (असेल असें) भाषण करणें, व त्याचप्रमाणें वेदशास्त्रांचा अभ्यास करणें (अर्थविचारपूर्वक अध्ययन करणें) यास वाङ्मय (वाचिक) तप असें म्हणतात.

**मनःप्रसादः सौम्यत्वं मौनमात्मविनिग्रहः**
**भावसंशुद्धिरित्येतत्तपो मानसमुच्यते** १६

मनःप्रसादः, सौम्यत्वम्, मौनम्, आत्मविनिग्रहः, भावसंशुद्धिः इति एतत् मानसम् तपः उच्यते।

अंतःकरण प्रसन्न ठेवणें, शांत वृत्ति, सुविचार-शीलता, मनोनिग्रह व बुद्धि शुद्ध ठेवणें (काम, क्रोध, लोभादि विकार उत्पन्न होऊं न देणें) हें मानस (मानसिक) तप होय असें म्हणतात.

ह्या कायिक, वाचिक, मानसिक तपांचे सात्त्विक, राजस व तामस असे तीन प्रकार सांगतातः—

**श्रद्धया परया तप्तं तपस्तत्त्रिविधं नरैः**
**अफलाकांक्षिभिर्युक्तैः सात्त्विकं परिचक्षते** १७

**अफलाकांक्षिभिः युक्तैः नरैः परया श्रद्धया तप्तम् तत् त्रिविधम् तपः सात्त्विकम् परिचक्षते।**

निष्काम बुद्धीच्या कर्मयोगी पुरुषांनीं अत्यंत श्रद्धापूर्वक आचरिलेलें जें (कायिक, वाचिक, मानसिक) तिन्ही प्रकारचें तप, त्याला सात्त्विक (तप) म्हणतात.

**सत्कारमानपूजार्थं तपो दंभेन चैव यत्**
**क्रियते तदिह प्रोक्तं राजसं चलमध्रुवम्** १८

**सत्कारमानपूजार्थम्, च दंभेन एव यत् तपः क्रियते, चलम् अध्रुवम् तत् इह राजसम् प्रोक्तम्।**

आपली कीर्ति व्हावी, किंवा आदरसत्कार व्हावा, किंवा आपल्याला लोकांनीं नजराणे द्यावे, अशा हेतूनें, आणि ढोंग माजविण्याच्या उद्देशानें जें तप केलें जातें, जें क्षणभंगुर व अनिश्चित (ज्याचें फल निश्चयानें मिळेल असा नियम नाहीं असें) याला येथें (शास्त्रांत) राजस असें म्हणतात.

**मूढग्राहेणात्मनो यत् पीडया क्रियते तपः**
**परस्योत्सादनार्थं वा तत्तामसमुदाहृतम्** १९

**मूढग्राहेण, आत्मनः पीडया परस्य उत्सादनार्थम् वा यत् तपः क्रियते, तत् तामसम् उदाहृतम्।**

गैरसमजुतीनें, स्वतःला पीडाकारक (मन व इंद्रियें दुर्बल करणारें) किंवा दुसऱ्याचा नाश करण्याकरितां जें तप केलें जातें, त्याला तामस तप म्हणतात.

[ कायिक, वाचिक व मानसिक तप ( नियमानें आचरण करणें ) सात्त्विक रीतीनें प्रत्येकानें आचरिलें पाहिजे. आपल्या हातून जें नियमित कर्म होतें, तें सात्त्विक आहे किंवा राजस आहे अथवा तामस आहे याचा विचार करून तें राजस किंवा तामस असेल, तर त्याला सात्त्विक स्वरूप देण्याचा प्रयत्न केला पाहिजे.]

आतां दानाचे सात्त्विक, राजस व तामस प्रकार सांगतातः—

**दातव्यमिति यद्दानं दीयतेऽनुपकारिणे**
**देशे काले च पात्रे च तद्दानं सात्त्विकं स्मृतम्** २०

दातव्यम् इति यत् दानम् अनुपकारिणे, देशे, काले च पात्रे च दीयते, तत् दानम् सात्त्विकम् स्मृतम्।

दान करणें हें आपलें कर्तव्य आहे, असें समजून, जें दान प्रत्युपकाराची अपेक्षा ज्याच्यापासून नाहीं अशा मनुष्यास, योग्य स्थलीं, योग्य. कालीं व पात्रापात्रविचारपूर्वक दिलें जातें, तें दान सात्त्विक मानिलें जातें.

**यत्तु प्रत्युपकारार्थं फलमुद्दिश्य वा पुनः**
**दीयते च परिक्लिष्टं तद्राजसमुदाहृतम्** २१

पुनः तु, प्रत्युपकारार्थम् वा फलम् उद्दिश्य यत् परिक्लिष्टम् दीयते, तत् राजसम् उदाहृतम्।

परंतु, आपल्याला प्रत्युपकार (मोबदला) प्राप्त व्हावा अशा हेतूनें किंवा स्वर्गादिफलांच्या उद्देशानें किंवा खिन्न अंतःकरणानें (आपलें द्रव्य खर्च होत आहे अशा तळमळीनें) जें दिलें जातें तें (दान) राजस होय असें सांगितलें आहे.

**अदेशकाले यद्दानमपात्रेभ्यश्च दीयते**
**असत्कृतमवज्ञातं तत्तामसमुदाहृतम्** २२

यत् दानम अदेशकाले, अपात्रेभ्यः च असत्कृतम् अवज्ञातम् दीयते, तत् तामसम् उदाहृतम्।

जें दान अयोग्य स्थलीं व अयोग्य कालीं आणि अयोग्य मनुष्यांना, सत्कार न करितां, अवहेलनापूर्वक देण्यांत येतें त्याला तामस (दान) म्हणतात.

[ काळवेळ न पाहतां किंवा पात्रापात्रविचार न करितां, भलत्या वेळीं वाटेल त्याला दान देत सुटणें हें स्वतःला श्रेयस्कर तर नाहींच, पण अत्यंत विघातक होतें. सर्पाला दूध पाजणें जसें वाईट, तसेंच धडधाकट पण निरुद्योगी, दुर्व्यसनी

व भोट् याचकांना दान देणें स्वहिताच्या दृष्टीनेंच नव्हे, पण एकंदर मानवी समाजाच्या हिताच्या दृष्टीनेंही वाईट आहे. गीताशास्त्रांतील देशकाल, पात्रा-पात्र-विचारपूर्वक दानधर्म करण्याची प्रवृत्ति जर समाजांत सुरू होईल, तर हल्लीं चोहोंकडे अंधश्रद्धेनें सुरू असलेल्या भिक्षा, सदावर्तें, अन्नसत्रें इत्यादि तामस दानधर्माला सात्त्विक वळण लागून, त्याचा समाजाच्या अभ्युदयास उपयोग झाल्यावांचून राहणार नाहीं. त्याचप्रमाणें प्रत्युपकाराच्या अपेक्षेनें किंवा फला-च्या इच्छेनें केलेला राजस दानधर्म क्षुद्रफलदायक असला तरी त्यापासून खरी उन्नति होत नाहीं. म्हणून जो दानधर्म करावयाचा, तो निष्काम बुद्धीनें, प्रत्युपकाराची अपेक्षा न ठेवितां, देश, काल, पात्र यांचा विचार करून कर्तव्य-बुद्धीनें केला पाहिजे ज्या ठिकाणीं ज्या वस्तूची आवश्यकता असेल, त्याच ठिकाणी त्या वस्तु देणें हा देशविचार होय. ज्या कालांत म्हणजे ऋतूंत ज्या वस्तूंचा उपयोग असतो, अशा वस्तु योग्य कालीं देणें हा कालविचार होय. ज्याला ज्या वस्तूची गरज आहे, आणि दिलेल्या वस्तूचा सदुपयोग होईल अशी खात्री असेल त्यालाच त्या वस्तु देणें हा पात्रविचार होय. त्याचप्रमाणें दान देण्याच्या वस्तु निषिद्ध असतां कामा नयेत. वस्तु या शब्दांत विद्या, कला, ज्ञान यांचाही समावेश होतो हें निराळें सांगावयास नको. असें सात्त्विक दान सात्त्विक स्वभावाच्या मनुष्यास प्रिय असतें. सारांश, दानधर्मास सात्त्विक स्वरूप देणें हें प्रत्येकाचें कर्तव्य आहे.]

आर्यधर्मांत कोणतेंही सत्कर्म ईशस्मरणपूर्वक करण्याची परंपरा अनादि आहे. त्याचप्रमाणें यज्ञ, तप, दान इत्यादि कर्मांचे प्रारंभींही नेहमीं ईशस्मरण करणें अवश्य आहे. असा परमेश्वरवाचक शब्द किंवा मंत्र कोणता हें सांगतातः—

**ॐ तत्सदिति निर्देशो ब्रह्मणस्त्रिविधः स्मृतः**
**ब्राह्मणास्तेन वेदाश्च यज्ञाश्च विहिताः पुरा** २३

**ॐ तत् सत् इति ब्रह्मणः त्रिविधः निर्देशः स्मृतः। तेन पुरा ब्राह्मणाः च वेदाः, च यज्ञाः विहिताः।**

'ॐ तत सत्' हा ब्रह्माचा तीन प्रकारचा निर्देश (वाचक शब्द किंवा मंत्र) होय. ह्या मंत्रानेंच पूर्वी (ईश्वरानें) ब्राह्मण, वेद व यज्ञ ( उपासक, ज्ञानविज्ञान व उपासना) केले आहेत.

[ ॐ तत् सत् हा ब्रह्मवाचक मंत्र अनादि कालापासून विद्यमान आहे व वेद, यज्ञ व त्यांचे प्रवर्तक ब्रह्मवेत्ते यांचा हा मूल-मंत्र आहे.]

**तस्मादोमित्युदाहृत्य यज्ञदानतपःक्रियाः**
**प्रवर्तंते विधानोक्ताः सततं ब्रह्मवादिनां** २४

**तस्मात् ब्रह्मवादिनाम् विधानोक्ताः यज्ञदानतपःक्रियाः सततम् ॐ इति उदाहृत्य प्रवर्तंते।**

म्हणून ब्रह्मज्ञानी पुरुषांची शास्त्रविहित यज्ञ-दान-तपादि कर्मे नेहमीं ॐ प्रणवोच्चारपूर्वकच सुरू होतात.

**तदित्यनभिसंधाय फलं यज्ञतपःक्रियाः**
**दानक्रियाश्च विविधाः क्रियंते मोक्षकांक्षिभिः** २५

**मोक्षकांक्षिभिः फलम् अनभिसंधाय यज्ञतपःक्रियाः च विविधाः दानक्रियाः, तत् इति (उदाहृत्य) क्रियंते।**

मोक्षाची इच्छा करणारे पुरुष फलाची इच्छा न ठेवतां यज्ञ, तप इत्यादि कर्मे व नाना प्रकारचीं दानधर्माचीं कामें 'तत्' अशा ब्रह्मनिर्देशपूर्वक करितात.

**सद्भावे साधुभावे च सदित्येतत्प्रयुज्यते**
**प्रशस्ते कर्मणि तथा सच्छब्दः पार्थ युज्यते** २६

**पार्थ, सद्भावे च साधुभावे सत् इति एतत् प्रयुज्यते। तथा प्रशस्ते कर्मणि सत् शब्द युज्यते।**

अर्जुना, विद्यमान असणें व चांगलें असणें या अर्थानें सत् ह्या शब्दाचा उपयोग करण्यांत येतो. त्याचप्रमाणें स्तुत्य कृत्यालाही सत् हा शब्द जोडण्यांत येत असतो. (म्हणजे त्यास सत्कर्म असें म्हणतात).

**यज्ञे तपसि दाने च स्थितिः सदिति चोच्यते**
**कर्म चैव तदर्थीयं सदित्येवाभिधीयते** २७

**यज्ञे तपसि दाने च स्थितिः सत् इति च उच्यते। च तदर्थीयम् कर्म एव सत् इति एव अभिधीयते।**

यज्ञ, तप व दान करीत राहणें ह्या स्थितीला सत् असें म्हणतात. आणि त्याकरितां (यज्ञ–दान–तपाकरितां) केलेल्या कर्मांसही सत् असेंच म्हणतात.

[ ॐ तत् सत् हीं पदें वेदांत ( उपनिषदांत ) निरनिराळ्या ठिकाणीं आलेलीं आहेत, व तीं तिन्हींही ब्रह्मवाचकेंच आहेत. ॐ ह्या पदांतील अ+उ+म् या तीन अवयवांवरून ब्रह्मा, विष्णु, महेश्वर किंवा स्थूल, सूक्ष्म, कारण-देहांच्या समष्टीचे अभिमानी, विराट, हिरण्यगर्भ व ईश्वर याचा बोध होतो असें अनेक ठिकाणीं वर्णन आहे. कोणत्याही धर्मकृत्याच्या शेवटीं त्यांतील वैगुण्यदोष नाहींसा करण्याकरितां 'ॐ तत् सत्' ह्या ब्रह्मनिर्देशक मंत्राचा उच्चार करण्याची वहिवाट आहे. परंतु गीताशास्त्रांत हा मंत्र प्रत्येक सत्कर्माच्या प्रारंभीं म्हणावयास सांगितलें आहे, हें २४ व्या श्लोकांतील " ॐ इति उदाहृत्य " ह्या पदांवरून उघड होत आहे.]

याप्रमाणें 'ॐ तत् सत्' ह्या ब्रह्मनिर्देशाचें विवरण झाल्यावर आतां असत् शब्दाचा अर्थ व परिणाम सांगतातः—

**अश्रद्धया हुतं दत्तं तपस्तप्तं कृतं च यत्**
**असदित्युच्यते पार्थ न च तत्प्रेत्य नो इह २८**

**पार्थ, यत् अश्रद्धया हुतम्, दत्तम्, तपः तप्तम्, च कृतम् तत् असत् इति उच्यते। तत् प्रेत्य न। इह नो च**

अर्जुना, जें श्रद्धाविरहित उपासना, दान, तपाचरण किंवा कर्म केलें जातें त्याला असत् (अविद्यमान किंवा वाईट) असें म्हणतात. तें मरणोत्तरही नाहीं व इहलोकींही नाहीं (त्यापासून इह-परलोकीं कल्याण होत नाहीं.)

[ उपासना, दानधर्म, तपश्चर्या इत्यादि कोणतेंही कर्म अंतःकरणांत श्रद्धा नसतांना केलें असतां त्यापासून इहलोकीं किंवा परलोकीं श्रेयस्कर फलप्राप्ति कधींच होणार नाहीं, म्हणून विहित कर्मांसदेखील श्रद्धा अवश्य आहे.]

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे श्रद्धात्रयविभागयोगो नाम सप्तदशोऽध्यायः।**

याप्रमाणें श्रीभगवंतांनीं गाइलेल्या उपनिषदांतील ब्रह्मविद्यांतर्गत कर्मयोग-शास्त्राविषयींच्या श्रीकृष्ण व अर्जुन यांच्या संवादांतील 'श्रद्धात्रयविभागप्रकरण' नांवाचा सतरावा अध्याय समाप्त झाला.

---

# सतराव्या अध्यायाचा उपसंहार

## सतराव्या अध्यायाची अनुक्रमणिका



कर्मयोगाच्या प्रारंभीं अवश्य असलेली श्रद्धा मनुष्याच्या त्रिगुणात्मक स्वभावास अनुसरून तीन प्रकारची असूं शकते. त्यांतील राजस व तामस ह्या दोन्ही प्रकारची श्रद्धा त्याज्य असून, सात्त्विक श्रद्धा मात्र कल्याणकारक अतएव ग्राह्य असते. शास्त्रविहित मार्गानें निष्काम उपासनेविषयींची श्रद्धा हीच सात्त्विक श्रद्धा होय. श्रद्धेचें हें सामान्य स्वरूप अर्जुनाच्या पहिल्या श्लोकांतील प्रश्नावरून भगवंतांनीं श्लोक २ ते ६ अखेर सांगितलें आहे. श्रद्धेप्रमाणेंच आहार, यज्ञ, तप व दान यांत स्वभावानुसार तीन भेद असतात असें ७ व्या श्लोकांत सांगून, पुढील तीन श्लोकांत (८।९।१०) कोणत्या स्वभावाच्या मनुष्यास कोणते आहार प्रिय असतात याचें विवेचन केलें आहे. त्यावरून असें उघड दिसतें कीं, सात्त्विक स्वभावाच्या मनुष्याचे, आहाराप्रमाणेंच इतर व्यवहारही सात्त्विक स्वरूपाचे असले पाहिजेत. त्यानंतर श्लोक ११।१२।१३ यांत सात्त्विक, राजस व तामस उपासनांचें स्वरूप वर्णिलें आहे. त्यांपैकीं सात्त्विक प्रकृतीच्या मनुष्याला सात्त्विक उपासनाच ग्राह्य होईल हें उघड आहे. या ११ व्या श्लोकांतच अर्जुनाच्या

प्रश्नाचें उत्तर आहे. यानंतर पुढील तीन श्लोकांत (१४।१५।१६) कायिक' वाचिक व मानसिक तपाचें स्वरूप सांगून श्लोक १७।१८।१९ यांत त्या तपांचे त्रिगुणानुसार तीन प्रकार सांगितले आहेत. शारीरिक तपांत नम्रता, पवित्रपणा, सभ्य वर्तन, इंद्रियनिग्रह व परपीडा न करणें हे मुख्य गुण सांगितले आहेत. त्याचप्रमाणें वाचिक तपामध्यें गोड, हितकारक व सत्य भाषण करणें आणि विद्याव्यासंग ठेवणें हे गुण सांगितले आहेत. अलौकिक चमत्कारांनीं भरलेल्या काल्पनिक किंवा शृंगारिक पुस्तकांचें वाचन मनोरंजक असलें तरी ज्ञानदायक नसल्यामुळें त्यांच्या नादीं लागून आयुष्याचा अपव्यय केल्यानें वाङ्मयतप होत नाहीं, हे लक्षांत आणून सध्यांचा तरुण वाचकवर्ग आपल्या वाचनाभिरुचीस योग्य वळण देईल तर त्याचें तें वाङ्मयतप होऊन त्याच्या ज्ञानाला पूर्णता येईल. अंतःकरणाची प्रसन्नता, शान्ति, मनोनिग्रह, मौन ( विचारशीलता ) व शुद्ध भावना हे मानसिक तपाचे गुण सांगितले आहेत. यांतील मौन हा गुण वाणीचा नसून मनाचा आहे हें ध्यानांत ठेवलें पाहिजे. कुविचार किंवा दुष्ट वासना मनांत येऊं न देतां ज्ञान विज्ञानाचें मनन करणें हेंच मौन होय. कित्येक साधु किंवा तपस्वी म्हणविणारे लोक व्यवहारांत जेथें स्पष्ट बोलणें अवश्य असतें तेथें देखील खुणा करून किंवा लिहून अगर 'हुं, ऊं, हूं' इत्यादि ध्वनींनीं आपलें मनोगत सांगत असतात. असल्या मौनांत ओठांची व जिभेची हालचाल बंद असली तरी मनाचा व्यापार एकसारखा सुरूच असतो, इतकेंच नव्हे; पण स्पष्ट बोलल्यानें आपला अभिप्राय दुसऱ्यास जसा सहज समजून देतां येतो, तसा या खुणांच्या उपायांनीं समजून देतां येत नसल्यामुळें, मनाला अधिकच चांचल्य उत्पन्न होण्याचा संभव असतो. असला तामसी शब्दप्रतिबंध हें गीताशास्त्रांत सांगितलेलें मौनरूप मानसिक तप नव्हे. तप हा एकेरी शब्द गीतेंत कोठेंही आला तरी त्यांत कायिक, वाचिक व मानसिक या तिन्ही तपांचा अंतर्भाव होतो असें मानण्यास हरकत नाहीं. नंतर श्लोक २०।२१।२२ यांत दानाचे तीन प्रकार सांगितले आहेत. योग्य ठिकाणीं, योग्य कालीं, योग्य मनुष्याला योग्य वस्तूचें दान निष्कामबुद्धीनें करणें हेंच सात्त्विक दान होय. अशा सात्त्विक दानानेंच दात्याचें व प्रतिग्रहीत्याचें कल्याण होतें असें सांगितलें आहे. दान निष्कामबुद्धीनें केलें असलें तरी त्याचा सदुपयोग होईल कीं दुरुपयोग होईल हें पाहण्याची जबाबदारी दात्यावरच आहे. तुलादानें, अन्नसत्रें, सदावर्तें इत्यादि मोठमोठ्या दानधर्मांचा सदुपयोग

होत आहे, कीं तेणेंकरून आळशी, निरुद्योगी, फुकटखाऊ लोकांसच उत्तेजन मिळत आहे इकडे लक्ष न देतां, त्या कामीं अंधश्रद्धेनें लाखों रुपये खर्च करण्यापेक्षां लोकशिक्षणसंस्था व लोकहितांचीं कामें ह्यांकडे त्या द्रव्याचा निष्कामबुद्धीनें सद्व्यय झाल्यास तें दान सात्त्विक, अर्थात् ऐहिक व पारमार्थिकदृष्टया श्रेयस्कर होईल, असा गीताशास्त्राचा अभिप्राय आहे. यानंतर २३ व्या श्लोकांत 'ॐ तत् सत्' हा ब्रह्मनिर्देश सर्व वेदांचा व विहित उपासनांचा मूलमंत्र आहे असें सांगून पुढें २४।२५।२६।२७ ह्या श्लोकांत त्याचें विवरण केलें आहे. हा मंत्र ब्रह्मवाचक असल्यामुळें प्रत्येक सत्कर्माच्या प्रारंभीं त्याचा उच्चार करण्याची अनादि पद्धति असून ती योग्य व अवश्य आहे असें सांगितलें आहे व शेवटीं २८ व्या श्लोकांत शास्त्रविहित कर्मांचेंच आचरण करणें अवश्य आहे, पण तीं कर्में श्रद्धाविरहित केलीं असतां तीं इहलोकीं व परलोकीं असत् म्हणजे निष्फळ होतात असें सांगून श्रद्धेचें महत्त्व सिद्ध केलें आहे.

शास्त्रविधि व श्रद्धा या दोहोंपैकीं अधिक श्रेष्ठ कोण, असा अर्जुनाचा प्रश्न आहे. त्यावरून श्रद्धेचें पूर्ण विवेचन करणें हाच या अध्यायाचा मुख्य उद्देश आहे

श्रद्धा हा शब्द 'धा' धातु व श्रत् हें अव्यय मिळून झालेला आहे. व त्याचा अर्थ विश्वास असा बहुतेक ठिकाणीं मानला जातो. शिवाय, तीव्र इच्छा, चिकाटी, आस्था, आदर अशा अर्थानेंही श्रद्धा या शब्दाचा उपयोग वाङ्मयांत केला जातो. परंतु श्रद्धा या शब्दाचा मुख्य रूढ अर्थ विश्वास असाच आहे. हा विश्वास म्हणजे कोणत्याही गोष्टीच्या कारणांचा, उपपत्तीचा किंवा सत्यासत्याचा फारसा विचार न करितां ठेवलेला विश्वास होय. श्रद्धा म्हणजे तत्त्वजिज्ञासेचा व विवेकबुद्धीचा अत्यंताभाव अशीच प्रायः कल्पना आहे. श्रद्धेचा आणि बुद्धीचा तमःप्रकाशवत् विरोध मानला जातो.

श्रद्धा ही गीताशास्त्रामध्यें अत्यंत महत्त्वाची गोष्ट असून तिचें वर्णन ठिकठिकाणीं आलेलें आहे. अ. ३, श्लोक ३१ या श्लोकावरून 'श्रद्धा व अनसूया' या दोन गोष्टींत कर्मयोगाचरणाचा मूळ पाया असून त्याशिवाय कर्मयोगाचरण शक्यच नाहीं असें सिद्ध होतें. जितकी कर्मयोगाला श्रद्धा अवश्य आहे तितकाच श्रद्धेचा अभाव कर्मयोगाला घातक आहे, असें भगवंतांनीं अनेक वेळां बजाविलें आहे. अर्जुन हा पूर्ण श्रद्धावान् होता हें भगवान् श्रीकृष्णास पूर्णपणें मान्य होतें असें गीतेवरूनच कोणालाही सिद्ध करितां येईल. श्रद्धा व चिकित्सक

बुद्धि या दोहोंमध्यें जर वर सांगितल्याप्रमाणें विरोधच असता, तर तीव्र जिज्ञासेनें व पराकाष्ठेच्या चिकित्सकपणानें केलेले अर्जुनाचे सडेतोड प्रश्न असंभवनीय ठरले असते. निदान पहिल्याच वेळीं तूं असली नसती चिकित्सा करूं नकोस, माझ्या सांगण्या-वर डोळे मिटून निमूटपणें विश्वास ठेव असें श्रीकृष्णानें त्याला सांगितलें असतें व दुसऱ्या अध्यायाच्या प्रारंभींच गीतेची समाप्ति झाली असती. अर्जुनाच्या चिकित्सक प्रश्नांनीं व तीव्र जिज्ञासेनें तो अश्रद्धावान् आहे असें तर श्रीकृष्णास वाटलें नाहींच; पण उलट त्याची जिज्ञासा व तीव्रबुद्धि पाहून आनंदानें त्याच्या सर्व संशयांचें भगवंतांनीं पूर्ण निरसन केलें आहे.

यावरून श्रद्धा व चिकित्सक बुद्धि किंवा जिज्ञासा यांमध्यें मुळींच विरोध नाहीं, किंबहुना तीं दोन्ही परस्परांस पोषकच आहेत असें ठरतें. वेदान्तशास्त्रास श्रद्धा पूर्ण संमत असून परमार्थामध्यें अव्वलपासून अखेरपर्यंत तिची आवश्यकताच असते. गीताशास्त्रामध्यें अंधविश्वास अशा अर्थानें श्रद्धा हा शब्द कोठेंही आलेला नाहीं, मग श्रद्धा या शब्दाचा गीतेंत अभिप्रेत अर्थ कोणता असा प्रश्न साहजिक उत्पन्न होतो. त्याचें उत्तर गीतेवरूनच काढणें अवश्य आहे. श्रद्धा हा एक मनोधर्म आहे असें प्रस्तुत अध्यायाच्या तिसऱ्या श्लोकांत सांगितलें आहे व तेथेंच "श्रद्धामयोऽयं पुरुषः" असें म्हटलें आहे. त्यावरून कोणाही मनुष्या-मध्यें श्रद्धेचा अजिबात अभाव असणें शक्य नाहीं. विश्वासाचें तसें नाहीं. एखादा मनुष्य कोणावरही विश्वास ठेवूं शकत नाहीं असें आढळून येईल, पण कोणत्याही गोष्टीविषयीं ज्याच्या मनांत श्रद्धा नाहीं, असा मनुष्य आढळणें शक्य नाहीं असें गीतेचें स्पष्ट मत आहे.

**'श्रद्धामयोऽयं पुरुषो यो यच्छ्रद्धः स एव सः'**

या वाक्यावरून आस्था, आवड किंवा प्रीति हा श्रद्धेचा अर्थ आहे असें ठरतें. विशेषतः श्रद्धा म्हणजे आस्था हाच अर्थ गीतेंत अभिप्रेत आहे.

**'न चाशुश्रूषवे वाच्यं न च मां योऽभ्यसूयति'**

या वाक्यांत असूयेच्या जोडीला अशुश्रूषा बसविली आहे. अशुश्रूषा म्हणजे ऐकण्याची इच्छा नसणें. ऐकणाऱ्या माणसाच्या मनांतील अश्रद्धेचा परिणाम अशुश्रूषेंत होतो असें यावरून अनुमान काढण्यास हरकत नाहीं. यावरून अश्रद्धा म्हणजे अनास्था व त्याच्या उलट श्रद्धा म्हणजे आस्था असा अर्थ होतो.

त्याचप्रमाणें मनाचा सरळपणा व आस्थेवाईकपणा यांची जोडी चांगली जुळते (अ० १८ श्लोक ७१ पहा).

याप्रमाणें श्रद्धा म्हणजे आस्था असा अर्थ ठरल्यानंतर तिचा चिकित्सकबुद्धीशीं मुळींच विरोध येत नाहीं; इतकेंच काय, पण ही दृढ श्रद्धा चिकित्सकबुद्धीला अनुकूलच असते आणि म्हणूनच अर्जुनानें कितीही चिकित्सक प्रश्न केले तरी भगवंताला त्याच्या श्रद्धेविषयीं मुळींच संशय आला नाहीं. इतकेंच नव्हे तर दहाव्या अध्यायाच्या प्रारंभीं त्याला 'प्रीयमाण' असें विशेषण देऊन अर्जुनाच्या चिकित्सकबुद्धीचें व जिज्ञासेचें भगवंतांनीं अभिनंदनच केलें आहे. तात्पर्य, श्रद्धा म्हणजे विश्वास नसून आस्था हाच सयुक्तिक अर्थ गीताशास्त्रांत भगवंताला अभिप्रेत आहे. या अर्थानेंच शास्त्रविधीपेक्षां सात्त्विक श्रद्धा श्रेष्ठ असून सात्त्विक श्रद्धावान् मनुष्य जाणूनबुजून शास्त्रविधीकडे दुर्लक्ष करीत नाहीं असें प्रस्तुत अध्यायांत भगवंतांनीं ठरविलें आहे, हें या अध्यायांतील ४।५।११।२८ या श्लोकांचा सूक्ष्म दृष्टीनें विचार केल्यास कोणासही दिसून येईल.

'गुरुवेदान्तवाक्येषु विश्वासः श्रद्धा'

असें वेदान्तसारांत म्हटलें आहे. इतर कांहीं वेदान्तग्रंथांनीं श्रद्धेचा हाच अर्थ गृहीत धरला आहे. वेदान्तशास्त्रांत फक्त आस्तिक्यबुद्धीपुरतीच विश्वास या अर्थाच्या श्रद्धेची अपेक्षा आहे (कठ. २।६।१३).

सारांश, शास्त्रविधीपेक्षां सात्त्विक श्रद्धा श्रेष्ठ असून, अशा श्रद्धावान् म्हणजे आस्थेवाईक मनुष्यानें आचरिलेलें कर्म ऐहिक व पारमार्थिकदृष्ट्या उन्नतिकारक होतें.



# अष्टादशोऽध्यायः ।

अर्जुनानें अध्याय २, श्लोक ५।६।७ यांत गुरुजनांचा वध करण्यापेक्षां भिक्षा मागणें अधिक चांगलें, म्हणजे कर्माचरणापेक्षां कर्मत्यागरूपी संन्यासच श्रेयस्कर असें ठरविलें होतें; परंतु भगवंतांनीं ह्या निश्चयाचा निषेध केल्यामुळें, संन्यास व कर्मयोग यांपैकीं खरोखर निश्चित श्रेयस्कर मार्ग कोणता, असा अर्जुनाचा मूळ प्रश्न होता. अर्जुनाच्या या शंकेचें समाधान करण्याकरितांच भगवंतांनीं त्याला गीताशास्त्र सांगितलें आहे. त्यावरून कर्मसंन्यासापेक्षां कर्मयोगच निश्चित श्रेयस्कर आहे अशी अर्जुनाची खात्री झाली. तथापि संन्यास व कर्मयोग ह्यांतील तत्त्वें जवळ जवळ सारखींच दिसतात, तर या दोहोंमध्यें बाह्यस्वरूपतःच भेद आहे कीं त्यांतील तत्त्वांतही कांहीं फरक आहे, असा प्रश्न साहजिक उत्पन्न होतो. धर्मशास्त्रांत सांगितलेला आश्रमसंन्यास म्हणजे चतुर्थाश्रम गीताशास्त्रास मान्य असला तरी तो अवश्य नाहीं. कारण, गीताप्रतिपादित कर्मयोगांत कर्माचा स्वरूपतः संन्यास म्हणजे त्याग करावयाचा नसून, ज्ञानपूर्वक निष्काम कर्म करून त्यांच्या फलांचा मात्र त्याग करावयाचा असतो व हा फलसंन्यास कोणत्याही आश्रमांत करितां येण्यासारखा आहे. त्याकरितां भगवीं वस्त्रें धारण करून व संसाराचा आणि समाजाचा त्याग करून सदोदित अरण्यांत एकान्तवास करण्याची गरज नाहीं. ज्ञान-विज्ञानपूर्वक भक्तियुक्त अंतःकरणानें सत्कर्माचरण करीत राहून बुद्धियोगाची पूर्णता संपादन करणें हेंच फलसंन्यासास अवश्य आहे. कर्मसंन्यासमार्गांत हेतुपुरःसर घडणारें प्रत्येक कर्म काम्य, अतएव बंधक असल्यामुळें मार्गांत त्याचा स्वरूपतःच त्याग केला पाहिजे असें मानण्यांत येतें. परंतु फलसंन्यासांत म्हणजे कर्मयोगमार्गांत कर्म स्वरूपतःच बंधक नसून त्यांच्या फलोपभोगाची वासना मात्र बंधक असल्यामुळें ह्या उपभोगवासनेचा पूर्ण त्याग करून शुद्ध बुद्धीनें नियत कर्म अवश्य केलें पाहिजे असें सिद्ध केलें आहे. हाच संन्यास व कर्मयोगमार्ग यांतील तात्त्विक भेद होय. तथापि मोक्षाचें अनन्यसाधन शुद्ध आत्मज्ञान हें दोन्ही मार्गांत अवश्य असल्यामुळें हे दोन्ही मार्ग सारखेच मोक्षदायक आहेत.

धर्मशास्त्रांत सांगितलेला चतुर्थाश्रम मोक्षप्राप्तीस व लोकसंग्रहास प्रसंगविशेषीं अधिक सोईचा होत असल्यास तो आश्रम स्वीकारण्यासही गीताशास्त्रांत कोठें हरकत दाखविलेली नाहीं. आश्रम कोणताही असला, तरी तो मोक्षप्राप्तीस व कर्मयोगास आड येत नाहीं हें गृहस्थाश्रमी राजा जनक, संन्यासी भगवान् शंकराचार्य व ब्रह्मचारी समर्थ रामदास यांच्या उदाहरणांवरून उघड सिद्ध होत आहे. ह्याप्रमाणें संन्यास व कर्मयोग ह्यांतील तात्त्विक भेद सांगून कर्मयोगाचें शुद्ध स्वरूप प्रतिपादन करून गीताशास्त्राचा उपसंहार करणें हा प्रस्तुत अध्यायांतील प्रतिपाद्य विषय आहे.

आतांपर्यंत भगवंतांनीं सांगितलेलें ज्ञानविज्ञान श्रवण केल्यावर, संन्यास व कर्मयोग ह्या दोन विषयांचा येथपर्यंतच्या गीताशास्त्रावरून निष्कर्षानें निर्णय काय ठरतो, हें पुनरपि सारांशरूपानें समजून घेण्याकरितां अर्जुन विचारतो—

**अर्जुन उवाच**

**संन्यासस्य महाबाहो तत्त्वमिच्छामि वेदितुम्**
**त्यागस्य च हृषीकेश पृथक्केशिनिषूदन १**

**महाबाहो, केशिनिषूदन, हृषीकेश, संन्यासस्य च त्यागस्य तत्त्वम् पृथक् वेदितुम् इच्छामि ।**

हे महापराक्रमी केशिनामक दैत्याचा नाश करणाऱ्या हृषीकेशा, संन्यास आणि त्याग (कर्मफलत्याग अर्थात् कर्मयोग) यांचें तत्त्व वेगवेगळें समजून घेण्याची माझी इच्छा आहे.

[ संन्यास व कर्मयोग या दोन्ही मार्गांत चित्तशुद्धि व आत्मज्ञान या मुख्य दोन गोष्टींची सारखीच आवश्यकता असते आणि संन्यास व त्याग या दोन्ही शब्दांचा धात्वर्थही एकच आहे. मग या दोन मार्गांत तात्त्विक भेद आहे कीं नाहीं व असेल तर तो कोणता, असा अर्जुनाचा प्रश्न आहे.]

**श्रीभगवानुवाच**

**काम्यानां कर्मणां न्यासं संन्यासं कवयो विदुः**
**सर्वकर्मफलत्यागं प्राहुस्त्यागं विचक्षणाः २**

**कवयः काम्यानाम् कर्मणाम् न्यासम् संन्यासम् विदुः। विचक्षणाः सर्वकर्मफलत्यागम् त्यागम् प्राहुः।**

ज्ञानी पुरुष काम्य असणाऱ्या कर्मांच्या ( कर्में तेथून सर्वच काम्य असतात अशा समजुतीनें केलेल्या ) त्यागास संन्यास असें म्हणतात. व विवेकी पुरुष ( आचरित असलेल्या ) सर्व कर्मांच्या फलांच्या त्यागास त्याग असें म्हणतात.

[ या श्लोकाच्या पूर्वार्धांत संन्यासमार्गाचें तत्त्व सांगितलें आहे व उत्तरार्धांत कर्मयोगमार्गाचें तत्त्व सांगितलें आहे. संन्यासमार्गी पुरुष, इच्छा किंवा हेतु स्वार्थपर असो किंवा नसो, त्याला 'काम' असे म्हणतात. हेतुपुरःसर होणारें प्रत्येक कर्म त्यांच्या दृष्टीनें काम्य म्हणजे सकामच ठरतें. अर्थात् काम्यकर्मांचा त्याग म्हणजे हेतुपुरःसर घडणाऱ्या प्रत्येक कर्माचा त्याग, असा संन्यास-मार्गाच्या दृष्टीनें अर्थ होतो. म्हणून हेतुपुरःसर होणाऱ्या सर्व कर्मांचा स्वरूपतः त्याग करणें हाच संन्यास होय, असें पहिल्या चरणांत सांगितलें आहे. कर्मयोगी पुरुष केवळ इच्छा म्हणजे काम असें न समजतां, उपभोगाविषयींच्या इच्छेलाच "काम" असें म्हणतात. काम म्हणजे उपभोगेच्छा हीच बंधनास कारण आहे, स्वरूपतः कर्म बंधक नाहीं. म्हणून शुद्ध हेतूनें म्हणजे निष्काम बुद्धीनें प्राप्त कर्मांचें आचरण करून, त्या कर्मांच्या फलांचा म्हणजे उपभोगवासनेचा त्याग करणें, हाच त्याग होय, असें दुसऱ्या चरणांत सांगितलें आहे. संन्यासमार्गांत कर्म तत्त्वतः निष्काम होणें शक्यच नाहीं असें मानण्यांत येतें, परंतु कर्मयोग मार्गांत स्वतःच्या उपभोगार्थ घडणारें कर्म सकाम, व शुद्धबुद्धीनें लोकहितार्थ किंवा जगाच्या धारण पोषणार्थ म्हणजे भगवदुपासनार्थ घडणारीं कर्में हीं निष्काम होत, असें मानण्यांत येतें. यावरून स्वरूपतः कर्मांचाच त्याग म्हणजे संन्यास व कर्तव्यबुद्धीनें कर्माचरण करून त्यांच्या फलांचा त्याग, अर्थात् कर्मयोग, म्हणजे त्याग होय असें सिद्ध होतें.]

त्याच दोन व्याख्यांचें पुन्हा स्पष्टीकरण करितात.

**त्याज्यं दोषवदित्येके कर्म प्राहुर्मनीषिणः**
**यज्ञदानतपःकर्म न त्याज्यमिति चापरे ३**

**एके मनीषिणः कर्म दोषवत् इति त्याज्यम् प्राहुः। अपरे यज्ञदानतपः-कर्म न त्याज्यम् इति ( प्राहुः )।**

एक ( पाहिल्या प्रकारचे ) ज्ञानी अर्थात् संन्यासी कर्म तें ( स्वरूपतःच ) दोषवत् म्हणजे बंधक असतें, म्हणून त्याज्य होय असें म्हणतात. दुसरे ज्ञानी ( अर्थात् कर्मयोगी) यज्ञ, दान व तप या कर्मांचा स्वरूपतः त्याग करणें योग्य नाहीं, असें म्हणतात.

[ कर्म हें स्वरूपतःच बंधक असल्यामुळें, त्याचा त्याग केल्यावांचून म्हणजे कर्मसंन्यास केल्यावांचून मोक्ष प्राप्त होत नाहीं असें संन्यासमार्गी म्हणतात. परंतु कर्म हें स्वरूपतःच बंधक नसून मोक्षाला उपकारक व लोकसंग्रहास आवश्यक असल्यामुळें यज्ञ, दान, तप इत्यादि निष्काम कर्मांचा त्याग करणें योग्य नाहीं, फलाभिसंधीचा त्याग केला म्हणजे कर्माचें बंधकत्व नष्ट होतें, असें कर्मयोगी म्हणतात.]

ह्याप्रमाणें त्यागाविषयीं निरनिराळीं मतें असल्यामुळें भगवान् त्याविषयीं स्वतःचें निश्चित मत सांगतात—

**निश्चयं शृणु मे तत्र त्यागे भरतसत्तम**
**त्यागो हि पुरुषव्याघ्र त्रिविधः संप्रकीर्तितः ४**

**भरतसत्तम, तत्र त्यागे मे निश्चयम् शृणु। पुरुषव्याघ्र, त्यागः हि त्रिविधः संप्रकीर्तितः।**

हे भरतश्रेष्ठा (अर्जुना), त्यापैकीं त्यागाविषयीं माझा निश्चय (निश्चित मत) ऐक. हे पुरुषश्रेष्ठा, त्यागदेखील तीन प्रकारचा सांगितलेला आहे.

[ ह्या श्लोकाच्या दोन चरणांत निरनिराळीं वाक्यें आहेत संन्यास व कर्मफलत्याग म्हणजे कर्मयोग यांपैकीं गीताशास्त्राचा प्रतिपाद्य विषय जो कर्मयोग म्हणजे कर्मफलत्याग त्याविषयीं स्वतःचा निर्णय आपण सांगणार आहों, अशी पहिल्या वाक्यांत भगवंतांनीं प्रस्तावना केली आहे. व दुसऱ्या वाक्यांत यज्ञ, दान, तपादिकांप्रमाणेंच त्यागांतही सात्त्विक, राजस व तामस असे तीन भेद होतात, असें सांगितलें आहे.]

प्रथम वरील श्लोकांतील पहिल्या वाक्यांत उल्लेखिलेला आपला निर्णय भगवान् सांगतात—

**यज्ञदानतपःकर्म न त्याज्यं कार्यमेव तत्**
**यज्ञो दानं तपश्चैव पावनानि मनीषिणाम् ५**

**यज्ञदानतपःकर्म न त्याज्यम्, तत् कार्यम् एव। मनीषिणाम् यज्ञः दानम् तपः च एव पावनानि (भवंति)।**

भगवदुपासना, दानधर्म व तपाचरण या स्वरूपाचें जें कर्म असतें तें केलेंच पाहिजे; त्याचा त्याग करणें योग्य नाहीं. (कारण) ज्ञानी पुरुषांची यज्ञ, दान, तप इत्यादि कर्मेंच (जगताला) पवित्र करणारीं होतात.

[ सात्त्विक ईश्वरोपासना, सात्त्विक दानधर्म व सात्त्विक स्वरूपाची कायिक, वाचिक व मानसिक तपश्चर्या हीं कर्मे ज्ञानी पुरुषांनीं देखील अवश्य केलीं पाहिजेत. तीं सोडिलीं असतां जगताचा उच्छेद होईल व अज्ञानी लोकांचा बुद्धिभेद होईल. म्हणून ज्ञान्यांचीं हीं कर्मे जगताला शुद्धिकारक म्हणजे सन्मार्गदर्शक असतात. कारण ज्ञानी पुरुषाला चित्तशुद्धि होऊन साक्षात्कार झालेला असल्यामुळें, ह्या मनीषि पुरुषांना वरील कर्मांनीं स्वतःच्या शुद्धीकरणाची आवश्यकता उरलेली नसते. अर्थात् तीं कर्मे जगतालाच पावन म्हणजे सन्मार्गदर्शक होतात हें उघड आहे.]

**एतान्यपि तु कर्माणि संगं त्यक्त्वा फलानि च**
**कर्तव्यानीति मे पार्थ निश्चितं मतमुत्तमम्** ६

**पार्थ, अपि तु एतानि कर्माणि संगम् च फलानि त्यक्त्वा कर्तव्यानि इति मे निश्चितम् उत्तमम् मतम्।**

अर्जुना, परंतु (साधकांनीं) हींच कर्मे कर्तृत्वाभिमान व फलेच्छा सोडून केलीं पाहिजेत, असें माझें निःसंशय व निर्दोष मत (आहे).

[ ज्ञानी पुरुषांना ज्याप्रमाणें लोकसंग्रहाच्या दृष्टीनें यज्ञ, दान, तपादि कर्मे आवश्यक असतात, त्याचप्रमाणें साधकांना देखील आत्मकल्याणाकरितां तींच कर्मे निष्काम व निरभिमान बुद्धीनें करणें अवश्य आहे. सारांश, हेतु भिन्न असले तरी साधकावस्थेंत व सिद्धावस्थेंतही यज्ञादि कर्मांचा त्याग करणें योग्य नाहीं. इतकेंच नव्हे तर तीं अवश्य केलीं पाहिजेत, असें वरील दोन श्लोकांत भगवंतांनीं आपलें निःसंशय व निर्विवाद मत स्पष्ट सांगितलें आहे.

येथपर्यंत पूर्वीं आलेल्या कर्मांच्या सामान्य मीमांसेचा उपसंहार करून भगवंतांनीं आपलें मत सांगून सिद्धांत पुरा केला आहे.]

आतां चवथ्या श्लोकांतील दुसऱ्या चरणांत केलेल्या उल्लेखाप्रमाणें त्यागाचे तीन प्रकार सांगतात—

**नियतस्य तु संन्यासः कर्मणो नोपपद्यते**
**मोहात्तस्य परित्यागस्तामसः परिकीर्तितः** ७

**कर्मणः नियतस्य (सतः) संन्यासः न उपपद्यते। तु तस्य मोहात् परित्यागः तामसः परिकीर्तितः।**

कर्में नियत म्हणजे शुद्धबुद्धिनियमित घडत असतां त्यांचा त्याग करणें सयुक्तिक नाहीं. परंतु (कर्में याप्रमाणें शुद्धबुद्धिनियत करण्याचें सोडून) त्या कर्मांचा अज्ञानानें केलेला त्याग तामस होय असें म्हटलें आहे.

[ शुद्ध बुद्धीच्या योग्य नियमनांत असणाऱ्या अंतःकरणासह सर्व इंद्रियांकडून होणाऱ्या कर्मांचें बंधकत्व नष्ट होत असल्यामुळें, तीं मोक्षाला प्रतिबंधक न होतां ज्ञानपरिपाकास उपकारकच होतात. (अ. ५, श्लोक ६ व अ. ३, श्लोक ७). म्हणून त्या कर्मांचा स्वरूपतः त्याग करणें योग्य नाहीं. असें असतां, कर्म शुद्ध–बुद्धिनियत करण्याचे ऐवजीं अज्ञानानें त्यांचा स्वरूपतः त्याग करणें हें तामस अतएव त्याज्य होय.]

**दुःखमित्येव यत्कर्म कायक्लेशभयात्त्यजेत्**
**स कृत्वा राजसं त्यागं नैव त्यागफलं लभेत्** ८

**यत् कायक्लेशभयात् दुःखम् इति कर्म एव त्यजेत्, सः राजसम् त्यागम् कृत्वा त्यागफलम् न एव लभेत्।**

जें (कर्म) शारीरिक कष्टांच्या भीतीमुळें दुःखदायक (वाटतें), म्हणून कर्मांचाच (जो) त्याग करितो, त्याला असा राजस त्याग केल्यानें, (सात्त्विक) त्यागाचें फल (मोक्ष) कधींही मिळावयाचें नाहीं. (येथील 'त्यागफलं' या शब्दाचा अर्थ अ. ९, श्लोक १२ व अ. १२ श्लोक १२त आला आहे.)

[ कायिक म्हणजे शारीरिक या शब्दांत कायिक, वाचिक व मानसिक या तिन्ही प्रकारच्या कष्टांचा अंतर्भाव करितां येईल. एकंदरींत आपल्याला कष्ट सोसावे लागतील या भीतीनें प्राप्त कर्मांचा त्याग करणें, हा राजस अतएव गौण त्याग होय. असल्या त्यागानें मोक्षप्राप्ति होणें शक्य नाहीं.]

**कार्यमित्येव यत्कर्म नियतं क्रियतेऽर्जुन**
**संगं त्यक्त्वा फलं चैव स त्यागः सात्त्विको मतः ९**

**अर्जुन, संगम् फलम् एव च त्यक्त्वा कार्यम् इति यत् कर्म नियतम् क्रियते, सः त्यागः सात्त्विकः मतः ।**

अर्जुना, कर्तृत्वाभिमान व फलाभिसंधि यांचा मात्र त्याग करून, (अवश्य) कर्तव्य म्हणून, जें कर्म नियत म्हणजे शुद्धबुद्धिनियंत्रित केलें जातें असा त्याग सात्त्विक मानिला जातो.

[ स्वभावास अनुसरून प्राप्त असलेलें कोणतेंही कर्म, स्वतःच्या सुखदुःखाकडे लक्ष न देतां, कर्तव्य म्हणून शुद्धबुद्धीनें करीत राहून कर्तृत्वाचा अभिमान व फलोपभोगाची इच्छा सर्वथैव सोडणें, हाच सात्त्विक त्याग होय. म्हणजे हा (संगाचा व फलाचा) त्यागच अवश्य केलाच पाहिजे, स्वरूपतः कर्मत्याग करणें व्यर्थ होय, असें उघड दिसून येतें. श्लोक ७ व ९ यांत आलेला नियत शब्द अध्याय ३ श्लोक ८ मध्यें आलेल्या नियत शब्दाचा समानार्थक आहे.]

ह्या तीन त्यागांपैकीं सात्त्विक त्याग करणाऱ्याचें महत्त्व सांगतात.

**न द्वेष्ट्यकुशलं कर्म कुशले नानुषज्जते**
**त्यागी सत्त्वसमाविष्टो मेधावी छिन्नसंशयः १०**

**छिन्नसंशयः मेधावी सत्त्वसमाविष्टः त्यागी अकुशलम् कर्म न द्वेष्टि, कुशले न अनुषज्जते ।**

(ज्ञानाच्या योगानें) ज्याचा सर्व संशय नष्ट झाला आहे असा बुद्धिमान् (स्थितप्रज्ञ) नित्यसत्त्वस्थ त्यागी (कर्मफलांचा त्याग करणारा) पुरुष वाईट दिसणाऱ्या कर्मांचा द्वेष (तिरस्कार) करीत नाहीं व चांगल्या दिसणाऱ्या कर्मांमध्यें आसक्त होत नाहीं.

[ आत्मज्ञानी, निस्त्रैगुण्य, नित्यसत्त्वस्थ व निर्योगक्षेम कर्मयोगी पुरुष निर्द्वंद्व असतो. म्हणजे तो स्वतःचें कर्म दिसण्यांत वाईट किंवा हीन म्हणून सोडीत नाहीं व दुसऱ्याचें कर्म चांगलें किंवा श्रेष्ठ म्हणून, तें करण्याची हांव धरीत नाहीं.]

कर्मांचा इतका खटाटोप करण्यापेक्षां अजिबात कर्मच सोडून देणें बरें असें मानणें बरोबर नाहीं. कारण,—

**न हि देहभृता शक्यं त्यक्तुं कर्माण्यशेषतः**
**यस्तु कर्मफलत्यागी स त्यागीत्यभिधीयते ११**

हि, देहभृता कर्माणि अशेषतः त्य‍ुम् न शक्यम्, तु यः कर्मफल-त्यागी, सः त्यागी इति अभिधीयते।

कारण, देहधारी आपणाला कर्मांचा पूर्णपणें त्याग करितां येणें शक्य नाहीं. परंतु जो कर्मांच्या फलाचा त्याग करितो (फलभोगाची वासना सोडतो) त्यालाच त्यागी असें म्हणतात.

[ अध्याय ३, श्लोक ५ यांतील नियमच पुन्हा या श्लोकाच्या पूर्वार्धात सांगितला आहे. सर्व सृष्टि कर्ममय असल्यामुळे, कर्म हाच सृष्टीचा धर्म आहे. अर्थात् कोणताही सृष्ट पदार्थ कर्मावांचून क्षणभरही असूं शकणार नाहीं. ह्या कर्मांपैकीं कांहीं सहज होत असतात व कांहीं हेतुपुरःसर होत असतात. त्यांतील हेतुपुरःसर कर्मांचा तेवढा त्याग केला तरी, स्वाभाविक कर्मे सुटत नसल्यामुळे, तो सर्वकर्मसंन्यास होत नाहीं. कर्म हें स्वरूपतः बंधक नसून, त्याविषयींची अहंता व फलासक्तिच मोक्षाला प्रतिबंधक असते, म्हणून मुख्यतः फलासक्तीचाच त्याग अवश्य आहे कर्मांचा नाहीं. यास्तव जो फलासक्तीचा त्याग करितो, तोच खरा त्यागी म्हणजे संन्यासी होय.]

फलत्याग न करणाराला कर्मे कशीं बंधक होतात तें सांगतात.—

**अनिष्टमिष्टं मिश्रं च त्रिविधं कर्मणः फलम्**
**भवत्यत्यागिनां प्रेत्य न तु संन्यासिनां क्वचित् १२**

अत्यागिनाम् कर्मणः अनिष्टम् इष्टम् मिश्रम् च त्रिविधम् फलम् प्रेत्य (अपि) भवति। संन्यासिनाम् तु क्वचित् न भवति।

फलासक्तीचा त्याग न करणाऱ्या पुरुषांना त्यांच्या कर्माचें अनिष्ट, इष्ट व मिश्र (कांहीं इष्ट व कांहीं अनिष्ट) असें तीन प्रकारचें फळ मरणोत्तरही प्राप्त होतें; परंतु फलसंन्यासी म्हणजे त्यागी पुरुषांना कोठें-ही (मरणोत्तरही) असें त्रिविध फल भोगावें लागत नाहीं.

[ या श्लोकांतील " अत्यागी " शब्दाचा प्रतियोगी म्हणून " संन्यासी " हा शब्द आलेला आहे. त्या अर्थी त्याचा अर्थ त्यागी असाच करणें जरूर आहे. ४ थ्या श्लोकापासून येथपर्यंत सर्व प्रकरण, फलत्याग व फलत्यागी ह्यांच्याच

वर्णनाचें असल्यामुळें येथें "संन्यासी" म्हणजे स्वरूपतः कर्मत्याग करणारा असा अर्थ होणें शक्य नाहीं.]

आतां प्रत्येक कर्मास अवश्य असलेलीं पांच कारणें सांगतात—

**पंचैतानि महाबाहो कारणानि निबोध मे**
**सांख्ये कृतांते प्रोक्तानि सिद्धये सर्वकर्मणाम्** १३

**महाबाहो, कृतान्ते सांख्ये प्रोक्तानि एतानि पंच कारणानि सर्वकर्मणाम् सिद्धये (भवंति) (तानि) मे निबोध।**

अर्जुना, ज्यांत अंत म्हणजे अखेरचा निर्णय केला आहे, अशा सांख्य म्हणजे वेदान्तशास्त्रांत सांगितलेलीं हीं पांच कारणें. सर्व कर्में घडण्याला (कारण) होतात, तीं माझ्यापासून (मी सांगतों तीं) समजून घे.

[ सृष्टीचें मूळ कारण प्रकृति व पुरुष हीं दोन तत्त्वें अनादि, अविनाशी व स्वतंत्र आहेत असें कापिल सांख्य शास्त्राचें मत आहे. परंतु वेदान्त शास्त्रांत, प्रकृति व पुरुष ह्या दोहोंना उत्पादक असून त्यांच्या पलीकडचें पुरुषोत्तमस्वरूप, एकच ब्रह्मतत्त्व आहे, असें सिद्ध केलें आहे. प्रस्तुत श्लोकांत 'सांख्य' शब्दानें कापिल-सांख्य विवक्षित नसून अद्वैतवेदान्त विवक्षित आहे, हें कृतान्त ह्या विशेषणावरून उघड आहे. अंत हा शब्द 'शेवटचा निर्णय', ह्या अर्थी अ. २, श्लोक १६ यांतही पूर्वी आलेला आहे व सांख्य हा शब्द ज्ञाननिष्ठा ह्या अर्थी गीतेंत पूर्वी अनेक ठिकाणीं आला असून येथेंही त्याचा अर्थ ज्ञान म्हणजे वेदान्तशास्त्र असाच आहे.]

**अधिष्ठानं तथा कर्ता करणं च पृथग्विधम्**
**विविधाश्च पृथक्चेष्टा दैवं चैवात्र पंचमम्** १४

**अधिष्ठानम्, तथा कर्ता, च पृथग्विधम् करणम्, च पृथक् विविधाः चेष्टाः, च अत्र दैवम् एव पंचमम् (अस्ति)।**

अधिष्ठान (कर्मास आधारभूत शरीर), त्याचप्रमाणें कर्ता (बुद्धीचे ठिकाणीं असणारा जीवात्मा) आणि निरनिराळ्या जातींचीं इंद्रियें (कर्मेंद्रियें, ज्ञानेंद्रियें व अंतःकरण), त्यांच्या निरनिराळ्या प्रकारच्या हालचाली आणि ह्यांतच (ह्या दृष्ट कारणांतच दैव म्हणजे इंद्रियांना सामर्थ्य देणाऱ्या देवतांचा समूह) हें पांचवें (कारण). असतें.

[ शरीरावांचून कोणतेंही कर्म घडणें शक्य नसल्यामुळें तेंच सर्व कर्मांस आधार होय. त्याचप्रमाणें प्रत्येक कर्मास, सात्त्विक, राजस, किंवा तामस बुद्धीच्या उपाधीनें युक्त असलेला चैतन्यांश म्हणजे जीवात्मा हा कर्ता असतो. कारण जीवात्म्याच्या अस्तित्वावांचून शरीर व इंद्रियें यांजकडून कोणतेंही कार्य घडणें शक्य नसतें. इंद्रियें हीं प्रत्येक कर्माचीं प्रत्यक्ष साधनेंच असतात. त्यांचें चलन-वलन झालें म्हणजेच कर्म उत्पन्न होतें आणि ह्याप्रमाणें इंद्रियांचें चलनवलन होण्यास त्यांचे ठिकाणीं असणाऱ्या सूक्ष्म शक्ति ह्यांसच दैव ( देवतासमूह ) म्हटलें आहे ]

**शरीरवाङ्मनोभिर्यत्कर्म प्रारभते नरः**
**न्याय्यं वा विपरीतं वा पंचैते तस्य हेतवः** १५

**नरः शरीरवाङ्मनोभिः न्याय्यम् वा विपरीतम् वा यत् कर्म प्रारभते तस्य एते पंच हेतवः (संति)।**

मनुष्यप्राणी शरीरानें (कायिक), वाणीनें (वाचिक) व मनानें (मानसिक), न्याय्य (योग्य) किंवा त्याविरुद्ध (अयोग्य) जें कर्म आरंभितो (करितो) त्याला (त्या प्रत्येक कर्माला) हीं (वरील श्लोकांत सांगितलेलीं) पांच कारणें असतात.

[ कोणतेंही कर्म घडून येण्यास या पांचही कारणांची आवश्यकता लागते. ह्यावरून कर्माचें कर्तृत्व ह्यांपैकीं एकाकडे नसून या पांचही कारणांच्या समूहा-कडे असतें.]

**तत्रैवं सति कर्तारमात्मानं केवलं तु यः**
**पश्यत्यकृतबुद्धित्वान्न स पश्यति दुर्मतिः** १६

**एवम् सति, यः तु अकृतबुद्धित्वात् तत्र केवलम् आत्मानम् कर्तारम् पश्यति, सः दुर्मतिः न पश्यति।**

असें असतां, जो कोणी, बुद्धीला ज्ञानसंस्कार झालेला नसल्या-मुळें तेथें (त्या कर्माविषयीं) फक्त आत्म्यालाच (शुद्ध चैतन्यालाच) कर्ता मानितो त्या मूर्खाला कांहीं कळत नाहीं.

[ कर्माचीं जीं पांच कारणें वर सांगितलेलीं आहेत, त्यांत त्रिगुणात्मक बुद्धीच्या उपाधीनें युक्त असलेला जीवात्मा हा कर्ता आहे असें सांगितलें आहे. तथापि

तें कर्तृत्व शुद्ध चैतन्याचें नसून, चैतन्यविशिष्ट बुद्धीचें असल्यामुळें, शुद्ध आत्मतत्त्वाकडे त्या कर्माचा संबंध येत नाहीं.]

**यस्य नाऽहंकृतो भावो बुद्धिर्यस्य न लिप्यते**
**हत्वापि स इमाँल्लोकान्न हंति न निबध्यते** १७

**यस्य भावः अहंकृतः न, यस्य बुद्धिः न लिप्यते, सः इमान् लोकान् हत्वा अपि न हंति, न निबध्यते।**

ज्याचें अंतःकरण अहंकारयुक्त नसतें, व ज्याची बुद्धि (विषयवासनांनीं) मलिन झालेली नसते, तो ह्या लोकांत मारल्यामुळें देखील मारीत नाहीं (मारण्याच्या क्रियेचा कर्ता होत नाहीं) म्हणून, (त्या कर्मानें) तो बद्धही होत नाहीं.

[ अहंकार व फलासक्ति हीं कर्माचे ठिकाणीं बंधकत्व उत्पन्न करण्यास कारणें असतात. परंतु आत्मज्ञानाच्या योगानें ज्याचा अहंकार व फलासक्ति पूर्णपणें नष्ट झालेली असते, त्यानें कोणतेंही कर्म केलें तरी, तें त्याला बाधक होत नाहीं. श्लोक ४ पासून येथपर्यंत केलेलें विवेचन हें भगवंताला अभिप्रेत असलेल्या कर्मयोगाच्या स्वरूपाचा उपसंहार आहे.]

चवदाव्या श्लोकांत कर्माचीं कारणें सांगितलीं, त्याप्रमाणें कर्म करण्याची प्रवृत्ति उत्पन्न होण्यास कारणें कोणतीं तें सांगतात--

**ज्ञानं ज्ञेयं परिज्ञाता त्रिविधा कर्मचोदना**
**करणं कर्म कर्तेति त्रिविधः कर्मसंग्रहः** १८

**ज्ञानम्, ज्ञेयम्, परिज्ञाता (इति) त्रिविधा कर्मचोदना। करणम् कर्म कर्ता इति त्रिविधः कर्मसंग्रहः।**

ज्ञान म्हणजे संवेदना (जाणणें), ज्ञेय म्हणजे जाणण्याचा विषय व परिज्ञाता म्हणजे जाणणारा ह्या तिन्हींचा समूह कर्माला प्रेरक असतो. साधन, क्रिया व क्रिया करणारा ह्या तिन्हींचा समुच्चय हें कर्माचें संक्षिप्त स्वरूप होय.

[ प्रत्येक कर्मांत हेतु व स्वरूप असे दोन भाग असतात. त्यांपैकीं हेतु हा स्वरूपाचा प्रेरक असतो, त्यासच "चोदना" असें म्हणतात. कोणतेंही कर्म स्वरूपतः सुरू होण्यापूर्वीं अंतःकरणांत त्याविषयीं प्रवृत्ति होत असते. या प्रवृत्तीस

ज्ञान, ज्ञेय व ज्ञाता या तीन गोष्टी मिळून कारण होतात. पदार्थाचे गुणधर्म व उपयोग माहीत असणें हें त्या पदार्थाचें ज्ञान होय. याप्रमाणें ज्या पदार्थाचें ज्ञान होतें, तो पदार्थ ज्ञेय होय व हें ज्ञान ज्याला होतें, तो जीवात्मा ( बुद्धिविशिष्ट चैतन्य ) हा ज्ञाता होय. ज्ञान, ज्ञेय व ज्ञाता या तिहींच्या समुदायानेंच कोणत्याही पदार्थाची किंवा कर्माची उपयुक्तता किंवा अनुपयुक्तता ठरते. हाच निश्चय, प्रेरणा किंवा चोदना होय. या तिन्हींपैकीं कोणा एकाचा जर अभाव असेल तर निश्चय होणें शक्य नाहीं. ह्याचप्रमाणें साधन, क्रिया व कर्ता असे तीन अंश मिळूनच कर्माचें व्यक्त स्वरूप बनतें. साधन (करण) म्हणजे कोणतें-ही कार्य सिद्ध होण्यास अवश्य असलेली सामग्री, क्रिया (कर्म) कार्याला अनु-कूल होईल असा त्या सामग्रीचा उपयोग करणें व असा उपयोग किंवा व्यापार जो करीत असतो तो कर्ता या तिन्हींचा समुच्चय हेंच कर्म होय. चोदनेच्या तीन अंशांप्रमाणेंच कार्याचे ( कर्मसंग्रहाचे ) हे तीन अंश एकत्र असणें आवश्यक असतें. या दोहोंमध्यें चोदना श्रेष्ठ असून कर्म हें त्या चोदनेला अनुसरून असतें. किंबहुना कर्म हें चोदनेचें ( निश्चयाचें ) दृश्य स्वरूप होय. पूर्वी १४ व्या श्लोका-त प्रत्येक कर्माचीं जीं पांच कारणें सांगितलीं आहेत, त्यांपैकीं अधिष्ठान ( शरीर ) व दैव ( शक्ति ) यांचा कारणांत ( सामग्रींत ) अंतर्भाव करून येथें कर्माचें तीन अंशांनीं युक्त असें संक्षिप्त स्वरूप सांगितलें आहे.]

चोदना व कर्म या दोहोंत मिळून असलेल्या सहा अंशांपैकीं मुख्य तीन अंशां-च्या विवरणाची प्रस्तावना करितात—

**ज्ञानं कर्म च कर्ता च त्रिधैव गुणभेदतः**
**प्रोच्यते गुणसंख्याने यथावच्छृणु तान्यपि** १९

**ज्ञानम्, च कर्म, च कर्ता अपि गुणभेदतः त्रिधा एव, (इति) गुण-संख्याने प्रोच्यते। तानि यथावत् शृणु।**

(अर्जुना), ज्ञान, कर्म व कर्ता यांचे देखील गुणभेदानें (प्रत्येकीं) तीन प्रकार (होतात) असें, ज्यांत गुणांचें चांगलें स्पष्टीकरण आहे अशा, (कापिल) सांख्यशास्त्रांत सांगितलें आहे. ते (सर्व प्रकार) जसेच्या तसे (मी सांगतों तसे) ऐक.

[ सामग्रीचे ( करणांचे ) ठिकाणीं साधनत्व ज्ञानाच्याच योगानें उत्पन्न होत

असल्यामुळें, कारण व ज्ञान ह्या दोहोंबद्दल ज्ञान, ज्ञेयाचें व्यक्त स्वरूप कर्म व ज्ञात्याचें व्यक्त स्वरूप कर्ता असे १८ व्या श्लोकांतील सहा अंशांपैकीं मुख्य तीन अंश घेऊन त्यांचे प्रत्येकाचे सात्विक, राजस व तामस असे होणारे भेद कापिल सांख्यशास्त्रास अनुसरून भगवान् सांगणार आहेत. आत्मा व ब्रह्म हें एकच असून प्रकृति हा त्याच तत्त्वाचा विवर्त होय. हा अद्वैतसिद्धान्त कापिल सांख्य-शास्त्रास संमत नाहीं, तथापि त्या शास्त्रांतील त्रिगुणांचें स्वरूप व त्यांचा विस्तार इत्यादि विषय अद्वैतसिद्धान्तांस प्रतिकूल असल्यामुळें तेच वेदान्तशास्त्रानेंही मान्य केले आहेत. भगवंतांनींही वेदान्तशास्त्राप्रमाणेंच येथें कापिल सांख्यशास्त्रांतील त्या विषयाला मान्यता दिली आहे.

या श्लोकांतील 'गुणसंख्यान' व १४ व्या श्लोकांत आलेले 'कृतान्ते सांख्ये' हे शब्द परस्पर ताडून पाहिल्यास येथें कापिल सांख्य असा अर्थ कां केला आहे व १४ व्या श्लोकांत 'कृतान्तसांख्य' म्हणजे अद्वैत वेदान्त असा अर्थ कां केला आहे यांतील फरक चांगला लक्षांत येण्याजोगा आहे ]

प्रथम ज्ञानाचे तीन प्रकार सांगतात—

**सर्वभूतेषु येनैकं भावमव्ययमीक्षते**
**अविभक्तं विभक्तेषु तज्ज्ञानं विद्धि सात्त्विकम् २०**

**येन विभक्तेषु सर्वभूतेषु अविभक्तम् अव्ययम् एकम् भावम् ईक्षते तत् सात्त्विकम् ज्ञानम् विद्धि ।**

ज्याच्या योगानें भिन्न भिन्न असणाऱ्या सर्व सृष्ट पदार्थांमध्यें अभिन्न, अविकारी, अद्वैत तत्त्व, (ज्ञानी) प्रत्यक्ष पाहतो (जाणतो) तें सात्त्विक ज्ञान होय, असें समज.

[ स्थावर—जंगम सर्व नानाविध सृष्टीमध्यें एकच अविनाशी ब्रह्मतत्त्व भरलेलें आहे आणि आत्मा व हे ब्रह्मतत्त्व एकच आहे असें ओळखणें, म्हणजे जीव-ब्रह्मैक्यसाक्षात्कार, हें सात्त्विक ज्ञान होय.

अ. २, श्लोक ४५ यांतील आत्मवान् या पदाचा ७ व १५ या अध्यायांतील विवरणाप्रमाणेंच हा उपसंहाररूप संक्षिप्त उल्लेख आहे.]

**पृथक्त्वेन तु यज्ज्ञानं नानाभावान् पृथग्विधान्**
**वेत्ति सर्वेषु भूतेषु तज्ज्ञानं विद्धि राजसम् २१**

**तु यत् ज्ञानम् सर्वेषु भूतेषु पृथग्विधान् नानाभावान् पृथक्त्वेन वेत्ति, तत् राजसम् ज्ञानम् विद्धि ।**

परंतु जें ज्ञान सर्व भूतपदार्थांमध्यें निरनिराळीं अनेक तत्त्वें स्वतंत्रपणें (आहेत असें) जाणतें तें राजस ज्ञान समज.

[ सृष्टींतील असंख्य पदार्थांमध्यें निरनिराळीं स्वतंत्र तत्त्वें असून त्यांचा परस्परांशीं कांहीं संबंध येत नाहीं असें प्रतिपादन करणाऱ्या शास्त्रावरून होणारें ज्ञान हें राजस ज्ञान होय. पदार्थविज्ञानादि जीं शास्त्रें ब्रह्मज्ञानानुकूल असतात, त्यांतील ज्ञान हें आत्मज्ञानाला अवश्य असलेलें विज्ञान होय परंतु त्या विज्ञानाचा आत्मज्ञानाशीं असलेला संबंध जर जागृत नसेल तर तेंच ज्ञान (विज्ञान) ब्रह्मज्ञानानुकूल नसल्यामुळें राजस होतें. अर्थात् त्याचा व्यावहारिक उपयोग असला तरी आत्मोन्नतीच्या कामीं उपयोग होत नाहीं. ]

**यत्तु कृत्स्नवदेकस्मिन्कार्ये सक्तमहैतुकम्**
**अतत्त्वार्थवदल्पं च तत्तामसमुदाहृतम्** २२

**तु यत् अहैतुकम्, एकस्मिन् कार्ये कृत्स्नवत् सक्तम्, अतत्त्वार्थवत् अल्पम् च तत् तामसम् उदाहृतम् ।**

परंतु जें हेतु (उपपत्ति किंवा कार्यकारणसंबंध) विरहित, एखाद्या कार्यरूप (नाशिवंत) वस्तूचे ठिकाणीं पूर्णत्वबुद्धीनें संलग्न, तात्त्विक दृष्ट्या निरर्थक व संकुचित ज्ञान असतें, तें तामस ज्ञान (म्हणजे अज्ञानच) होय असें म्हटलें आहे.

[ युक्ति किंवा उपपत्ति समजून घेण्याचा प्रयत्नही न करितां एखाद्या गोष्टीवर अंधश्रद्धा ठेवणें व त्या गोष्टीस सर्वस्व मानून इतर गोष्टींचा तिरस्कार करणें अशा प्रकारचें पोकळ संकुचित ज्ञान आत्मोन्नतीस विघातक असल्यामुळें तें तामस अतएव त्याज्य होय. ]

आतां कर्मांचे तीन प्रकार सांगतात—

**नियतं संगरहितमरागद्वेषतः कृतम्**
**अफलप्रेप्सुना कर्म यत्तत्सात्त्विकमुच्यते** २३

**अफलप्रेप्सुना यत् कर्म नियतम्, संगरहितम्, अरागद्वेषतः कृतम् तत् सात्त्विकम् उच्यते ।**

फलाची आसक्ति न ठेवणाऱ्या पुरुषाकडून, जें कर्म शुद्धबुद्धि-नियमित, अनासक्त बुद्धीनें व कामक्रोधादिविरहित केलें जातें त्याला सात्त्विक (कर्म) म्हणतात

[ कोणत्याही कर्माचा बरेवाईटपणा किंवा बंधकत्व व मोक्षोपयोगित्व त्याच्या बाह्यस्वरूपावरून सिद्ध होत नसून तें कर्त्याच्या बुद्धीच्या शुद्धाशुद्धतेवरून सिद्ध होतें. अ. २, श्लोक ४५ यांतील निर्द्वंद्व या पदाच्या तिसऱ्या अध्यायांतील विवरणाप्रमाणें हा संक्षिप्त उल्लेख म्हणजे उपसंहार आहे.]

**यत्तु कामेप्सुना कर्म साहंकारेण वा पुनः**
**क्रियते बहुलायासं तद्राजसमुदाहृतम्** २४

**पुनः तु साहंकारेण कामेप्सुना वा, यत् कर्म बहुलायासम् क्रियते तत् राजसम् उदाहृतम् ।**

परंतु अभिमानी किंवा सकाम पुरुषाकडून जें कर्म अत्यंत परि-श्रमपूर्वक केलें जातें त्यास राजस म्हणतात.

[ येथेंही कर्माचें राजसत्व त्याच्या बाह्य स्वरूपावर नसून कर्त्याच्या बुद्धींतील अहंकार व विषयासक्ति यांवरच अवलंबून असल्याचें दाखविलें आहे. सात्त्विक कर्मामध्यें सात्त्विक बुद्धीला तितिक्षेची जोड असल्यामुळें त्या कर्मांत जरी आयास पडले, तरी मनाला ते आयास असे वाटत नाहींत. परंतु राजस कर्मांतील साहं-कार व सकाम बुद्धींत तितिक्षेचा अभाव असल्यामुळें, त्या कर्मांत कितीही थोडे श्रम पडले तरी ते अतिशय म्हणजे असह्य वाटूं लागतात.]

**अनुबंधं क्षयं हिंसामनवेक्ष्य च पौरुषम्**
**मोहादारभ्यते कर्म यत्तत्तामसमुच्यते** २५

**अनुबंधम् क्षयम् हिंसाम् पौरुषम् च अनवेक्ष्य यत् कर्म मोहात् आरभ्यते, तत् तामसम् उच्यते ।**

परिणाम, हानि, परपीडा व सामर्थ्य (किंवा योग्यता) यांचा विचार न करितां, जें कर्म अविचारानें आरंभिलें जातें (केलें जातें) त्याला तामस म्हणतात.

[ कोणतेंही कर्म करितांना त्याचे परिणाम काय होतील, त्यापासून स्वतःची

लाभहानि व दुसऱ्याचें हितानहित किती होईल व तें कर्म करण्याची आपल्या अंगीं शक्ति किंवा पात्रता आहे किंवा नाहीं या गोष्टींचा विचार करणें अवश्य असतें. असा विचार न करितां अविचारानें एकदम एखादें काम करूं लागणें हें तामस लक्षण होय.]

ह्याप्रमाणें कर्मांचे तीन प्रकार सांगितल्यावर आतां कर्त्याचे तीन प्रकार सांगतात—

**मुक्तसंगोऽनहंवादी धृत्युत्साहसमन्वितः**
**सिद्ध्यसिद्ध्योर्निर्विकारः कर्ता सात्त्विक उच्यते २६**

**मुक्तसंगः, अनहंवादी, धृत्युत्साहसमन्वितः, सिद्ध्यसिद्ध्योः निर्विकारः कर्ता सात्त्विकः उच्यते ।**

ज्याची आसक्ति सुटली आहे, ज्याची अहंकारबुद्धि नष्ट झाली आहे, जो (ज्ञानाविषयीं) धारणायुक्त व (कर्तव्याविषयीं) उत्साहयुक्त आहे, ज्याचें अंतःकरण यशापयशानें विकार पावत नाहीं, असा कर्ता सात्त्विक (होय, असें) म्हणतात.

[अ. २, श्लोक ४४ यांतील नित्यसत्त्वस्थ ह्या पदाचा ५ व्या अध्यायांतील विवरणाप्रमाणें हा संक्षिप्त उल्लेख म्हणजे उपसंहार आहे.]

**रागी कर्मफलप्रेप्सुर्लुब्धो हिंसात्मकोऽशुचिः**
**हर्षशोकान्वितः कर्ता राजसः परिकीर्तितः २७**

**रागी, कर्मफलप्रेप्सुः, लुब्धः, हिंसात्मकः, अशुचिः, हर्षशोकान्वितः कर्ता राजसः परिकीर्तितः ।**

उपभोगाची वासना धरणारा, कर्मफलाच्या प्राप्तीची इच्छा करणारा, स्वार्थपरायण, परपीडाकारक, (अंतर्बाह्य) अपवित्र, (इष्टप्राप्तीनें) हर्षयुक्त व (अनिष्टप्राप्तीनें किंवा इष्टवियोगानें) शोकग्रस्त होणारा कर्ता राजस (होय), असें सांगितलें आहे.

**अयुक्तः प्राकृतः स्तब्धः शठो नैष्कृतिकोऽलसः**
**विषादी दीर्घसूत्री च कर्ता तामस उच्यते २८**

**अयुक्तः, प्राकृतः, स्तब्धः, शठः, नैष्कृतिकः, अलसः, विषादी, दीर्घसूत्री च कर्ता तामसः उच्यते ।**

कर्तव्य-पराङ्मुख, प्रकृतीच्या (स्वभावाच्या) आधीन असणारा म्हणजे अविवेकी, उद्धट, कपटी, कृतघ्न (दुष्ट), आळशी, दुर्मुखलेला, आणि चेंगट कर्ता तामस (होय) असें म्हटलें आहे.

[ कर्त्यांचे सात्त्विक, राजस व तामस असे भेद, तो करीत असलेल्या कर्माच्या बाह्यस्वरूपावरून होत नसून त्याच्या बुद्धीवरून होतात असें वरील तीन श्लोकांत दाखविलें आहे.]

**बुद्धेर्भेदं धृतेश्चैव गुणतस्त्रिविधं शृणु**
**प्रोच्यमानमशेषेण पृथक्त्वेन धनंजय २९**

**धनंजय बुद्धेः धृतेः च एव गुणतः त्रिविधम् अशेषेण पृथक्त्वेन प्रोच्यमानम् भेदम् शृणु ।**

अर्जुना, बुद्धि (सदसद्विवेकशक्ति) व त्याचप्रमाणें धृति (स्मृति किंवा धारणा) यांचे गुणांच्या योगानें होणारे तीन प्रकारचे व (मजकडून) संपूर्ण आणि वेगवेगळे सांगितले जाणारे भेद ऐक.

[ कर्म व कर्ता यांचे भेद सांगतांना बुद्धीचेच गुणदोष सांगितले आहेत, तथापि येथें सदसद्विवेकशक्ति ( बरेंवाईट ओळखण्याची शक्ति ) हिलाच बुद्धि असें म्हटलें आहे, आणि पुढील श्लोकांत याच बुद्धीचें म्हणजे सदसद्विवेकशक्तीचें वर्णन करावयाचें आहे. ह्या सदसद्विवेकशक्तीच्या योगानें झालेलें ज्ञान जागृत रहाणें हीच धृति म्हणजे धारणा किंवा स्मरणशक्ति होय. ही सदसद्विवेकशक्तीचीच पुढची पायरी असल्यामुळें तिचेही गुणानुसार तीन भेद पुढें सांगितले आहेत. पूर्वी बुद्धीचें अंशतः विवेचन झालें असलें तरी तिच्या सामान्य स्वरूपाचें स्पष्टीकरण करणें हा पुढील सहा श्लोकांचा उद्देश आहे.]

आतां प्रथम बुद्धीचे म्हणजे सदसद्विवेकबुद्धीचे तीन भेद सांगतात—

**प्रवृत्तिं च निवृत्तिं च कार्याकार्ये भयाभये**
**बंधं मोक्षं च या वेत्ति बुद्धिः सा पार्थ सात्त्विकी ३०**

**पार्थ, या बुद्धिः, प्रवृत्तिम्, च निवृत्तिम्, च कार्याकार्ये, भयाभये, बंधम्, मोक्षम् च वेत्ति, सा सात्त्विकी ।**

अर्जुना, जी बुद्धि (सदसद्विवेकशक्ति) विधि व निषेध, कर्तव्य

व अकर्तव्य, भीति व निर्भयता, बंध व मोक्ष हे यथार्थ ओळखते, ती सात्त्विक होय.

[ कर्मासंबंधीं धर्मशास्त्रांतील विधिनिषेध पाहणें जसें अवश्य आहे, त्याचप्रमाणें देशकालपरिस्थित्यनुरूप काय करावयास पाहिजे व काय करतां कामा नये, याचा विचार करणेंही जरूर आहे. तसेंच अंगीकृत कार्यांत विघ्नें कोणतीं येण्याचा संभव आहे व तीं कशीं टाळावयाचीं आणि ह्या कर्मापासून आपली व समाजाची उन्नति होईल कीं अवनति होईल या गोष्टींचाही विचार केला पाहिजे. सारांश, सदसद्विवेकी पुरुषानें केवळ धर्मशास्त्रांतील विधिनिषेधावरच अवलंबून न राहतां, परिस्थिति, मार्गांतील अडचणी व आध्यात्मिक उन्नति यांचा विचार करून आपलें कर्तव्याकर्तव्य म्हणजे कार्याकार्यव्यवस्थिति निश्चित केली पाहिजे. याच अर्थानें वरील श्लोकांत प्रवृत्ति व निवृत्ति हे शब्द आले आहेत. म्हणजे अवश्य कर्मामध्यें प्रवृत्ति व अयोग्य कर्मापासून निवृत्त होणें हेंच खऱ्या शुद्ध बुद्धीचें लक्षण होय. त्याप्रमाणें कर्तव्याकर्तव्याचा निर्दोष निर्णय करण्यास समर्थ होणारी सदसद्विवेकशक्ति, बुद्धियोगाचे पांचही अंश पूर्ण असलेल्या स्थितप्रज्ञाच्याच ठिकाणीं असते हें निराळें सांगावयास नको. अ. २, श्लोक ४५ यांतील निस्त्रैगुण्य या पदाचा ४ थ्या अध्यायांतील विवरणाप्रमाणें येथें संक्षेपानें उपसंहार केला आहे.]

**यया धर्ममधर्मं च कार्यं चाकार्यमेव च**
**अयथावत्प्रजानाति बुद्धिः सा पार्थ राजसी ३१**

**पार्थ, यया धर्मम्, च अधर्मम्, च कार्यम्, अकार्यम् एव च अयथावत् प्रजानाति सा बुद्धिः राजसी ।**

अर्जुना, जिच्या योगानें विहित व अविहित तसेंच कर्तव्य व अकर्तव्य यांविषयीं अनिश्चित समज होतो, म्हणजे योग्य निर्णय होत नाहीं, ती सदसद्विवेकशक्ति राजस होय.

**अधर्मं धर्ममिति या मन्यते तमसावृता**
**सर्वार्थान्विपरीतांश्च बुद्धिः सा पार्थ तामसी ३२**

**पार्थ, या तमसावृता बुद्धिः अधर्मम् धर्मम् इति च सर्वार्थान् विपरीतान् मन्यते सा तामसी ।**

अर्जुना, जी अज्ञानग्रस्त बुद्धि (सदसद्विवेकशक्ति) अधर्मालाच धर्म असे मानिते व सर्व गोष्टी उलट मानिते, (सरळ समजूत सोडून उलटी समजूत करून घेते) ती तामस होय.

ह्याप्रमाणें सदसद्विवेकशक्तीचे भेद सांगून आतां धृतीचे भेद सांगतात—

**धृत्या यया धारयते मनःप्राणेंद्रियक्रियाः**
**योगेनाव्यभिचारिण्या धृतिः सा पार्थ सात्त्विकी ३३**

**पार्थ, योगेन अव्यभिचारिण्या यया धृत्या मनःप्राणेंद्रियक्रियाः धारयते, सा धृतिः सात्त्विकी।**

अर्जुना, बुद्धियोगामुळें अव्यभिचारी (निर्दोष) झालेल्या धारणेनें (स्मरण किंवा विवेकशक्तीच्या नियंत्रणानें,) मन, प्राण व इंद्रियें यांचीं कर्में पुरुष ज्या धृतीनें धारण करितो, (नियंत्रित करितो), ती धृति सात्त्विक होय.

**यया तु धर्मकामार्थान् धृत्या धारयतेऽर्जुन**
**प्रसंगेन फलाकांक्षी धृतिः सा पार्थ राजसी ३४**

**अर्जुन, तु फलाकांक्षी यया धृत्या प्रसंगेन धर्मकामार्थान् धारयते, पार्थ सा धृतिः राजसी।**

अर्जुना, परंतु फलाकांक्षी (पुरुष), ज्या धारणेच्या योगानें (फलाच्या विशेष आसक्तीनें) प्रसंगविशेषीं धर्म, काम व अर्थ धारण करितो, (नियमित करितो) पार्था, ती धारणा राजस होय.

[ धर्म, अर्थ, काम व मोक्ष ह्या चतुर्विध पुरुषार्थांपैकीं, फलाकांक्षी पुरुष, मोक्षाकडे दुर्लक्ष करून बाकीचे तीनच पुरुषार्थ साधण्याच्या प्रयत्नांत गुंतून राहतो. म्हणजे, स्वतःसाठीं उपभोग संपादन किंवा संरक्षण करण्याकरितां, तो जीं जीं व्यावहारिक किंवा धार्मिक कर्मे करितो, त्या सर्व कर्मांचा अंतर्भाव धर्म, अर्थ व काम ह्या तीन पुरुषार्थांतच होत असतो. परंतु निष्कामकर्मयोगी पुरुष, उपभोगाविषयीं निर्योगक्षेम झालेला असल्यामुळें, त्याचीं व्यावहारिक व धार्मिक स्वरूपाचीं सर्व कर्में भगवदुपासनामय असल्यामुळें, त्याचे चारी पुरुषार्थ सिद्ध होतात. सारांश, मोक्षाचा हेतु सोडून केवळ फलांवर अवलंबून असणारी धारणा राजस होय.]

**यया स्वप्नं भयं शोकं विषादं मदमेव च**
**न विमुंचति दुर्मेधा धृतिः सा पार्थ तामसी** ३५

**पार्थ दुर्मेधाः यया स्वप्नम्, भयम् शोकम्, विषादम्, एव च मदम् न विमुंचति, सा धृतिः तामसी ।**

अर्जुना, दुर्बुद्धि (पुरुष) ज्या धारणेनें, झोंप, भीति, शोक, खिन्नता व त्याचप्रमाणें गर्व सोडीत नाहीं, ती धारणा तामस होय.

[ ज्या निश्चित भावनेमुळें, गर्व, भीति, शोक इत्यादि वर सांगितलेले दोष अंतःकरणांतून नष्ट न होतां वाढतच जातात, ती भावना (धारणा) तामस म्हणजे दुराग्रही होय.]

ज्ञान, कर्म, कर्ता, बुद्धि व धृति यांच्या भेदाप्रमाणेंच त्यांपासून प्राप्त होणाऱ्या सुखांचेही तीन प्रकार कसे होतात, ते सांगतात—

**सुखं त्विदानीं त्रिविधं शृणु मे भरतर्षभ**
**अभ्यासाद्रमते यत्र दुःखांतं च निगच्छति** ३६
**यत्तदग्रे विषमिव परिणामेऽमृतोपमम्**
**तत्सुखं सात्त्विकं प्रोक्तमात्मबुद्धिप्रसादजम्** ३७

**भरतर्षभ, इदानीम् त्रिविधम् सुखम् मे शृणु । यत्र अभ्यासात् रमते, दुःखांतम् निगच्छति च, यत् तत् अग्रे विषम् इव, परिणामे अमृतोपमम्, तत् आत्मबुद्धिप्रसादजम् सुखम् सात्विकम् प्रोक्तम् ।**

अर्जुना, आतां तीन प्रकारचें सुख माझ्यापासून (मी सांगतों तें) ऐक. ज्याविषयीं अभ्यासानें (संवयीनें) आवड उत्पन्न होते, व मनुष्य दुःखाच्या शेवटाला जातो (त्याच्या दुःखांचा अंत होतो,) आणि जें जें प्रथम (अज्ञानावस्थेंत) विषासारखें (दुःखकारक) भासतें, परंतु शेवटीं (ज्ञानावस्थेंत) अमृततुल्य (आल्हादकारक) असतें, तें स्वतःच्या बुद्धीच्या प्रसन्नतेपासून उत्पन्न होणारें (बाह्य विषयांच्या संयोगामुळें होणारें नव्हे) सुख सात्त्विक होय.

[ बुद्धियोगाचे पांचही अंश पूर्ण झालेल्या स्थितप्रज्ञ कर्मयोगी पुरुषाची बुद्धि प्रसन्न म्हणजे समाधानयुक्त असते. ह्या अवस्थेंत सर्व दुःखांचा पूर्ण नाश झालेला असल्यामुळें, पुन्हा दुःखावेग उत्पन्न होत नाहीं. हें सात्त्विक सुख सिद्धावस्थेंत

अढळ असतें. ह्यासच 'ब्राह्मी स्थिति' म्हणतात. पूर्वी अ. २, श्लोक ६४।६५ व अ. ६, श्लोक २०।२१।२२ इत्यादि स्थलीं जें सिद्धावस्थेंतील सुखाचें वर्णन आलें आहे, त्याचा येथें उपसंहार केला आहे.]

**विषयेंद्रियसंयोगाद्यत्तदग्रेऽमृतोपमम्**
**परिणामे विषमिव तत्सुखं राजसं स्मृतम्** ३८

**यत् तत् विषयेंद्रियसंयोगात् अग्रे अमृतोपमम्, परिणामे विषम् इव, तत् सुखम् राजसम् स्मृतम्।**

जें जें, विषय व इंद्रियें यांच्या संयोगापासून (उत्पन्न झालेलें) प्रथम अमृतासारखें (आनंददायक) भासतें, परंतु परिणामीं विषासारखें (नाशकारक) असतें, तें राजस सुख समजलें जातें.

**यदग्रे चानुबंधे च सुखं मोहनमात्मनः**
**निद्रालस्यप्रमादोत्थं तत्तामसमुदाहृतम्** ३९

**यत् अग्रे च अनुबंधे च आत्मनः मोहनम् निद्रालस्यप्रमादोत्थम् तत् सुखम् तामसम् उदाहृतम्।**

जें आरभीं व परिणामीं अंतःकरणाला मूढ (विवेकशून्य व बेशुद्ध) करणारें असून, निद्रा, आळस व बेफामपणा ह्यांपासून उत्पन्न होणारें असतें, तें सुख (सुखाभास) तामस होय, असें म्हटलें आहे.

आतां, श्लोक १८ ते ३९ अखेर वर्णन केलेल्या प्रकरणाचा उपसंहार करितात.

**नतदस्ति पृथिव्यां वा दिवि देवेषु वा पुनः**
**सत्त्वं प्रकृतिजैर्मुक्तं यदेभिः स्यात्त्रिभिर्गुणैः** ४०

**यत् एभिः त्रिभिः प्रकृतिजैः गुणैः मुक्तम् स्यात्, तत् सत्त्वम् पृथिव्याम् वा दिवि देवेषु पुनः वा न अस्ति।**

जो ह्या प्रकृतिजन्य (सत्त्व–रज–तम) गुणांनीं रहित असूं शकेल, असा पदार्थ पृथ्वींत, स्वर्गांत किंवा देवांतही नाहीं.

[ मूल प्रकृतीपासून उत्पन्न झालेला, स्थूल–सूक्ष्म प्रत्येक पदार्थ त्रिगुणांच्या मिश्रणानेंच बनलेला असल्यामुळें, त्रिगुणरहित द्रव्य ह्या सृष्टींत एकही सांपडावयाचें नाहीं. जीवन्मुक्त पुरुषाची बुद्धि, मन व इंद्रियें हेंही सृष्ट पदार्थच असल्यामुळें, त्यांत देखील त्रिगुणांचें मिश्रण असणें साहजिकच आहे. तथापि त्यांतील

रजोगुण व तमोगुण नष्टप्राय झालेले असल्यामुळें, तीं सात्त्विक (सत्त्वप्रधान) बनलेलीं असतात. जीवन्मुक्ताची बुद्धि (अ. १४, श्लोक २२ ते २५ अखेर वर्णिल्याप्रमाणें) सात्त्विक झाली म्हणजेच त्याला गुणातीत असें म्हणतात.

येथपर्यंत त्याग, ज्ञान, कर्म, कर्ता, बुद्धि धृति, सुख, पांच अंशांनीं पूर्ण बुद्धि-योग व सिद्धावस्था यांचा उपसंहार केला आहे. संन्यास किंवा त्याग स्वरूपतः कर्मांचा करावयाचा नसून, कर्मांच्या फलाचा करावयाचा असतो, असें भगवंतांनीं स्पष्ट सांगितलें आहे. त्याअर्थीं गीतेंत अनेक ठिकाणीं वर्णन केलेली सिद्धावस्था ही कर्मयोग्याचीच असली पाहिजे हें उघड आहे. बुद्धिपुरःसर घडणारें कोणतेंही कर्म काम्य व बंधक असलेंच पाहिजे, तें निष्काम व बंधरहित होणेंच शक्य नाहीं, हें संन्यासमार्गीय तत्त्व गीतेंत कोठेंही प्रशस्त मानिलेलें नाहीं. अर्थात् ब्रह्मज्ञानी स्थितप्रज्ञाचा देहपात होईपर्यंत त्याची बुद्धि, मन व इंद्रियें नष्ट होत नसून, तीं सात्त्विक बनतात व त्यांचीं कर्में (व्यापार) ही सात्त्विकच असतात. ह्याप्रमाणें मन व इंद्रियें यांना नियंत्रित करणाऱ्या शुद्ध बुद्धीचें प्रकाशकत्व व प्रभुत्व आत्म्याकडेच असतें, हें सिद्ध आहे. अशा स्थितप्रज्ञांचीं यज्ञ, दान, तप इत्यादि कर्में लोकसंग्रहार्थ व **जगताला पावन करणारीं होत असतात.** येथवर सांगितलेल्या त्याग, ज्ञान, इत्यादिकांची पूर्णता हीच खरी व्यक्तीची पूर्णता होय. येथपर्यंत सांगितल्याप्रमाणें व्यक्तीचा अन्तर्बाह्य व्यवहार जेव्हां पूर्ण सात्त्विक होतो, तेव्हांच त्याला ब्राह्मी स्थिति प्राप्त झाली असें म्हणतां येतें. अशा स्थितींत पोहोचलेल्या स्थितप्रज्ञाचें वैयक्तिक किंवा सामाजिक कर्म बंद असतें असें मानण्याचें मुळींच कारण नाहीं. कर्मयोग हें या ब्राह्मी स्थितीचें साधन असून त्या स्थितीला पोहोंचल्यावर हा कर्मयोग त्या ब्राह्मी स्थितीचा सहजधर्म होऊन राहतो. कर्मयोगांतच व्यक्तिधर्म व समाजधर्म असे दोन प्रकारचे विभाग वैदिक धर्मांत पहिल्यापासून मानले आहेत व या विभागांनाच आश्रमधर्म व व वर्णधर्म अशीं नावें शास्त्रकारांनीं दिलीं आहेत. व्यक्तीच्या पूर्णतेचें वर्णाश्रमधर्म हें वैदिक धर्मांतील अव्यभिचारी साधन होय. व्यक्तिधर्म व समाजधर्म किंवा वर्णधर्म या दोहोंमध्यें श्रेष्ठ कोण ? असें कृष्णार्जुनसंवादांतील मूळ बीज आहे. त्यांत रक्तपाताचा अतएव घोर वाटणारा क्षात्रधर्म नरकदायक होईल असें वाटून अर्जुनानें त्याचा त्याग केला व त्याबरोबरच सामान्यतः कर्मसंन्यास करणें हें मोक्षाचें खरें साधन होय असेंही त्यानें ठरविलें. परंतु श्रीकृष्णांनीं आतांपर्यंतच्या

विवेचनांत वेळोवेळीं जे सिद्धान्त व जीं उदाहरणें सांगितलीं आहेत त्यांवरून आश्रमधर्मापेक्षां वर्णधर्म श्रेष्ठ आहे असें सिद्ध होतें ( अ. ३, श्लोक १०-११ विवरण पहा ). प्रस्तुत अध्यायांत प्रतिपाद्य विषयाचा उपसंहार करावयाचा असल्यामुळें त्यांत व्यक्तिधर्म व समाजधर्म या दोहोंचींही स्वरूपें तात्त्विकदृष्ट्या निश्चित करणें जरूर होतें. म्हणून त्याप्रमाणें येथपर्यंत व्यक्तिधर्माचें स्वरूप स्पष्ट केलें आहे व यापुढें क्रमप्राप्त समाज ( वर्ण ) धर्माचा विचार केला आहे.]

शुद्ध बुद्धीनें केलेल्या प्राप्तकर्मांचा यज्ञांतच अंतर्भाव होत असल्यामुळें, चातुर्वर्ण्याचीं स्वभावगुणानुरूप प्राप्तकर्में कोणकोणतीं असतात, तें सांगतात—

**ब्राह्मणक्षत्रियविशां शूद्राणां च परंतप**
**कर्माणि प्रविभक्तानि स्वभावप्रभवैर्गुणैः ४१**

**परंतप, ब्राह्मणक्षत्रियविशाम् शूद्राणाम् च कर्माणि, स्वभावप्रभवैः गुणैः प्रविभक्तानि ।**

अर्जुना, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांचीं कर्में, त्यांच्या त्यांच्या स्वभावजन्य गुणांच्या योगानें विभागलेलीं (भिन्न भिन्न) असतात.

[ सत्त्व, रज व तम ह्या तीन गुणांपैकीं, ज्याच्या अंगीं ज्या गुणाचें प्राधान्य असेल, त्या गुणानुरूप त्याचा स्वभाव सात्त्विक, राजस किंवा तामस असतो. पूर्वजन्मार्जित किंवा आनुवंशिक संस्कार, परिस्थिति, शिक्षण, संगति इत्यादि कारणांनीं मनुष्याच्या स्वभावांत हे भेद उत्पन्न होतात. ह्या स्वाभाविक गुणांस अनुसरून मनुष्यांच्या हातून जीं कर्में घडत असतात, त्यांवरूनच धर्मशास्त्रांत चातुर्वर्ण्यव्यवस्था ठरलेली आहे. ती शास्त्रकारांनीं लहरीनें किंवा पक्षपातानें ठरविलेली नाहीं. हे वर्णव्यवस्थेचें उत्कृष्ट तत्त्व सर्व विद्वानांस मान्य झालेलें आहे आणि सुधारलेल्या सर्व मानवी समाजांत हेंच तत्त्व कमीजास्त प्रमाणानें चालूही आहे.]

**शमो दमस्तपः शौचं क्षांतिरार्जवमेव च**
**ज्ञानं विज्ञानमास्तिक्यं ब्रह्मकर्म स्वभावजम् ४२**

**शमः, दमः, तपः, शौचम्, क्षांतिः, आर्जवम् एव च, ज्ञानम्, विज्ञानम्, आस्तिक्यम् स्वभावजम् ब्रह्मकर्म ।**

शांत व सम बुद्धि, इंद्रियनिग्रह, (कायिक, वाचिक व मानसिक)

तपाचरण; (अंतर्बाह्य) पवित्रता, क्षमा, सरळपणा, त्याचप्रमाणें आत्मज्ञान व विविधसृष्टिज्ञान व श्रद्धा (इत्यादि गुणांचें समाजांत ज्या योगें संवर्धन होतें असा प्रयत्न करणें) ब्राह्मणांचें स्वाभाविक कर्म होय.

[ या श्लोकांत ८–९ सद्गुण सांगितले आहेत ते प्रायः विवेकशील मनुष्यांत कमीजास्त प्रमाणानें दिसून येण्याजोगे आहेत. अर्थात् ब्राह्मण वर्णाचें वर्गीकरण या गुणानें कसें होतें अशी सकृद्दर्शनीं शंका येणें साहजिकच आहे. परंतु थोडासा खोल विचार केल्यास या शंकेचें निरसन करतां येतें. प्रस्तुत श्लोकांत फक्त गुण सांगितले आहेत आणि शेवटच्या ओळींत ब्रह्मकर्म असें म्हटलें आहे. या दोहोंची संगति कशी लावावयाची हा प्रश्न आहे. व्यक्तीचे ठिकाणीं हे गुण प्रामुख्यानें असल्यास त्या व्यक्तीस ब्राह्मण समजावें असें म्हटल्यास हें व्यक्तीचें लक्षण होईल, वर्णाचें होत नाहीं. करितां ज्या व्यक्तीचें कर्म प्रस्तुत श्लोकांत सांगितलेल्या शमदमादि सद्गुणांचें संवर्धन करणारें असतें तेंच ब्रह्मकर्म होय. म्हणजे ब्राह्मणधर्मांतील व्यक्ति स्वतःचेंच केवळ सद्गुण संवर्धन करीत नसून, समाजाचे सद्गुण संवर्धन करण्याकरितां ज्याचा अहर्निश प्रयत्न चालू असतो तो ब्राह्मण होय. अर्थात् शमदम इत्यादि सद्गुण समाजांत वृद्धिंगत व्हावेत व समाज शीलवान् व्हावा या उद्देशानें प्रयत्न करण्याकडे ज्याची साहजिक प्रवृत्ति असते तेथेंच खरें ब्राह्मण्य वास करीत आहे; असें समजावें असें या श्लोकाचें तात्पर्य आहे.]

**शौर्यं तेजो धृतिर्दाक्ष्यं युद्धे चाप्यपलायनम्**
**दानमीश्वरभावश्च क्षात्रं कर्म स्वभावजम्** ४३

**शौर्यम्, तेजः, धृतिः, दाक्ष्यम्, अपि च युद्धे अपलायनम्, दानम्, ईश्वरभावः च क्षात्रम् स्वभावजम् कर्म।**

शौर्य (पराक्रम), तेजस्विता, धारणाशक्ति, दक्षता आणि युद्धामध्यें पळून न जाणें (धैर्य), औदार्य व ऐश्वर्य (अधिकार), (ह्या गोष्टी ज्यांत प्राधान्येंकरून असतात) तें क्षत्रियांचें स्वाभाविक कर्म होय.

[ या श्लोकांत देखील वैयक्तिक सद्गुण सांगितलेले नसून, मुख्यतः समाजामध्यें शौर्यादि सद्गुणांचें संवर्धन करण्याकडे ज्याची विशेष ( प्रीति ) प्रवृत्ति असते तो क्षत्रिय होय, असें मागील श्लोकांतील विवरणाप्रमाणें या श्लोकाचें तात्पर्य समजावें श्लोक ४२ व ४३ यांत ब्राह्मधर्म व क्षात्रधर्म यांचे गुण सांगितले आहेत.

या दोनही गुणांचा प्रत्येक व्यक्तीचे ठिकाणीं समुच्चय असावा असा प्राचीन ऋषींचा कळकळीचा अभिप्राय आहे. हा अभिप्राय गीतेसही पूर्णपणें मान्य आहे. (अ. ८, श्लोक ७) हे दोन्ही धर्म एकाच स्वरूपाचे आहेत व असावेत असें मत ऋषींनीं अनेक ठिकाणीं नमूद करून ठेविलें आहे. ( मनुस्मृति, अ. ९–३२२ ) ( म. भा. शां. प. अ. २२।६ व अ. ७३।११ ).]

**कृषिगोरक्ष्यवाणिज्यं वैश्यकर्म स्वभावजम्**
**परिचर्यात्मकं कर्म शूद्रस्यापि स्वभावजम्** ४४

**कृषिगोरक्ष्यवाणिज्यम् स्वभावजम् वैश्यकर्म। अपि शूद्रस्य परिचर्यात्मकम् स्वभावजम् कर्म।**

शेतकी, गुरें बाळगणें, व्यापार, कारागिरी (ह्या गोष्टी ज्यांत प्राधान्येंकरून असतात) तें वैश्यांचें स्वाभाविक कर्म होय. आणि परिचर्या म्हणजे मोलमजुरीच्या स्वरूपाचें कर्म, हें शूद्रांचें स्वाभाविक कर्म होय.

[ या श्लोकांत वैश्य व शूद्र या धर्मांचें दिग्दर्शन केलें आहे. वैश्य त्रैवर्णिकांतील असून ब्राह्मण व क्षत्रिय यांच्या जोडीचा आहे. परंतु गीताकालीं वैश्यवर्णाची महती कमी झाली असावी असें वाटतें. तथापि समाजाच्या दृष्टीनें वैश्यवर्णाविषयीं किंवा वैश्यधर्माविषयीं कमीपणाची दृष्टि नसावी अशा अभिप्रायानेंच क्षात्रधर्माबरोबर वैश्यधर्माचें वर्णन प्रस्तुत श्लोकांत आलेलें आहे. येथें वैश्यधर्मांतील गुण थोडे सांगितले आहेत. तथापि वैश्यधर्माचें सामान्य स्वरूप पुढीलप्रमाणें आढळून येतें.

**आस्तिक्यं दाननिष्ठा च अदंभो ब्रह्मसेवनम्**
**अतुष्टिरर्थोपचये वैश्यप्रकृतयस्त्विमाः**

**अर्थ**—श्रद्धा, सत्पात्रीं दान, सरळपणा ( अनसूया ) ब्रह्मसेवन ( विद्यार्जन व विद्येस उत्तेजन देणें ), संपत्तिसंवर्धनाविषयीं अतुष्टि, म्हणजे संपत्ति अखंड संवर्धन करीत रहाणें हें वैश्यधर्माचें सामान्य स्वरूप होय. यावरून समाजाला पूर्वीच्या दोन धर्मांप्रमाणें वैश्यवर्णाचीही अत्यंत आवश्यकता आहे, असें स्पष्ट होतें. ( म. भा. शां. प. अ. ११२–१८ ) याप्रमाणेंच मुख्यत्वेंकरून शारीरिक कष्ट करणारा शूद्रवर्ण देखील समाजास अत्यंत उपयुक्त असल्यामुळें कोणत्याही वर्णाबद्दल उच्चनीच भाव दर्शविणें शास्त्रदृष्ट्या अत्यंत अप्रशस्त होय असें ठरतें.

दैवी संपत्ति व सात्त्विक गुण संपादन करणें हें चारी वर्णांस आवश्यकच आहे. तथापि, संस्कार व परिस्थिति यांस अनुसरून प्रत्येक वर्णाची कर्मे भिन्न भिन्न होतात. कर्मांच्या ह्या भिन्नपणास स्वाभाविक गुणच मुख्यत्वेंकरून कारण होतात.]

कर्मांच्या भिन्न स्वरूपावरून बाह्यतः दिसणाऱ्या उच्चनीचपणामुळें, आध्यात्मिक उन्नतींत फरक पडतो कीं काय, तें सांगतात—

**स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः**
**स्वकर्मनिरतः सिद्धिं यथा विंदति तच्छृणु** ४५

**स्वे स्वे कर्मणि अभिरतः नरः संसिद्धिम् लभते। स्वकर्मनिरतः यथा सिद्धिम् विंदति तत् शृणु।**

स्वतःच्या स्वाभाविक कर्मांत म्हणजे वर्णधर्मांत तत्पर असलेल्या पुरुषास मोक्षप्राप्ति होते (त्याला मोक्षाकरितां स्वकर्माचा म्हणजे वर्ण-धर्माचा त्याग करावा लागत नाहीं) अशा स्वकर्मनिष्ठ पुरुषास मोक्ष कसा मिळतो, तें ऐक.

[ कोणत्याही समाजांत वावरणाऱ्या मनुष्यास स्वतःच्या वैयक्तिक परमार्थी-करितां किंवा मोक्षप्राप्तीकरितां म्हणून आपल्याला कांहीं तरी निराळा कार्यक्रम करावयास पाहिजे असें वाटण्याचा संभव असतो. कारण सार्वजनिक कामें प्रायः व्यावहारिक स्वरूपाचींच असल्यामुळें, तें काम करणें म्हणजे परमार्थ करणें होय असें वाटत नाहीं. परंतु गीताशास्त्राचा उपदेश वरील समजुतीच्या अगदीं उलट आहे, हें प्रत्येकानें लक्षांत ठेविलें पाहिजे. मनुष्य ब्राह्मणधर्मानें वागणारा असो वा शूद्रधर्मानें वागणारा असो, म्हणजे तो लोकशिक्षणाचें काम करीत असला किंवा स्वतः मजुरांची चळवळ करीत असला, तथापि तो जर गीताशास्त्रांत सांगितल्या-प्रमाणें योगयुक्त बुद्धीनें आपलें काम करील तर त्या मार्गानेंच तो खचित मोक्षास जाईल असा गीताशास्त्राचा सिद्धान्त आहे.]

हेंच तत्त्व सोपपत्तिक पद्धतीनें मांडतात—

**यतः प्रवृत्तिर्भूतानां येन सर्वमिदं ततम्**
**स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विंदति मानवः** ४६

**यतः भूतानाम् प्रवृत्तिः, येन इदम् सर्वम् ततम्, तम् स्वकर्मणा अभ्यर्च्य, मानवः सिद्धिम् विंदति।**

ज्याच्यापासून सर्व भूतपदार्थांची उत्पत्ति झाली आहे व ज्यानें हें सर्व विश्व व्यापिलें आहे, त्या परमात्म्याची, आपापल्या स्वाभाविक कर्मांच्या योगानें (वर्णधर्मांच्या योगानें) उपासना केली असतां मनुष्यास मोक्ष प्राप्त होतो.

[ विश्वोत्पादक व विश्वव्यापक परमेश्वराच्या ठिकाणा प्रेम व श्रद्धा ठेवून, प्रत्येकानें चातुर्वर्ण्यास अनुसरून प्राप्त झालेलें कर्म परमेश्वरार्पणबुद्धीनें करीत राहाणें, हीच परमेश्वराची उपासना होय आणि ह्या उपासनेनें क्रमाक्रमानें बुद्धि-योग पूर्ण होऊन, तो पुरुष जीवन्मुक्त कर्मयोगी होतो. येथें प्रथमाध्यायांतील अर्जुनाच्या शंकेचें पूर्ण निरसन केलें आहे. अर्जुनाला व्यक्तिधर्माचें किंवा व्यक्ति धर्मांतूनच विस्तार पावलेल्या कुलधर्मांचें अत्यंत महत्त्व वाटत होतें; परंतु कुल-धर्मांपेक्षां वर्णधर्म श्रेष्ठ असून तोच त्याचा नियामक आहे. शुद्ध बुद्धीनें चातुर्वर्ण्या-स अनुसरून आचरिलेला वर्णधर्म हीच खरी परमेश्वराची उपासना होय. ही उपासना व्यक्तीला मोक्षदायक व राष्ट्राला अभ्युदयकारक असल्यानें तोच राष्ट्र-धर्म होय. ह्या धर्मापुढें व्यक्तिधर्माची किंवा कुलधर्माची मातबरी नाहीं आणि म्हणूनच व्यक्तिधर्म व राष्ट्रधर्म यांत विरोध आल्यास मनुष्यानें योगयुक्त बुद्धीनें राष्ट्रधर्माचें आचरण करणेंच श्रेयस्कर आहे, असें अर्जुनाचें भगवंतांनीं समाधान केलें आहे. आतांपर्यंत परमेश्वराच्या ज्ञानविज्ञानमय स्वरूपाचें अनेक ठिकाणीं वर्णन आलें आहे. हें ज्ञानविज्ञान बुद्धि पूर्ण शुद्ध होण्यास किंवा तिचा विकास पूर्ण होण्यास अत्यंत अवश्य आहे. निरनिराळ्या निमित्तांनीं गीता-शास्त्रामध्ये अनेक बौद्धिक गुण सांगितले असले तथापि ज्ञानविज्ञान हें सर्वांत श्रेष्ठ होय. या ज्ञानविज्ञानाच्या उल्लेखाबरोबर सर्व सद्‌गुण अभिप्रेत आहेत असें मानण्यास हरकत नाहीं. आणि म्हणूनच १३ व्या अध्यायांत ज्ञानाच्या ऐवजीं ज्ञानाच्या सहकारी सर्व सद्गुणांचे वर्णन आलें आहे. ज्ञानविज्ञान हें परमात्म-स्वरूपांतच समाविष्ट होत असल्यामुळें, परमेश्वरस्वरूप या शब्दाबरोबर ज्ञान-विज्ञान, दैवीसंपत्ति व बुद्धियोगाचे सर्व अंश या सर्व गोष्टी अभिप्रेत आहेत असें मानतां येतें. याच अभिप्रायानें प्रस्तुत श्लोकाच्या पूर्वार्धांत परमात्मस्वरूपाचा उल्लेख केला आहे. हें वर्णन संक्षिप्त असलें, तथापि त्यांतील शब्द फारच निवडक आहेत. यावरून आतांपर्यंतची ज्ञानविज्ञानाची उपपत्ति येथें सुचविण्याकरितांच

भगवंतांनीं अशी निवडक शब्दयोजना केली आहे असें ठरतें. या श्लोकाच्या उत्तरार्धांत आलेला स्वकर्म हा शब्द मुख्यतः वर्णधर्माचाच बोधक आहे. कारण याचे मागील प्रकरणांत चातुर्वर्ण्याचेंच वर्णन असून त्यांतूनच प्रस्तुत श्लोक निघाला आहे. यावरून ज्ञानविज्ञान-संपन्न बुद्धीनें आचरिलेला वर्णधर्म हाच खरा मोक्ष-दायक कर्मयोग होय असें निर्विवाद सिद्ध होतें. येथें अ. ३, श्लोक ९–१० पासून ३० पर्यंत आलेल्या कर्मयोगाच्या वर्णनाचा उपसंहार आहे.]

चातुर्वर्ण्याच्या कर्मांचें स्वरूप भिन्न भिन्न असल्यामुळें, त्यांत उच्चनीच–भाव दिसणें स्वाभाविक आहे. मग हलकीं दिसणारीं कर्में सोडून सर्वांनीं उच्च कर्मेंच कां करूं नयेत हें सांगतात—

**श्रेयान् स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात्**
**स्वभावनियतं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम्** ४७

**स्वधर्मः विगुणः ( अपि ) परधर्मात् स्वनुष्ठितात् श्रेयान्। स्वभाव-नियतम् कर्म कुर्वन्, किल्बिषम् न आप्नोति।**

(चातुर्वर्ण्यास अनुसरून) स्वतःचें प्राप्तकर्म दिसण्यांत कमी प्रतीचें असलें तरी, चांगल्या प्रकारें आचरिलेल्या दुसऱ्याच्या कर्मापेक्षां श्रेयस्कर होतें. स्वभावानें नियमित झालेलें, म्हणजे स्वाभाविक गुणांस अनुसरून असलेलें कर्म आचरण करणाराला दोष लागत नाहीं.

[ स्वाभाविक गुणानुसार प्राप्त झालेलें कर्म हलक्या प्रतीचें किंवा वाईट दिसलें तरी तेंच केलें पाहिजे. दुसऱ्याचें कर्म चांगलें व उच्च प्रतीचें दिसलें तरी, तें स्वाभाविक गुणाविरुद्ध असेल तर, केव्हांही करितां कामा नये. कारण, कर्माच्या उच्चनीच स्वरूपाशीं आध्यात्मिक उन्नतीचा कांहीं संबंध नसून तो कर्त्याच्या बुद्धीशीं असतो. जगाच्या ( राष्ट्राच्या ) धारणपोषणास चारी वर्णांचीं कर्में अवश्य असल्यामुळें, तीं सर्व चाललींच पाहिजेत. कर्मांच्या बाह्य स्वरूपावरूनच कर्त्याची योग्यता ठरविणें रास्त नाहीं. अ. ३, श्लोक ३५ यांतील नियमच येथें उपसंहारार्थ पुन्हा सांगितला आहे.]

ह्याच नियमाचें आणखी स्पष्टीकरण करितात—

**सहजं कर्म कौंतेय सदोषमपि न त्यजेत्**
**सर्वारंभा हि दोषेण धूमेनाग्निरिवावृताः** ४८

**कौंतेय, सहजम् कर्म सदोषम् अपि न त्यजेत्। हि धूमेन अग्निः इव सर्वारंभाः दोषेण आवृताः।**

अर्जुना, स्वाभाविक प्राप्तकर्म सदोष असलें तरी त्याचा त्याग करूं नये. कारण, ज्याप्रमाणें अग्नि धुरानें युक्त असतो, त्याप्रमाणें सर्व कर्में दोषांनीं युक्त असतातच

[ कोणतेंही काम प्रत्यक्ष ज्याच्या हातून घडत असतें त्याला त्यांतील गुण-दोष, अडचणी वगैरे जशा पूर्णपणें कळतात, तशा त्या इतरांना कळणें शक्य नसतें. तिऱ्हाइताला त्याच्या बाह्य स्वरूपावरून त्यांतील गुण तेवढे दिसत असतात, त्यामुळें आपलें कर्म हीन, अडचणींचें किंवा धोक्याचें आहे, त्यापेक्षां दुसऱ्याचें कर्म पुष्कळ चांगलें असें मनुष्याला वाटतें, परंतु हें अज्ञान आहे. कारण, प्रत्येक कर्मांत अडचणी, संकटें व धोके असावयाचेच. म्हणून प्रत्येकानें आपापलें प्राप्तकर्म न कंटाळतां उत्साहपूर्वक व शुद्ध बुद्धीनें करीत राहणें हेंच ऐहिक व पारमार्थिक दृष्ट्या श्रेयस्कर होय.

वरील दोन्ही श्लोकांत वर्णधर्म या अर्थानेंच 'स्वधर्म' व 'कर्म' हे शब्द आलेले आहेत हें लक्षांत ठेवणें जरूर आहे.]

प्राप्तकर्माचरणच श्रेयस्कर कसें होतें तें सांगतात—

**असक्तबुद्धिः सर्वत्र जितात्मा विगतस्पृहः**
**नैष्कर्म्यसिद्धिं परमां संन्यासेनाधिगच्छति** ४९

**सर्वत्र असक्तबुद्धिः, जितात्मा, विगतस्पृहः, संन्यासेन परमाम् नैष्कर्म्यसिद्धिम् अधिगच्छति।**

कोणत्याही कर्माच्या फलाविषयीं आसक्ति न ठेवणारा, जितेंद्रिय व निस्पृह पुरुष, (वरील तीन विशेषणांनीं दर्शविलेल्या) संन्यासानें, अर्थात् कर्मफलत्यागानें, परम श्रेष्ठ नैष्कर्म्यसिद्धि (कर्मबंधाचा नाश म्हणजे मोक्ष हीच सिद्धि) मिळवितो.

[ अनासक्ति, मनोनिग्रह व निस्पृहता ह्या गुणांनीं युक्त संन्यास, हा कर्मांचा स्वरूपतः संन्यास नसून, त्यांच्या फलांचा त्याग होय (अ. १८, श्लोक २). ह्या फलत्यागरूप संन्यासानेंच मनुष्य कर्मबंधांतून मुक्त होतो, म्हणजे त्याचा बुद्धियोग पूर्ण सिद्ध होतो. कर्मांच्या अनारंभानें, किंवा प्राप्तकर्मत्यागानें नैष्कर्म्यसिद्धि होत

नाहीं, असें पूर्वी (अ. ३, श्लोक ४) सांगितलें आहे. त्याचप्रमाणें (अ. २, श्लोक ५०) योगयुक्त पुरुष पापपुण्यरूप कर्मबंधापासून मुक्त होतो असेंही सांगितलें आहे. यावरून योगयुक्त होणें हीच नैष्कर्म्यसिद्धि होय.]

ह्या नैष्कर्म्य-सिद्धीचें फल सांगतात—

**सिद्धिं प्राप्तो यथा ब्रह्म तथाप्नोति निबोध मे**
**समासेनैव कौंतेय निष्ठा ज्ञानस्य या परा ५०**

**कौंतेय, सिद्धिम् प्राप्तः यथा ब्रह्म आप्नोति, तथा समासेन मे निबोध। या एव ज्ञानस्य परा निष्ठा।**

अर्जुना, नैष्कर्म्यसिद्धि प्राप्त झालेल्या पुरुषास ज्या पद्धतीनें ब्रह्म-प्राप्ति होते, ती पद्धति (योगनिष्ठा) संक्षेपानें माझ्यापासून जाण (ऐक) हीच ज्ञानाची उत्कृष्ट निष्ठा (आचरणपद्धति) होय.

[ या श्लोकांतील पदयोजना बरीच गुंतागुंतीची दिसते. मागील श्लोकांतच नैष्कर्म्य-सिद्धि हा शब्द आला असल्यामुळें प्रस्तुत श्लोकांतील सिद्धि या शब्दाचा अर्थ नैष्कर्म्य-सिद्धि असाच करणें प्राप्त आहे. नैष्कर्म्य-सिद्धि प्राप्त झालेल्या मनुष्याला ब्रह्मप्राप्ति व्हावयाची शिल्लक असते असें मानणें बरोबर नाहीं. कारण, नैष्कर्म्य-सिद्धि म्हणजे मोक्ष असा अर्थ सर्वत्र केला जातो. म्हणून नैष्कर्म्य–सिद्धि व ब्रह्मप्राप्ति या दोन गोष्टी एकमेकांहून भिन्न नसल्यामुळें, एक प्राप्त झाल्यावर दुसरी मिळते असें म्हणणें सयुक्तिक नाहीं. " सिद्धस्य गतिश्चिंतनीया " या न्यायानें श्लोकांतील अन्वय बसवावयाचा झाल्यास एक तोड दिसते ती अशीः– 'नैष्कर्म्य-सिद्धि' या शब्दाचे अनेक अर्थ होत नाहींत, परंतु 'ब्रह्म' या शब्दाचे मात्र अनेक अर्थ आहेत. खुद्द गीतेंतच प्रकृति, ज्ञान, वेद व ईश्वर इत्यादि अर्थानें ब्रह्म शब्द आलेला आहे. या श्लोकांतील ब्रह्म शब्दाचा अर्थ ज्ञान असा करून पुढीलप्रमाणें श्लोकाचा अन्वय करावा.

" ब्रह्मप्राप्तः सिद्धिं यथा आप्नोति तथा मे निबोध।"

**अर्थ**—ज्ञान ( परोक्षज्ञान ) प्राप्त झालेला मनुष्य सिद्धि म्हणजे नैष्कर्म्य-सिद्धि ( अमृतत्व ) ज्या पद्धतीनें मिळवितो ती रीति माझ्यापासून ऐक.

याप्रमाणें अर्थ केल्यास पूर्वी सांगितलेली अडचण येत नाहीं, मात्र ब्रह्म शब्दाचा अर्थ भिन्न करावा लागतो इतकेंच.

योगनिष्ठा हाच अमृतत्वाचा प्रशस्त मार्ग होय असें येथें भगवंतांनीं विधान केलें आहे. अध्याय ३, श्लोक ३ यांत सांख्यांची निष्ठा व कर्मयोग्यांची निष्ठा अशा दोन निष्ठा सांगितल्या आहेत व या दोन्ही निष्ठांस आत्मज्ञानाची सारखी-च आवश्यकता असते असेंही सिद्ध केलें आहे. अर्थात् या दोन्ही निष्ठा ज्ञाना-च्या म्हणजे ज्ञानपूर्वकच आहेत. त्यांपैकीं योगनिष्ठाच भगवंतांनीं अधिक प्रशस्त ठरविली आहे. गीताशास्त्रांत ठिकठिकाणीं या योगनिष्ठेचेंच प्रतिपादन आलें आहे म्हणून येथें योगनिष्ठेच्या उपसंहाराचे प्रारंभीं तिला 'परा' म्हणजे श्रेष्ठ असें विशेषण जोडिलें आहे.]

योगनिष्ठेचें संक्षिप्त स्वरूप सांगतात—

**बुद्धया विशुद्धया युक्तो धृत्यात्मानं नियम्य च**
**शब्दादीन्विषयांस्त्यक्त्वा रागद्वेषौ व्युदस्य च** ५१
**विविक्तसेवी लघ्वाशी यतवाक्कायमानसः**
**ध्यानयोगपरो नित्यं वैराग्यं समुपाश्रितः** ५२
**अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं परिग्रहम्**
**विमुच्य निर्ममः शांतो ब्रह्मभूयाय कल्पते** ५३

**धृत्या युक्तः, विशुद्धया बुद्धया आत्मानम् नियम्य च, रागद्वेषौ व्युदस्य, शब्दादीन् विषयान् त्यक्त्वा च, विविक्तसेवी, लघ्वाशी, यतवाक्कायमानसः, ध्यानयोगपरः, नित्यम् वैराग्यम् समुपाश्रितः, अहंकारम्, बलम्, दर्पम्, कामम्, क्रोधम्, परिग्रहम् विमुच्य, निर्ममः, शांतः, ब्रह्मभूयाय कल्पते।**

धारणेनें युक्त (निश्चयी), शुद्ध बुद्धीनें मनाचें नियमन करून, (तद्द्वारा) इंद्रियांचे विषयांविषयींचे रागद्वेष (आवडनावड) काढून टाकून, शब्दादि विषयोपभोगांचा (विषयवासनांचा) त्याग करून, पवित्र व शुद्ध स्थानीं राहणारा, म्हणजे सात्त्विक व मिताहारी, शरीर, वाणी व मन यांचें संयमन करणारा, (कायिक, वाचिक, मानसिक तपाचरण करणारा) भगवच्चिंतन करणारा, नेहमीं वैराग्य-संपन्न असणारा (उपभोगाची तळमळ न बाळगणारा), अभिमान,

दुराग्रह, गर्व, हांव, संताप व उपभोगसामग्री यांचा त्याग करून, ममताशून्य व शांतवृत्ति असणारा पुरुष ब्रह्मस्वरूप होण्यास पात्र होतो.

[ या तीन श्लोकांत अध्याय २, श्लोक ४५ ह्यांतील बुद्धियोगाच्या पांचही अंशांचा समावेश केला आहे. शुद्ध बुद्धि व धृति यांचें अंतःकरणावर नियमन असलें पाहिजे. म्हणजे 'नित्यसत्त्वस्थ' असलें पाहिजे. विषयांबद्दलचे रागद्वेष नष्ट करून उपभोगवासनांचा त्याग केला पाहिजे म्हणजे निर्द्वंद्व झालें पाहिजे. पवित्र आचरण, मिताहार व कायिक, वाचिक, मानसिक तपाचरणपूर्वक भगवचिंतन करीत असलें पाहिजे म्हणजे 'आत्मवान्' असलें पाहिजे. नेहमीं वैराग्यसंपन्न म्हणजे 'निस्त्रैगुण्य' असलें पाहिजे आणि अहंकारादि दोष नाहींसे करून ममत्वशून्य म्हणजे 'निर्योगक्षेम' झालें पाहिजे. ह्याप्रमाणें बुद्धियोगाचे पांचही अंश ज्याच्या ठिकाणीं पूर्ण असतात, असा समाधानसंपन्न पुरुष ब्रह्मसाक्षात्कार संपादन करण्यास समर्थ होतो. यावरून बुद्धियोग, ब्राह्मी स्थिति, नैष्कर्म्य-सिद्धि व योगनिष्ठा हे सर्व समानार्थक शब्द आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं.]

**ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा न शोचति न कांक्षति**
**समः सर्वेषु भूतेषु मद्भक्तिं लभते पराम्** ५४

**ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा न शोचति न कांक्षति, सर्वेषु भूतेषु समः, पराम् मद्भक्तिम् लभते ।**

ब्रह्मसाक्षात्कारास समर्थ असलेल्या पुरुषाचें अंतःकरण प्रसन्न असतें म्हणून (कोणत्याही गोष्टीबद्दल) तो शोक करीत नाहीं व अपेक्षाही धरीत नाहीं. सर्व प्राणिमात्रांचे ठिकाणीं त्याची बुद्धि सारखीच (हितकारक) असते (तेणेंकरून) त्याला श्रेष्ठ (ज्ञानविज्ञानयुक्त) अशी माझी (परमात्म्याची) भक्ति प्राप्त होते.

**भक्त्या मामभिजानाति यावान्यश्चास्मि तत्त्वतः**
**ततो मां तत्त्वतो ज्ञात्वा विशते तदनंतरम्** ५५

**ततः माम् यावान् यः च अस्मि, भक्त्या तत्त्वतः अभिजानाति । तदनंतरम् माम् तत्त्वतः ज्ञात्वा विशते ।**

तदनंतर मी (परमात्मा) केवढा व कोण आहे, हें (तो ज्ञान-

विज्ञानयुक्त) भक्तीच्या योगानें तत्त्वतः ओळखतो. तदनंतर (तो) मला (परमात्मस्वरूपाला) प्राप्त होतो, म्हणजे जीवन्मुक्त होतो.

[ ब्रह्मसाक्षात्कारास समर्थ झालेल्या पुरुषाचें अंतःकरण प्रथम प्रसन्न (निस्त्रैगुण्य) होतें. अतएव त्याचे हर्षशोकादि विकार नाहींसे होतात (तो निर्द्वंद्व होतो), त्याचप्रमाणें त्याची हाव व तळमळही नष्ट होते (तो निर्योगक्षेम होतो), त्याच्या ठिकाणीं सर्व प्राणिमात्रांविषयीं हितबुद्धि उत्पन्न होते (तो नित्यसत्वस्थ होतो), आणि त्याच्या अंतःकरणांत ज्ञानविज्ञानयुक्त भगवद्भक्ति उत्पन्न होते (तो आत्मवान् होतो), म्हणजे परमात्मा केवढा आहे व कसा आहे हें विज्ञानासह ज्ञान, अर्थात् परमात्म्याचें यथार्थ तात्त्विक ज्ञान झाल्यावर तो परमात्मस्वरूप (जीवन्मुक्त) होतो.]

ह्या ज्ञानयुक्त योगनिष्ठेंत कर्मांचा स्वरूपतः त्याग करावयाचा नाहीं हें स्पष्ट दर्शविण्याकरितां सांगतात—

**सर्वकर्माण्यपि सदा कुर्वाणो मद्व्यपाश्रयः**
**मत्प्रसादादवाप्नोति शाश्वतं पदमव्ययम्** ५६

**मद्व्यपाश्रयः, सर्वकर्माणि अपि सदा कुर्वाणः, मत्प्रसादात् अव्ययम् शाश्वतम् पदम् अवाप्नोति ।**

माझा (परमात्म्याचा) अनन्याश्रय करणारा (कर्मयोगी), सर्वही कर्में नेहमीं करीत असतां माझ्या (परमेश्वराच्या) कृपेनें अक्षय शाश्वत पद (अमृतत्व) प्राप्त करून घेतो.

[ साधकाप्रमाणेंच सिद्धांनींही कर्मयोगाचरण करणें अवश्य आहे हें आतांपर्यंत अनेक वेळां भगवंतांनीं प्रतिपादन केलें आहे, तेंच उपसंहारांत स्पष्ट दाखविलें आहे. अ. ७, श्लो० १७ यांत सांगितल्याप्रमाणें या प्रकरणांतही ज्ञानविज्ञानपूर्वक भगवद्भक्तियुक्त अंतःकरणानें कर्मयोगाचरण करणें हाच अमृतत्वप्राप्तीचा प्रशस्त मार्ग होय, असें येथें ५० व्या श्लोकांतील विधानाचें निगमन केलें आहे. श्लोक ५० पासून येथपर्यंत केलेलें विवेचन हा योगनिष्ठेचा संक्षिप्त उपसंहार आहे. भगवंतांनीं अर्जुनाला जो उपदेश केला, तें वैदिक धर्माचें रहस्य होय ही गोष्ट सर्वमान्य आहे. करितां भगवंतांच्या निरनिराळ्या उपदेशवाक्यांस उपनिषदांचे पुष्कळच आधार मिळतात, तथापि त्यांची फारशी आवश्यकता दिसत

नाहीं, परंतु आम्हीं ज्या प्रकरणास उपसंहार असें म्हटलें आहे, तो विषय उपनिषदांमध्येंदेखील उपसंहारादाखलच आहे ही खरोखर आनंदाची गोष्ट होय. वाचकांनीं (छां० उ०, अ. ८।१५) हें काळजीपूर्वक अवश्य वाचून पाहावें म्हणजे गीता-शास्त्राचा उपसंहार व छांदोग्योपनिषदाचा उपसंहार हे तात्त्विकदृष्ट्या कसे एकच आहेत हें कोणालाही चांगलें समजून येण्याजोगें आहे.]

त्याच योगनिष्ठेचा अर्जुनास व्यक्तिशः उपदेश करितात—

**चेतसा सर्वकर्माणि मयि संन्यस्य मत्परः**
**बुद्धियोगमुपाश्रित्य मच्चित्तः सततं भव** ५७

**मत्परः सन् सर्वकर्माणि चेतसा मयि संन्यस्य बुद्धियोगम् उपाश्रित्य सततम् मच्चित्तः भव ।**

मत्पर (म्हणजे परमात्मस्वरूप हेंच ज्याचें परम साध्य आहे असा होत्साता) सर्व कर्में अंतःकरणानें माझ्या ठिकाणीं समर्पण करून बुद्धियोगाचा आश्रय करून, नेहमीं माझ्या (परमेश्वराच्या) ठिकाणीं चित्त ठेवणारा हो.

[ परमात्मस्वरूप म्हणजे अमृतत्व प्राप्त करून घेणें हें मनुष्याचें परम श्रेय होय, व तें संपादन करण्यासाठीं सर्व कर्में कर्तव्यबुद्धीनें करीत राहून, तीं म्हणजे त्यांचीं फलें परमेश्वरास अर्पण करावीं, अ. २ ते १५ अखेर प्रतिपादन केलेला बुद्धियोग संपादन करावा, व नेहमीं ईशस्मरण ठेवावें, असें येथें भगवंतांनीं अर्जुनास सांगितलें आहे. कर्मांचा स्वरूपतः त्याग सांगितला नाहीं. सारांश, ज्ञानविज्ञानपूर्वक भगवदुपासनार्थ कर्तव्यतत्पर राहून म्हणजे कर्मयोगाचरण करून अमृतत्व प्राप्त करून घेणें हेंच मानवी जन्माचें परम श्रेय होय. भगवंतांनीं हें सर्व गीताशास्त्राचें तात्पर्य अर्जुनास उपदेशिलें आहे. व अ. २, श्लोक ७ यांतील अर्जुनाच्या मूळ प्रश्नाचें निश्चित उत्तर या श्लोकांत भगवंतांनीं सांगितलें आहे.]

संन्यासापेक्षां कर्मयोगांत संकटें अधिक येण्याचा संभव असला तरी तीं संकटें कशीं दूर होतात हें सांगतात—

**मच्चित्तः सर्वदुर्गाणि मत्प्रसादात्तरिष्यसि**
**अथ चेत्त्वमहंकारान्न श्रोष्यसि विनंक्ष्यसि** ५८

**मच्चित्तः, मत्प्रसादात् सर्वदुर्गाणि तरिष्यसि । अथ, अहकांरात् न श्रोष्यसि चेत् विनंक्ष्यसि ।**

माझें (परमेश्वराचें) स्मरण करीत राहिलास म्हणजे, माझ्या (परमेश्वराच्या) प्रसादानें (कर्मयोगांतील) सर्व संकटांतून पार पडशील. असें असतां, जर तूं (हा उपदेश) दुरभिमानानें ऐकला नाहींस, तर नाश पावशील.

[ कर्मयोगी पुरुष भगवत्परायण असल्यामुळें, त्याच्यावर शारीरिक किंवा मानसिक कोणतींही संकटें आलीं तरी, तीं परमेश्वरकृपेनें दूर होतात. अहंकाराच्या भरीं पडून ह्या मोक्षप्रद कर्मयोगाचा त्याग करणें म्हणजे आत्मघात करून घेणें होय.]

अर्जुनानें अहंकारयुक्त बुद्धीनें ( वैयक्तिक संकुचित दृष्टीनें ) प्रथम ठरविलेला कर्मसंन्यासाचा निश्चय कसा व्यर्थ होता, तें सांगतात—

**यदहंकारमाश्रित्य न योत्स्य इति मन्यसे**
**मिथ्यैष व्यवसायस्ते प्रकृतिस्त्वां नियोक्ष्यति** ५९

**अहंकारम् आश्रित्य, न योत्स्य इति यत् मन्यसे, एषः ते व्यवसायः मिथ्या । प्रकृतिः त्वाम् नियोक्ष्यति ।**

अहंकाराचा आश्रय करून, “ मी युद्ध करणार नाहीं ” असें जें तूं ठरविलें आहेस, तो तुझा निश्चय व्यर्थ आहे. (कारण) प्रकृति (तुझा स्वभाव) तुला (युद्धाला) प्रवृत्त करील.

**स्वभावजेन कौंतेय निबद्धः स्वेन कर्मणा**
**कर्तुं नेच्छसि यन्मोहात्करिष्यस्यवशोऽपि तत्** ६०

**कौंतेय स्वेन स्वभावजेन कर्मणा निबद्धः (सन्) मोहात् यत् कर्तुम् न इच्छसि, तत् अवशः अपि करिष्यसि ।**

अर्जुना, (क्षत्रियाला) स्वाभाविक असलेल्या स्वतःच्या (शौर्यादि) कर्मानें निबद्ध (प्रवाह–पतित) असणारा तूं, मोहामुळें जें करूं इच्छीत नाहींस, तेंच (कर्म) प्रकृतिपरतंत्र होऊन करशील.

[ अ. २, श्लोक ९ यांत ‘न योत्स्ये’ (मी युद्ध करणार नाहीं) असा जो अर्जुनानें आपला निश्चय प्रदर्शित केला होता, तो कसा व्यर्थ व अशक्य आहे, हें

भगवंतांनीं वरील दोन श्लोकांत दाखविलें आहे सर्व सृष्टि कर्ममय असल्यामुळें स्वाभाविक कर्मांचा त्याग कोणालाही करितां येणें शक्य नाहीं तें शुद्धबुद्धिनियत करणें एवढेंच मनुष्याच्या हातचें आहे, हें पूर्वी अ. ३, श्लोक ५।६ व ३३ यांत सिद्ध केलें आहे. त्यास अनुसरून भगवंतांनीं येथें पुन्हा वरील नियमाचा निष्कर्ष सांगितला आहे. स्वाभाविक कर्मांचा त्याग होणें अशक्य असतां, अज्ञानानें किंवा दुराग्रहानें त्यांचा त्याग करण्यास कोणी प्रवृत्त होईल तर तो अज्ञानी मनुष्य स्वभावाधीन असल्यामुळें, त्याच्या इच्छेविरुद्ध तेंच कर्म त्याच्या हातून घडून जाईल. अर्जुनानें प्रथम ठरविलेला कर्मत्याग अज्ञानमूलक असल्यामुळें युद्ध सुरू झालेलें पाहतांच त्याला आपल्या निश्चयाचा विसर पडून, त्याची इच्छा नसतांही त्याच्याकडून युद्धकर्म घडलें असतें. म्हणजे जें कर्म शुद्धबुद्धिनियमित अर्थात् सात्त्विक व्हावयास पाहिजे होतें, तेंच प्रकृतिपरतंत्र व मोहवश झाल्यामुळें तामस अतएव बंधक झालें असतें. अर्जुनाचें अन्तःकरण उदार होतें व त्याची इच्छादेखील अत्यंत श्रेष्ठ दर्जाची होती हें त्याच्या पहिल्या अध्यायांतील भाषणावरून सहज लक्षांत येतें. परंतु औदार्य व सदिच्छा येवढ्यानेंच कार्य भागत नाहीं. त्याला बुद्धियोगाची जोड असावी लागते. तशी नसल्यामुळें अर्जुन वैयक्तिक दृष्टीनें क्षात्रधर्माचा विचार करूं लागला व त्यामुळें त्याच्या अंगावर रोमांच उभे राहिले. हा विचार करीत असतांना 'मी' ही व्यक्ति अत्यंत शुद्धच असावयास पाहिजे असा संकुचित अहंकार त्याच्या अन्तःकरणांत उत्पन्न झाला होता. आणि त्यामुळेंच उदार व सदिच्छामूलक खरी, पण शास्त्रदृष्ट्या चुकीची, अशी विचारसरणी त्यानें स्वीकारली होती. त्या सर्व दोषांचें निरसन भगवंतांनीं आपल्या अमृतमय वाणीनें येथपर्यंत केलें आहे.]

अ. ३, श्लोक ९ व अ. १५, श्लोक ४ इत्यादि स्थलीं बुद्धि शुद्ध करण्याचीं पूर्वी जीं साधनें सांगितलीं आहेत त्यांचा निष्कर्ष सांगतात—

**ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति**
**भ्रामयन्सर्वभूतानि यंत्रारूढानि मायया ६१**

**अर्जुन, सर्वभूतानि यंत्रारूढानि (इव) मायया भ्रामयन् ईश्वरः सर्वभूतानाम् हृद्देशे तिष्ठति।**

अर्जुना, सर्व पदार्थांना यंत्रावर घातल्याप्रमाणें (आपल्या) अचिंत्य

शक्तीनें फिरविणारा म्हणजे सर्व जगच्चक्र चालविणारा परमेश्वर सर्व प्राण्यांच्या बुद्धीमध्यें असतो.

**तमेव शरणं गच्छ सर्वभावेन भारत**
**तत्प्रसादात्परां शांतिं स्थानं प्राप्स्यसि शाश्वतम् ६२**

**भारत, तम् एव सर्वभावेन शरणम् गच्छ। तत्प्रसादात् पराम् शांतिम् शाश्वतम् स्थानम् प्राप्स्यसि।**

अर्जुना, त्यालाच (त्या बुद्धिस्थ परमेश्वरालाच) संपूर्णत्वानें म्हणजे काया-वाचा-मनानें शरण जा. त्याच्या प्रसादानें तुला परम समाधानवृत्ति व शाश्वतपद (मोक्ष) प्राप्त होईल.

[ अ. १३, श्लोक १७ येथें सांगितल्याप्रमाणें, परमात्मा जरी सर्वत्र भरलेला आहे, तथापि बुद्धि विशेष सूक्ष्म व ज्ञानवाहक असल्यामुळें, त्याची बुद्धीचे ठिकाणीं विशेष प्रतीति असते, म्हणून येथें त्याला बुद्धिस्थ म्हटलें आहे. तो सर्व विश्वाचें उत्पत्तिस्थिति-लयरूप चक्र म्हणजे रहाटगाडगें आपल्या मायेनें (आपल्या अचिंत्य शक्तीनें) चालवितो. सर्व प्राणिमात्र आपापल्या कर्मफलांनीं ह्या जगच्चक्रास बद्ध झालेले असल्यामुळें त्यांना त्या चक्राबरोबर फिरणेंच भाग पडतें. तथापि मानवी प्राण्याला ईश्वरानें इच्छास्वातंत्र्य दिलें असल्यामुळें, ह्या इच्छास्वातंत्र्याचा योग्य उपयोग करून, आपल्या बुद्धीचे ठिकाणीं असणाऱ्या परमेश्वरास अनन्य भावानें शरण जाऊन त्याच्या प्रसादानें बुद्धियोग संपादन केला असतां त्याचा कर्मबंध सुटून त्याला परमशांति व अमृतत्व प्राप्त होतें. श्रीभगवान् म्हणतात अर्जुना, कर्मबंधांतून मुक्त होऊन परमश्रेय संपादन करण्याकरितां तुला (अ. २, श्लोक ४९) बुद्धीचे ठिकाणींच शरण (आश्रयस्थान) हुडकलें पाहिजे (बुद्धिस्थ परमेश्वरास शरण गेलें पाहिजे) म्हणजे त्या परमेश्वराच्या कृपेनें तुला बुद्धियोग प्राप्त होऊन अमृतत्व मिळेल. सारांश, ज्ञानविज्ञानमय भगवद्भक्तीनें नितांत शुद्ध झालेली बुद्धि हीच धर्माधर्मनिर्णयाची निर्दोष व निश्चित कसोटी होय. हा कर्मयोगशास्त्रांतील श्रेष्ठ सिद्धान्त सांगून भगवंतांनीं येथें गीताप्रतिपादित कर्मयोगशास्त्राचा उपसंहार केला आहे.]

**इति ते ज्ञानमाख्यातं गुह्याद्गुह्यतरं मया**
**विमृश्यैतदशेषेण यथेच्छसि तथा कुरु ६३**

**इति मया गुह्यात् गुह्यतरम् ज्ञानम् ते आख्यातम्। एतत् अशेषेण विमृश्य यथा इच्छसि तथा कुरु।**

(अर्जुना) ह्याप्रमाणें गुह्याहून गुह्य (अत्यंत गुह्य) ज्ञान तुला सांगितलें आहे ह्याचा पूर्णपणें विचार करून तुला जसें वाटेल तसें कर.

[ सर्व मानवी प्राण्यांस इच्छास्वातंत्र्य असतें, तथापि त्या इच्छेला ज्ञान-विज्ञानाची जोड मिळेल तरच ते हितपरिणामी होतें; कारण, ज्ञानविज्ञानानें शुद्धबुद्धि झालेल्या पुरुषाच्या अंतःकरणांत भलती इच्छा उत्पन्न होणे शक्य नसतें. म्हणून भगवंतांनीं दुसऱ्या अध्यायापासून आतांपर्यंत अर्जुनास सांगितलेल्या सर्व ज्ञानाचा पूर्ण विचार करून अर्जुनास इच्छेस येईल तें ( म्हणजे संन्यास व कर्मयोग ह्यांपैकीं ) योग्य वाटेल तें करण्यास पूर्ण मुखत्यारी दिली आहे. आतां-पर्यंत प्रतिपादन केलेलें ज्ञानविज्ञान ज्याच्या बुद्धीला पूर्णपणें पटलें आहे, तो कर्मत्यागाच्या भलत्या नादीं न लागतां श्रेष्ठ कर्मयोग मार्गच स्वीकारील अशी भगवंतांची खातरी होती.]

वरील श्लोक ६१।६२ यांत सांगितलेलेंच तत्त्व अधिक सुलभ रीतीनें सांगण्या-करितां भगवान् म्हणतात—

**सर्वगुह्यतमं भूयः शृणु मे परमं वचः**
**इष्टोऽसि मे दृढमिति ततो वक्ष्यामि ते हितम्** ६४

**मे सर्वगुह्यतमम् परमम् वचः भूयः शृणु। मे दृढम्, इष्टः असि, इति ततः ते हितम् वक्ष्यामि।**

(अर्जुना) माझें सर्व गुह्यांतील श्रेष्ठ गुह्य (रहस्य) असें उत्कृष्ट वाक्य आणखी ऐक. (तूं) माझा जिवलग मित्र आहेस, म्हणूनच तुला मी हितगुज सांगतों.

**मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु**
**मामेवैष्यासि सत्यं ते प्रतिजाने प्रियोऽसि मे** ६५

**मन्मनः मद्भक्तः, मद्याजी भव माम् नमस्कुरु। माम् एव एष्यसि, ते सत्यम् प्रतिजाने मे प्रियः असि।**

तूं माझ्या (परमेश्वराच्या) ठिकाणीं मन ठेवणारा म्हणजे परमे-श्वरप्राप्तीचा हेतु धरणारा, माझी भक्ति करणारा व माझी उपासना

करणारा हो; आणि मलाच नमस्कार कर. (म्हणजे) तूं मलाच (परमेश्वरालाच) प्राप्त होशील, हें तुला प्रतिज्ञेनें खरें सांगतों. (कारण) तूं मला प्रिय आहेस. (माझें प्रेम तुजवर आहे.)

**सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज**
**अहं त्वां सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः** ६६

**सर्वधर्मान् परित्यज्य माम् एकम् शरणम् व्रज । अहम् त्वाम् सर्व-पापेभ्यः मोक्षयिष्यामि, मा शुचः ।**

(इतर) सर्व धर्म म्हणजे मोक्षप्राप्तीचीं साधनें संपादन करण्याचा खटाटोप सोडून, तूं मला एकट्यालाच (परमेश्वरालाच) शरण जा. (म्हणजे) मी तुला सर्व पातकांपासून (कर्मबंधापासून) मुक्त करीन, काळजी करूं नको.

[ बुद्धिस्थ परमात्म्यास शरण जाऊन त्याची अव्यक्त उपासना करण्यापेक्षां, त्याच परमात्म्याच्या व्यक्त स्वरूपाची उपासना करणें सुलभ असल्यामुळें, भगवंतांनीं येथें अर्जुनाला व्यक्तोपासना म्हणजे भक्तिमार्ग सांगितला आहे. कोणत्याही प्रकारानें भगवदुपासना केली तरी मनुष्य बंधमुक्त होतो. ह्या दोन्ही उपासनामार्गांचें तत्त्व व फल निःश्रेयस हें एकच आहे.]

ह्या गीताप्रतिपादित ज्ञानविज्ञानयुक्त भगवद्भक्तिप्रधान कर्मयोगाची परंपरा कशी चालू ठेवावी तें सांगतात.

**इदं ते नातपस्काय नाभक्ताय कदाचन**
**न चाशुश्रूषवे वाच्यं न च मां योऽभ्यसूयति** ६७

**इदं ते अतपस्काय न, अभक्ताय न, च अशुश्रूषवे न, च माम् यः अभ्यसूयति (तस्मै) कदाचन न वाच्यम् ।**

हें गीताशास्त्र तूं (कायिक, वाचिक, मानसिक) तपाचरण (नियमित आचरण) न करणाऱ्या, भक्तिहीन अंतःकरणाच्या पुरुषाला, ज्याला हें श्रवण करण्याची इच्छा नाहीं त्याला आणि जो माझा (परमेश्वराचा) मत्सर करितो त्याला (नास्तिकाला) कधींही सांगूं नये.

[ तपाचरण म्हणजे अ० १७ श्लो. १४।१५।१६ यांत सांगितलेलें कायिक,

वाचिक, मानसिक, सात्त्विक आचरण होय. ह्याप्रमाणें श्रद्धावान्, जिज्ञासू, तपस्वी व भक्तिमान् पुरुष गीताशास्त्राचे अधिकारी होत. त्यांसच हें शास्त्र सांगावें. ज्यांच्या ठिकाणीं वरील गुण नसतील, त्यांस तें सांगूं नये.]

ही शास्त्रपरंपरा चालविणारास काय फलप्राप्ति होते, तें सांगतात—

**य इदं परमं गुह्यं मद्भक्तेष्वभिधास्यति**
**भक्तिं मयि परां कृत्वा मामेवैष्यत्यसंशयः** ६८

**यः असंशयः (सन्) मयि पराम् भक्तिम् कृत्वा मद्भक्तेषु इदम् परमम् गुह्यम् अभिधास्यति, (सः) माम् एव एष्यति।**

जो निःसंदिग्ध ज्ञानी, माझ्या (परमेश्वराच्या) ठिकाणीं श्रेष्ठ भक्ति ठेवून, माझ्या (भगवंताच्या) भक्तांमध्यें हें परमगुह्य (गीताशास्त्र) सांगेल म्हणजे त्याची चर्चा करील, तो मलाच (परमेश्वरालाच) खचित प्राप्त होईल.

**न च तस्मान्मनुष्येषु कश्चिन्मे प्रियकृत्तमः**
**भविता न च मे तस्मादन्यः प्रियतरो भुवि** ६९

**मनुष्येषु तस्मात् कश्चित् मे प्रियकृत्तमः न च, भुवि तस्मात् अन्यः मे प्रियतरः न भविता च।**

सर्व मनुष्यांमध्यें ह्या गीताशास्त्र सांगणाऱ्या पुरुषाहून माझें अत्यंत प्रिय करणारा कोणीही नाहीं. आणि ह्या जगांत त्या पुरुषाहून अधिक प्रियकर मला दुसरा कोणीही होणार नाहीं.

**अध्येष्यते च य इमं धर्म्यं संवादमावयोः**
**ज्ञानयज्ञेन तेनाहमिष्टः स्यामिती मे मतिः** ७०

**च, यः आवयोः इमम् धर्म्यम् संवादम् अध्येष्यते तेन अहं ज्ञानयज्ञेन इष्टः स्याम् इति मे मतिः।**

आणि जो पुरुष आम्हां उभयतांच्या धर्मसंवादाचें अध्ययन (अभ्यास) करील त्यानें माझी ज्ञानयज्ञाच्या योगानें उपासना केली, असें मी समजतों.

**श्रद्धावाननसूयश्च शृणुयादपि यो नरः**
**सोऽपि मुक्तः शुभाँल्लोकान्प्राप्नुयात्पुण्यकर्मणाम्** ७१

**अपि च, यः श्रद्धावान् अनसूयः नरः शृणुयात् सः अपि मुक्तः (सन्) पुण्यकर्मणाम् शुभान् लोकान् प्राप्नुयात्।**

आणखी, जो श्रद्धावान् व असूयारहित (सरलहृदयी) पुरुष (हा कृष्णार्जुनसंवाद) श्रवण करील, तो देखील (कर्मबंधनांतून मुक्त होऊन) पुण्यकर्मी पुरुषांच्या (त्यांना प्राप्त होणाऱ्या) शुभलोकांस प्राप्त होईल (त्यांस सद्गति मिळेल).

[ श्रद्धावान् जिज्ञासु भगवद्भक्त मंडळींत ह्या गीताशास्त्राची चर्चा करणें, त्या शास्त्राचें अध्ययन करणें व श्रवण करणें हें श्रीभगवंतास अत्यंत प्रिय होतें. कारण, त्याची ही ज्ञानमय उपासनाच होय. ह्या उपासनेनें बुद्धियोग पूर्ण होऊन त्यांना अमृतत्व प्राप्त होतें.]

येथपर्यंत सांगितलेलें गीताशास्त्र श्रवण करून परमश्रेय कोणतें व तें संपादन करण्याचा प्रशस्त मार्ग कोणता, हें अर्जुनाला समजलें आहे कीं नाहीं ह्याचा खुलासा करून घेण्याकरितां भगवान् त्याला विचारितात—

**कच्चिदेतच्छ्रुतं पार्थ त्वयैकाग्रेण चेतसा**
**कच्चिदज्ञानसंमोहः प्रणष्टस्ते धनंजय ७२**

**पार्थ, त्वया एकाग्रेण चेतसा एतत् श्रुतम् कच्चित्? धनंजय, ते अज्ञानसंमोहः प्रणष्टः कच्चित्?**

अर्जुना, तूं एकाग्र चित्तानें हें (गीताशास्त्र) ऐकिलेंस ना? आणि (त्याच्या योगानें) हे धनंजया, तुझा अज्ञानमोह नष्ट झाला ना?

[ क्षत्रिय या नात्यानें युद्ध करणें हा जसा आपला धर्म आहे, त्याप्रमाणेंच गृहस्थ या नात्यानें आपल्या कुटुंबाचें संरक्षण करणें हा देखील आपला धर्मच आहे. हे दोन्ही धर्म एकमेकांच्या विरुद्ध उभे राहिल्यावर क्षात्रधर्माचें आचरण करून आपल्या घराण्याचा नायनाट करून घेण्यापेक्षां गृहस्थधर्मास अनुसरून आपल्या घराण्याचा बचाव करणेंच अधिक श्रेयस्कर होय, म्हणजे या वेळीं वर्ण-धर्मापेक्षां आश्रमधर्मच अधिक कल्याणकारक आहे, अशी अर्जुनाची प्रथम समजूत झाली व या समजुतीनें तो विचार करूं लागला असतां आपल्या ऐहिक व पारमार्थिक कल्याणाकरितां सुद्धां युद्धासारखे घोर कर्माचाच काय, पण सामान्यतः कर्माचा त्यागच आपल्याला अधिक श्रेयस्कर होईल; असें सांख्य मार्गाप्रमाणें

म्हणजे संन्यास मार्गाप्रमाणें त्याला वाटलें व राष्ट्रधर्मापेक्षां व्यक्तिधर्म अधिक श्रेष्ठ असें त्यानें ठरविलें, हेंच अर्जुनाचें अज्ञान होय. या चुकीच्या विचारसरणीनेंच त्यानें आपलें म्हणणें मांडलें होतें, आणि रक्तपातासारख्या भयंकर कर्मापेक्षां निरुपद्रवी संन्यासमार्ग कल्याणकारक आहे, अशी त्याच्या मनाची समजूत झाली होती. परंतु कर्माचा बरेवाईटपणा त्या कर्माच्या बाह्य स्वरूपावर व त्याच्या दृश्यादृश्य परिणामांवरच अवलंबून आहे, अशी जी अर्जुनाची प्रथम समजूत होती, ती अज्ञानमूलक होती. अशा गैरसमजुतीनेंच त्याला कर्तव्यपराङ्मुख होण्याचा मोह उत्पन्न झाला होता; परंतु ज्ञानविज्ञानयुक्त शुद्ध बुद्धि हीच कर्तव्या-कर्तव्यनिर्णयाची खरी कसोटी होय, हें कर्मयोगशास्त्रांतलि मुख्य तत्त्व भगवंतांनीं पूर्णपणें समजून दिलें असल्यामुळें आतां तरी तुझें अज्ञान व तज्जन्य मोह नाहींसा झाला कीं नाहीं, असें भगवंतांनीं अर्जुनाला प्रेमानें विचारिलें आहे.]

**अर्जुन उवाच—**

**नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा त्वत्प्रसादान्मयाच्युत**
**स्थितोऽस्मि गतसंदेहः करिष्ये वचनं तव ७३**

अच्युत, त्वत्प्रसादात् मोहः नष्टः, मया स्मृतिः लब्धा, गतसंदेहः स्थितः अस्मि। तव वचनम् करिष्ये।

अर्जुन म्हणाला—श्रीकृष्णा, तुमच्या कृपेनें माझा (अज्ञानजन्य) मोह नष्ट झाला, आणि (कर्तव्य) ज्ञान जागृत झालें. आतां मी संशय-रहित झालों आहें. तुमचें वचन म्हणजे आतांपर्यंत प्रतिपादन केलेल्या कर्मयोगाचें आचरण मी करीन (करण्यास तयार आहें).

[ शुद्ध बुद्धिनियत कर्म बंधक होत नसून मोक्षानुकूल होतें, हें तत्त्व अर्जुनास पूर्णपणें पटलें म्हणून तो ज्ञानविज्ञानमय भक्तियुक्त अंतःकरणानें कर्मयोगाचरण ( प्राप्तकर्म ) करण्यास तयार झाला. अर्जुनाच्या वरील सूत्रमय वाक्यांत बराच अर्थ भरला आहे. भगवान् श्रीकृष्णांनीं वैदिक धर्माचें जें रहस्य अर्जुनास उपदेशिलें आहे, तें अगदींच नवीन असें त्याला वाटलें नाहीं हें त्याच्या वाक्यावरून सिद्ध होतें. त्याप्रमाणें अमृतत्व हेंच मानवी जीविताचें अंतिम साध्य असून योगयुक्त बुद्धीनें वर्णधर्माचें आचरण करणें हेंच अमृतत्वाचें उत्तम साधन होय असें त्याच्या बुद्धीला पूर्णपणें पटलें. वर्णधर्मापेक्षां आश्रमधर्म श्रेष्ठ नसून तो

आश्रमधर्म व्यक्तीचें सामर्थ्य वाढवितो व त्या योगानेंच व्यक्ति, वर्णधर्मांचें शुद्ध आचरण करण्यास पात्र होते. अशी ही वर्णाश्रमधर्मांची रचना अन्योन्य-पोषक असून व्यक्तीला व राष्ट्राला अत्यंत कल्याणकारक आहे. अथात् योगयुक्त बुद्धीनें क्षात्रधर्माचें आचरण करणें हेंच आपल्या सारख्या अभिजात क्षत्रियाला निश्चित श्रेयःसाधन होय अशी त्याची खात्री झाली आणि हें त्यानें कृतज्ञतापूर्वक बोलून दाखविलें.]

ह्याप्रमाणें कृष्णार्जुनसंवाद सांगितल्यावर संजय धृतराष्ट्रास पुढें म्हणतो—

**संजय उवाच—**

**इत्यहं वासुदेवस्य पार्थस्य च महात्मनः**
**संवादमिममश्रौषमद्भुतं रोमहर्षणम्** ७४

**इति महात्मनः वासुदेवस्य पार्थस्य च इमम् अद्भुतम् रोमहर्षणम् संवादम् अहम् अश्रौषम् ।**

संजय म्हणाला—(हे राजा धृतराष्ट्रा) ह्याप्रमाणें महात्मा भगवान् वासुदेव व अर्जुन यांचा हा आश्चर्यकारक आणि रोमांच उभे करणारा संवाद मीं ऐकला.

**व्यासप्रसादाच्छ्रुतवानेतद्गुह्यमहं परम्**
**योगं योगेश्वरात्कृष्णात्साक्षात्कथयतः स्वयम्** ७५

**स्वयम् योगम् कथयतः साक्षात् योगेश्वरात् कृष्णात् अहम् व्यास-प्रसादात् एतत् परम् गुह्यम् श्रुतवान् ।**

स्वतः कर्मयोग कथन करणाऱ्या साक्षात् योगेश्वर (सर्व योगांचा प्रभु) कृष्णापासून मीं व्यास महर्षींच्या कृपेनें हें परम श्रेष्ठ रहस्य ऐकिलें.

**राजन्संस्मृत्य संस्मृत्य संवादमिममद्भुतम्**
**केशवार्जुनयोः पुण्यं हृष्यामि च मुहुर्मुहुः** ७६

**राजन् केशवार्जुनयोः इमम् पुण्यम् अद्भुतम् संवादम् संस्मृत्य संस्मृत्य मुहुः मुहुः हृष्यामि च ।**

आणि हे राजा, कृष्णार्जुनांचा हा पवित्र व आश्चर्यकारक संवाद वारंवार आठवून मला पुनःपुन्हा हर्ष होत आहे.

**तच्च संस्मृत्य संस्मृत्य रूपमत्यद्भुतं हरेः**
**विस्मयो मे महान् राजन् हृष्यामि च पुनः पुनः ७७**

च राजन् तत् हरेः अत्यद्भुतम् रूपम् संस्मृत्य संस्मृत्य मे महान् विस्मयः ( भवति ) पुनः पुनः हृष्यामि च ।

आणि राजा, तें श्रीकृष्णाचें दिव्य विश्वरूप वारंवार आठवून, मला मोठा विस्मय वाटतो; आणि वरचेवर हर्षही होतो.

**यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः**
**तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम ७८**

यत्र योगेश्वरः कृष्णः, यत्र धनुर्धरः पार्थः तत्र ध्रुवा श्रीः, विजयः, भूतिः, नीतिः ( इति ) मम मतिः ॥

(राजा,) ज्या पक्षाला सर्व योगाचा प्रभु श्रीकृष्ण भगवान् आहे, आणि ज्या पक्षाला धनुर्धारी (पराक्रमी) अर्जुन आहे, त्याच पक्षाला (पांडवांना) शाश्वत लक्ष्मी, विजय, ऐश्वर्य व नीति ( धार्मिक नीति ) आहे असें माझें मत आहे.

[ भगवान् श्रीकृष्ण व पराक्रमी अर्जुन यांची जोडी, म्हणजे प्रत्यक्ष ज्ञान व कर्तव्यनिष्ठा यांची, अर्थात् गीताप्रतिपाद्य कर्मयोगाची मूर्तिच होय. हा कर्मयोग मोक्षदायक असल्याचें, पूर्वीं अनेक वेळां सिद्ध झालें आहे. त्याचप्रमाणें तो अभ्युदयकारकही आहे, म्हणजे अभ्युदय हें मोक्षाचें वहिरंग किंवा बाह्य स्वरूप आहे, असें येथें संजयाच्या मुखानें श्रीवेदव्यासांनीं स्पष्ट सांगितलें आहे. ह्यावरून अभ्युदय व निःश्रेयस यांचा परस्परांशीं विरोध नसून, स्थितप्रज्ञ कर्मयोगी पुरुषाचा मोक्षमार्ग अभ्युदयकारक असतो, असें उघड सिद्ध होतें. एकंदर गीताशास्त्राच्या दृष्टीनें या श्लोकांचें महत्त्व फार आहे. आणि याच अभिप्रायानें व्यास महर्षींनींही हा श्लोक संजयाच्या तोंडीं घालून एकंदर गीताशास्त्रावर दैदीप्यमान असा सुंदर कळसच चढविला आहे असें मानण्यास हरकत नाहीं. अभ्युदयाविषयीं अनेक ग्रन्थकारांनीं नानाप्रकारच्या कल्पना प्रदर्शित केल्या असल्यामुळें लोकांत त्याविषयीं गैरसमज झाला असल्यास त्यांत फारसें नवल नाहीं. परंतु प्रस्तुत श्लोकांत गीताशास्त्रानें अभ्युदयाचें स्वरूप निश्चित केलें आहे. संपत्ति, यश, सत्ता व धार्मिक नीति या चार गोष्टींचा समुदाय म्हणजे अभ्युदय होय. 'यत्र' या पदानें समाज

हेंच अभ्युदयाचें मुख्य अधिष्ठान असें सुचविलें आहे. म्हणजे अभ्युदयाचा विचार करतांना व्यक्तीला प्राधान्य न देतां तें समाजास द्यावयास पाहिजे; त्याप्रमाणेंच मोक्षाच्या स्वरूपाचा विचार केल्यास तेथें समाजापेक्षां व्यक्ति हेंच मोक्षाचें अधिष्ठान आहे, असेंच कबूल करावें लागतें. ज्याप्रमाणें व्यक्ती व समाज यांचा अनुकूल संबंध असावा लागतो, त्याचप्रमाणें अभ्युदय व निश्रेयस यांत देखील वैदिक धर्मानें अन्योन्यपोषकता ठेविली आहे. यावरून कर्मयोग समाजाला अभ्युदय-कारक व व्यक्तीला मोक्षदायक असतो, असें लक्षांत ठेविल्यास अभ्युदय व निश्रेयस यांतील गीताशास्त्रानें लावलेली योग्य व्यवस्था चांगलीच दिसून येते. अभ्युदयाच्या स्वरूपांत संपत्तीचा ठसठशीत समावेश केला आहे. यावरून संपत्ति ही परमार्थाला विघातक आहे हें म्हणणें गीताशास्त्रास मुळींच मान्य नाहीं असें ठरतें व हा सिद्धान्त उपनिषदांनाही मान्य आहे ( तै. भृ. व. उत्तरार्ध पहा). त्याचप्रमाणें सत्ता (अधिकार) किंवा प्रभुत्व हा गुण देखील परमार्थास मुळींच बाधक होत नाहीं. संपत्ति काय किंवा सत्ता काय यांचा योग्य उपयोग केल्यास तीं अभ्युदयाप्रमाणें निश्रेयसाचीं साधनेंच होतात.

या श्लोकांतील नीतीला 'ध्रुवा' असें विशेषण दिलें आहे. ध्रुव शब्दाचा शाश्वत असा अर्थ होतो. त्यावरून शाश्वत कल्याणाला उपयोगी पडणारी नीति असा अर्थ विवक्षित आहे. आणि असा अर्थ दर्शविण्याकरितांच आम्ही धार्मिक नीति असा शब्द श्लोकाच्या अर्थांत दिला आहे.

सारांश, व्यक्ति व समाज यांना अत्यंत कल्याणकारक असें वैदिक धर्माचें संपूर्ण तात्त्विक स्वरूप प्रस्तुत श्लोकांत सांगून व्यास महर्षींनीं हें गीताशास्त्र पूर्ण केलें आहे.]

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुन-संवादे मोक्षसंन्यासयोगो नाम अष्टादशोऽध्यायः ।**

ह्याप्रमाणें श्रीभगवंतांनीं गाइलेल्या उपनिषदांतील ब्रह्मविद्यांतर्गत कर्मयोग-शास्त्राविषयींच्या श्रीकृष्ण व अर्जुन यांच्या संवादांतील **'मोक्षसंन्यासप्रकरण'** नांवाचा अठरावा अध्याय समाप्त झाला.

# अठराव्या अध्यायाचा उपसंहार

## अठराव्या अध्यायाची अनुक्रमणिका.



कर्मसंन्यास व कर्मफलत्याग यांतील तात्त्विक भेद अर्जुनानें पहिल्या श्लोकांत

विचारिल्यावरून, हेतुपुरःसर घडणारें प्रत्येक कर्म काम्य होय असें मानून, सर्व कर्मांचा त्याग करणें हा संन्यास होय, व कोणतेंही कर्म निष्काम बुद्धीनें करीत असतां, त्या कर्माच्या फलाविषयीं उपभोगवासना न ठेवणें हा त्याग होय, असें भगवंतांनीं दुसऱ्या श्लोकांत उत्तर दिलें आहे. नंतर तिसऱ्या श्लोकांत पुनः त्याच अर्थाचें स्पष्टीकरण करून, श्लोक ४।५।६ यांत यज्ञ, दान, तपःस्वरूप कर्मे, म्हणजे भगवदुपासनेच्या उद्देशानें शुद्धबुद्धिनियत कर्म, देशकाल व पात्रापात्रविचारपूर्वक परोपकार आणि कायिक, वाचिक व मानसिक नियमिताचरण, हीं कर्मे जगतास पवित्र करणारीं असल्यामुळें, तीं न सोडितां अवश्य केलीं पाहिजेत, असें भगवंतांनीं आपलें निश्चित व उत्तम मत स्पष्ट सांगितलें आहे. यावरून, श्रीभगवंतांच्या मतें संन्यासापेक्षां कर्मयोगच प्रशस्त असल्यामुळें, त्याचें प्रत्येकानें अवश्य आचरण केलें पाहिजे, असें सिद्ध होतें. नंतर ७।८।९ ह्या तीन श्लोकांत त्यागाचे सात्त्विक, राजस व तामस असे तीन प्रकार सांगून, १० व्या श्लोकांत सात्त्विक त्यागाचें महत्त्व वर्णन केलें आहे. पुढें श्लोक ११ ते १८ अखेर कर्ममीमांसाप्रकरणांत कर्मांचा पूर्णपणें त्याग करितां येणें अशक्य असल्याचें प्रथम दाखवून, नंतर कर्मांचीं इष्ट, अनिष्ट व मिश्र (कांहीं अंशीं इष्ट व कांहीं अंशीं अनिष्ट) अशीं त्रिविध फलें अत्यागी म्हणजे ज्याच्या उपभोगवासना नष्ट झाल्या नाहींत त्याला मात्र प्राप्त होतात, परंतु कर्मफलत्यागी स्थितप्रज्ञाला हा कर्मफलांचा कोणत्याही प्रकारचा बंध लागत नाहीं असें सांगून कोणतेंही कर्म घडण्याचीं पांच कारणें कोणतीं असतात तें सांगितलें आहे. खरोखर या कारणसमुच्चयाकडे पाहिलें असतां, आत्मा हाच कर्ता आहे असें मानणें हें अज्ञान होय, असें सिद्ध केलें आहे. ज्याचा अहंकार नष्ट होऊन बुद्धि निर्मल झालेली असते त्याला कोणत्याही कर्मापासून बंध उत्पन्न होत नाहीं असा सिद्धान्त सांगून नंतर कर्माची चोदना म्हणजे प्रेरणा व कर्माचा संग्रह म्हणजे स्वरूप तीन प्रकारचें सांगून, पूर्वी ठिकठिकाणीं आलेल्या कर्ममीमांसेचा उपसंहार केला आहे. त्यानंतर ज्ञान, कर्म व कर्ता यांचे सांख्यशास्त्राप्रमाणें तीन भेद कसे होतात तें सांगण्याकरितां १९ व्या श्लोकांत प्रस्तावना करून, २० ते २८ अखेर नऊ श्लोकांत त्यांचे सात्त्विक, राजस व तामस प्रकार सांगितले आहेत. नंतर २९ व्या श्लोकांत बुद्धि व धृति (धारणा) यांच्या भेदाची प्रस्तावना करून ३० ते ३५ अखेर सहा श्लोकांत त्यांचे निरनिराळे प्रकार दाखविले आहेत. पुढें ३६ ते

३९ अखेर चार श्लोकांत सुखाचेही तीन प्रकार सांगून ४० व्या श्लोकांत ह्या प्रकरणाचा उपसंहार केला आहे. त्यावरून त्याग, ज्ञान, कर्म, कर्तृत्वबुद्धि, धृति व सुख हीं ज्याचीं पूर्ण सात्त्विक झालीं, तोच अ. २, श्लोक ४५ यांत सांगितलेल्या बुद्धियोगाच्या पांची अंशांनीं पूर्ण झालेला स्थितप्रज्ञ कर्मयोगी होय, असें सिद्ध केलें आहे. नंतर ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांच्या स्वाभाविक गुणांवरून त्यांच्या त्यांच्या कर्मांचे वेगवेगळे विभाग कसे होतात, हे श्लोक ४१ ते ४४ अखेर दाखवून या चातुर्वर्ण्याचीं स्वभावविहित कर्मे म्हणजे वर्णधर्म स्वतःच्या व जगताच्या धारणपोषणास अवश्य असून तीं भक्तियुक्त शुद्ध अंतःकरणानें आचरण करण्यांत तत्पर राहिल्यास तीच परमेश्वराची श्रेष्ठ आराधना होते व त्या योगानेंच मनुष्यास भगवत्प्राप्ति होते असें श्लोक ४५।४६ यांत सांगितलें आहे. यावरून वर्णविहित कर्मे करण्यांत तत्पर असणाऱ्या स्थितप्रज्ञास आपलें कर्म भगवदुपासनार्थच आहे हें तत्त्व पटल्यावर ईश्वरप्राप्तीकरितां आपलें कर्म सोडून निराळें कांहीं तरी करण्याची त्याला गरज रहात नाहीं हें उघड आहे. स्वतःचें कर्म वाईट व इतरांचें कर्म चांगलें, अशा गैरसमजुतीनें स्वकर्माचा त्याग करणें योग्य नसून, तें शुद्ध बुद्धीनें करीत रहाणेंच अधिक श्रेयस्कर होय. कारण, दोषच पाहूं लागल्यास कोणत्याही कर्मांत कांहीं तरी दोष आढळल्यावांचून राहणार नाहीं, म्हणून स्वकर्म दिसण्यांत जरी हीन किंवा कष्टकारक असलें तरी तें शुद्ध बुद्धीनें करीत असल्यास, तेवढ्यामुळेंच त्याला कमीपणा येणार नाहीं. कारण, कर्माची योग्यता कर्माच्या बाह्य स्वरूपावरच केवळ अवलंबून नसून, ती कर्त्याची बुद्धिमत्ता, विद्वत्ता व कर्तृत्वशक्ति इत्यादि गुणांवर अवलंबून असते असें श्लोक ४७।४८ यांत प्रतिपादन केलें आहे. यावरून व्यक्तिधर्मापेक्षां किंवा कुळधर्मापेक्षां वर्णधर्म म्हणजे राष्ट्रधर्म श्रेष्ठ आहे असें ठरतें व हा राष्ट्रधर्म योगयुक्त बुद्धीनें आचरिल्यानेंच मनुष्यास परमेश्वरप्राप्ति होते. म्हणून योगयुक्तबुद्धिपूर्वक क्षात्रधर्माचें आचरण हाच तुझा निश्चित श्रेष्ठ मार्ग होय असें भगवान् श्रीकृष्णांनीं अर्जुनास सांगितलें आहे. नंतर ४९ व्या श्लोकांत योगनिष्ठेच्या उपसंहाराची प्रस्तावना करून, श्लोक ५० ते ५६ अखेर उपसंहाराधिकरणांत, (अ. २, श्लोक ११ ते १५ अखेर) उपक्रमाधिकरणांत सूचित केलेल्या व अ. २, श्लोक ४५ यांत निर्दिष्ट केलेल्या बुद्धियोगाच्या पांच अंशांचें वर्णन करून, असा बुद्धियोगयुक्त पुरुष शोकमोहरहित व प्रसन्नचित्त होत्साता ज्ञान-विज्ञानमय भक्तीनें

सर्व कर्मे बुद्धिनियत करीत राहतो, व भगवत्कृपेनें अमृतत्वाला प्राप्त होतो, असें सांगितलें आहे. नंतर श्लोक ५७ व ५८ चा पूर्वार्ध, यांत या बुद्धियोगाचा अर्जुनाला पुनः उपदेश केला आहे. पुढें श्लोक ६० अखेर प्रकृतिवश होऊन कोणतेंही कर्म करण्यापेक्षां, तें शुद्धबुद्धिनियत करणेंच अधिक श्रेयस्कर होय असें असतां तूं अहंकाराच्या नादीं लागून प्रकृतिवश होशील तर, तुझा नाश होईल, असें बजाविलें आहे. नंतर श्लोक ६१ व ६२ यांत सर्वजगच्चालक परमात्मा सर्वांच्या बुद्धींत वास करीत आहे त्यालाच तूं शरण जा, म्हणजे त्याच्या कृपेनें तुझें चित्त शान्त होऊन, तुला अमृतत्वाची प्राप्ति होईल, असा भक्तिमार्गदृष्टया बुद्धियोगाचाच पुनः उपसंहार करून, ६३ व्या श्लोकांत "ह्या सर्व गीताशास्त्राचा विचार करून, तुझ्या बुद्धीस योग्य वाटेल तें कर" अशी अर्जुनास मोकळीक देऊन त्याचें बुद्धिस्वातंत्र्य कायम ठेविलें आहे. पुढील तीन श्लोकांत पुनः श्लोक ६१ व ६२ यांतील तत्त्वच भगवद्भक्तीच्या स्वरूपानें स्पष्ट करून, "मी श्रीकृष्ण, तुला सर्व पातकांतून मुक्त करण्यास तयार आहें, यासाठीं तूं शोकमोहाचा त्याग करून मला शरण ये व कर्तव्यतत्पर हो," असें अर्जुनास आश्वासन दिलें आहे. नंतर ह्या गीताशास्त्राचे अधिकारी कोण, व अनधिकारी कोण हें सांगून, अधिकारी मनुष्यांच्या द्वारें ह्या गीताशास्त्राची परंपरा कायम राखणें किती कल्याणकारक व भगवंतांस प्रिय आहे, हें श्लोक ६७ ते ७१ अखेर सांगितलें आहे, व शेवटीं ७२ व्या श्लोकांत, 'ह्या गीताशास्त्राच्या एकाग्र श्रवणानें तुझा अज्ञानमय मोह नष्ट झाला काय?' असा भगवंतांनीं अर्जुनास प्रश्न केल्यावरून, ७३ व्या श्लोकांत अर्जुनानें, 'माझा मोह आपल्या कृपेनें नष्ट झाला असून माझी बुद्धि शुद्ध झाली आहे व आतां मी योगयुक्त अंतःकरणानें कर्तव्यतत्पर होण्यास सिद्ध आहें' असें उत्तर देऊन सर्व संवादाचा समारोप केला आहे.

यानंतर पुढील ७४ ते ७७ अखेर ४ श्लोकांत संजयानें आपल्याला व्यासमहर्षींच्या प्रसादानें समजलेल्या गीताशास्त्राचें महत्त्व अत्यंत उल्लसित अंतःकरणानें वर्णन करून शेवटीं ७८ व्या श्लोकांत जेथें योगेश्वर भगवान् श्रीकृष्ण व कर्तृत्वशाली अर्जुन, म्हणजे पूर्ण ज्ञान व कर्तव्यनिष्ठा यांचें साहचर्य असेल, तेथेंच ऐश्वर्य, यश, वैभव व न्याय यांचें वास्तव्य खचित असणार, असें आपलें निश्चित मत प्रदर्शित केलें आहे. अर्जुनाच्या अंतःकरणांत व्यक्तिधर्माचें संकुचित

विचार उत्पन्न झाले होते, म्हणून त्याची दृष्टि कुलधर्मांच्या पलीकडे जात नव्हती. परंतु भगवान् श्रीकृष्णांनीं गीताशास्त्राच्या दिव्य उपदेशानें त्याच्या बुद्धीवर आलेलें विकारांचें आवरण तात्काळ दूर केलें. अर्जुन अगोदरच सुशील, सुसंस्कृत, सुविद्य आणि कर्तृत्वशाली असा नमुनेबाज आर्य क्षत्रिय होता आणि म्हणूनच भगवंतांच्या मुखांतील अमृतमय उपदेश श्रवण केल्याबरोबर त्याच्या बुद्धीवरील मोहाचें पटल दूर झालें व तो बुद्धियोगसंपन्न झाला, हें ७३ व्या श्लोकांतील त्याच्या उत्तरावरून सहज सिद्ध होण्याजोगें आहे. क्षात्रधर्म किंवा ब्राह्मण-धर्म इत्यादि वर्णधर्म हे राष्ट्रधर्म होत. मनुष्याची बुद्धि ज्या मानानें शुद्ध झाली असेल त्या मानानेंच त्याच्या हातून या धर्मांचें आचरण होईल. ईश्वरोपासनेच्या बुद्धीनें आचरिलेलें वर्णविहित कर्म मोक्षदायक होतें, असें भगवंतांनीं या अध्यायांत सोपपत्तिक सिद्ध केलें आहे. यावरून कर्मयोग हाच राष्ट्रधर्म होय असें ठरतें. सारांश, ज्ञानविज्ञानमय भक्तियुक्त अंतःकरणानें म्हणजे योगयुक्त बुद्धीनें स्वार्थत्यागपूर्वक विहितकर्माचरण म्हणजे 'कर्मयोग' हाच अमृतत्वाचा ( अभ्युदयपूर्वक निःश्रेयसाचा) प्रशस्त मार्ग होय, व जो पक्ष (समाज) अगर व्यक्ति या मार्गाचा स्वीकार करील त्याचें पूर्ण कल्याण होईल असें सांगून संजयानें अध्यायाची परिसमाप्ति केली आहे.



# गीताध्यायसंगति

भगवद्गीतेंतील अध्याय व विषय परस्परविसंगत आहेत असें कित्येकांना वाटतें. परंतु दृढ व्यासंग केला असतां ही समजूत कशी चुकीची आहे तें लौकरच कळून येण्यासारखें आहे. गीतेंतील अध्याय व विषय कसे सुसंबद्ध आहेत हें यापुढें दाखविलें आहे.

पहिल्या अध्यायांत राजांचीं नांवें भारतीय युद्धाची व्यापकता दाखविण्यास कारणीभूत झालीं आहेत व त्यायोगें अर्जुनाच्या पूर्वपक्षाचें महत्त्व चांगलेंच दिसून येतें.

दुसऱ्या अध्यायांत अर्जुनाच्या पूर्वपक्षाचा अनुवाद, त्याच्या शोकनिवारणार्थ भगवंतांनीं सांगितलेलें आत्मज्ञान व त्याच्याच पूर्वपक्षांतील दोषाविष्करण झाल्या-वर ३९व्या श्लोकापासून योगनिष्ठेच्या वर्णनास सुरवात होते. ४५व्या श्लोकांत पुढील सर्व विवेचनाचें बीज सांपडतें.

दुसऱ्या अध्यायाच्या अखेरपर्यंत योगनिष्ठेचें वर्णन आलें आहे. तिसऱ्या अध्यायांत योगनिष्ठेच्या व्यावहारिक स्वरूपाचें म्हणजे कर्मयोगाचें वर्णन असून शेवटीं पापपुण्याच्या व्याख्येवरून निर्द्वंद्वाविष्करण आलें आहे.

चवथ्या अध्यायांत बुद्धियोगाच्या पहिल्या अंशाच्या स्पष्टीकरणाकरितां निस्त्रैगुण्याधिकरण मुख्य असून इतर अधिकरणें व विषय तदनुषंगिक आहेत.

पांचव्या अध्यायांत संन्यास व कर्मयोग यांची तुलना, कर्मयोगाचें विशेषत्व, बुद्धियोगांतील तिसऱ्या अंशाचा खुलासा होण्याकरितां नित्यसत्त्वस्थाधिकरण व तदंगभूत इतर विषयांचें प्रतिपादन आलें आहे.

येथपर्यंत झालेल्या कर्मयोगाच्या विवेचनाचा गोषवारा, अभ्यासाचे दोन प्रकार व त्यांतील साम्ययोगाच्या अभ्यासाचें महत्त्व आणि बुद्धियोगांतील निर्योगक्षेम या अंशाच्या स्पष्टीकरणार्थ आलेलें निर्योगक्षेमाधिकरण हे सहाव्या अध्यायांतील मुख्य विषय होत.

आत्मज्ञान किंवा ज्ञानविज्ञान यांच्या वर्णनाकरितां म्हणजे बुद्धियोगांतील आत्म-वान् या मुख्य अंशाच्या वर्णनाकरितां संपूर्ण सातवा अध्याय आला आहे. ह्या सातव्या अध्यायांतील विवेचनावरूनच अर्जुनानें केलेल्या सात प्रश्नांची सांगोपांग

उत्तरें प्रश्नाच्या उलट क्रमानें यापुढील अध्यायांत म्हणजे ८।९।१०।११।१३। १४।१५ ह्या अध्यायांत आली असून मधला १२ वा अध्याय व्यक्त व अव्यक्त उपासनांच्या तुलनेकरितां आहे.

अध्याय १६।१७।१८ हे विषयाचें सामान्य विवेचन करून उपसंहार पूर्ण व्हावा एतदर्थ आले आहेत.

याप्रमाणे गीताशास्त्राचा सूक्ष्म दृष्टीनें विचार केल्यास त्यांतील अध्यायच काय, पण प्रत्येक वाक्य पूर्ण सुसंबद्ध व अत्यंत सुसंगत असेंच आहे हें कोणासही सहज दिसून येईल.

संवादपद्धतीनें गीताशास्त्राची रचना झाली असली तरी, त्यांतील विवेचनपद्धति ढिली नसून शास्त्राच्या सडेतोडपणास शोभण्यासारखीच आहे. गीतेंतील विषय रचना कशी सुसंगत व आटोपशीर आहे, तें गीतेच्या उपसंहारांत आम्हीं पुढे दाखविलेंच आहे. प्रश्नोत्तरांखेरीज विषयविवेचन कसें सरळ आहे व गीतेमध्यें कृत्रिम वाढ कोठेंही आढळून कशी येत नाहीं, हे दाखविण्याकरितां गीतेचा उपसंहार सरळ, एकमुखी भाषेनें लिहिला आहे.



# भगवद्गीतेचा उपसंहार

श्रीजगदीश्वराच्या कृपेनें 'रहस्यदीपिका' टीका पूर्ण झाली. आतां ह्या प्रकरणांत गीतेंतील विषयसंगति व तात्पर्य थोडक्यांत सांगण्याचें योजिलें आहे.

प्राचीन काळीं हस्तिनापुरचें भारतीय साम्राज्य धृतराष्ट्र राजा आपल्या प्रधान-मंडळाच्या सल्ल्यानें चालवीत असतां, पंडुराजाचे युधिष्ठिरादि पांच पुत्र व धृतराष्ट्राचे दुर्योधनादि शंभर पुत्र, गुरु द्रोणाचार्यांच्या शिक्षणानें, पितामह भीष्मांच्या नजरेखालीं सुशिक्षित होऊन वयांत आल्यावर राजा धृतराष्ट्रानें त्यांना राज्य-कारभाराचें प्रत्यक्ष शिक्षण देण्यास आरंभ केला. त्या वेळीं पांडवांच्या अंगच्या शौर्य, औदार्य, नीतिमत्ता इत्यादि दिव्य सद्गुणांनीं साम्राज्याचा उत्कर्ष होऊं लागला, आणि पांडवांची कीर्ति व लोकप्रियता वृद्धिंगत होऊं लागली. दुर्योधनाचा स्वभाव लहानपणापासूनच अत्यंत अभिमानी व मत्सरी असल्यामुळें, पांडवांचा नाश करण्याकरितां त्यानें विषप्रयोग, लाक्षागृह इत्यादि पुष्कळ अनन्वित कृत्यें केलीं. तथापि सत्याचा वाली परमात्मा असल्या-मुळें, त्याच्या कृपेनें पांडव सर्व संकटांतून पार पडले. पांडवांचा उत्कर्ष दिवसेंदिवस वाढतच चालला, तसतसा दुर्योधनादिकांचा मत्सराग्निही भडकत चालला. ही गोष्ट भीष्मादि वृद्ध मुत्सद्द्यांच्या लक्षांत आल्यावरून, त्यांनीं ह्या आपसांतील दुहीनें होणारे कुलक्षयासारखे अनर्थ टाळण्याकरितां, राज्याचा अर्धा विभाग पांडवांस तोडून दिला. तेव्हां पांडवांनीं इंद्रप्रस्थ येथें आपली राजधानी स्थापन करून राज्यकारभार चालविला. पांडवांच्या उदार व न्यायी वर्तनानें इंद्र-प्रस्थाचें राज्यही अल्पकालांतच भरभराटीस आलें. धर्मराजानें श्रीगोपालकृष्णाच्या व आपल्या पराक्रमी चार बंधूंच्या साह्यानें केलेल्या राजसूय यज्ञांत तर पांडवांच्या उत्कर्षाचा कळसच झाला व दुर्योधनाचा मत्सरही पराकाष्ठेस पोंचला.

पांडवांचा नाश कसा करितां येईल, ह्याच चिंतेंत दुर्योधन राजा रात्रंदिवस निमग्न असतां, त्याचे मामा गांधाराधिपति शकुनी यांनीं पांडवांशीं द्यूतक्रीडा करून त्यांचें राज्य हरण करावें, अशी दुर्योधनास बदसल्ला दिली. क्षत्रियानें युद्धाप्रमाणेंच द्यूताचें आव्हानही नाकारितां कामा नये, अशी त्या वेळीं रूढि होती. मामा द्यूत-क्रीडेंत प्रवीण आहेत, हें दुर्योधनास माहीत असल्यामुळें, त्यानें ती सल्ला तत्काळ

मान्य केली. त्याप्रमाणें कपटद्यूत करून दुर्योधनानें पांडवांचें राज्य हरण केलें आणि त्यांनीं बारा वर्षे वनवास व एक वर्ष अज्ञातवास केल्यावर त्यांचें राज्य त्यांना परत द्यावयाचें असें ठरविलें. ह्या वेळीं साध्वी द्रौपदीला सभेत ओढून आणून तिची विटंबना करण्यासारखे राक्षसी प्रकार करून दुर्योधनादिकांनीं आपल्या दुष्टपणाची पराकाष्ठा केली. परंतु पुण्यश्लोक राजा युधिष्ठिरानें तें सर्वही सहन करून, बारा वर्षे वनवास व एक वर्ष अज्ञातवास पतकरिला. त्या मुदतींत दुर्योधनानें भावी युद्धाची शक्य तितकी तयारी करण्यास कमी केलें नाहीं. यावरून पांडवांनीं आपला करार पुरा केल्यावर देखील त्यांचा राज्यभाग त्यांना परत न देतां, त्यांच्याशीं युद्ध करून त्यांचा पुरा नाश करावयाचा, असा दुर्योधनाचा प्रथमपासून निश्चयच होता हें उघड आहे.

ठरल्याप्रमाणें पांडवांनीं अनेक संकटें व कष्ट सोसून आपलें वचन पुरें केलें. नंतर दुर्योधनाकडे आपल्या राज्यभागाची मागणी केली परंतु ठरलेल्या मुदतीचे अगोदर तीन दिवस आपण पांडवांस ओळखलें आहे, करितां त्यांनीं पुन्हा बारा वर्षे वनवास व एक वर्ष अज्ञातवास करावा, तोंपर्यंत त्यांना राज्य मागण्याचा अधिकार नाहीं, व आपण राज्यभाग देणार नाहीं, पाहिजे तर त्यांनीं युद्ध करण्यास तयार व्हावें, असें दुर्योधनानें उत्तर दिलें. हें कुलक्षयकारक युद्ध होऊं नये म्हणून, भगवान् श्रीकृष्ण, व्यास-नारदादि महर्षि, भीष्म-विदुरादि ज्ञानवृद्ध भगवद्भक्त व प्रत्यक्ष गांधारी ह्या सर्वांनीं पुष्कळ खटपट केली, परंतु ती सर्व व्यर्थ जाऊन, दुर्योधनाच्या दुराग्रहामुळें व धृतराष्ट्राच्या मनोदौर्बल्यामुळें, अखेरीस हें घोर युद्ध व्हावयाचें ठरलें; आणि कौरवांचें अकरा अक्षौहिणी व पांडवांचें सात अक्षौहिणी सैन्य सज्ज होऊन कुरुक्षेत्राच्या समरांगणावर उभें राहिलें.

धृतराष्ट्र जन्मांध असल्यामुळें त्याला समरांगणावर हजर राहून युद्धचमत्कार प्रत्यक्ष पाहतां येणें शक्य नव्हतें; तथापि आपल्याला ह्या युद्धांतील सर्व हकीगत सविस्तर कळावी अशी त्याला उत्कट इच्छा होती, म्हणून व्यासप्रसादानें युद्धाची सविस्तर हकीगत सांगण्यास समर्थ असलेल्या संजयानें धृतराष्ट्राला भारतीय युद्धाचें सविस्तर वर्णन सांगितलें. अर्थात् भगवद्गीताही संजयानेंच धृतराष्ट्राला सांगितलेली आहे.

१. कौरव व पांडव यांचीं सैन्यें समरभूमीवर आपापल्या मिसलीनें उभीं

राहिल्यावर, युद्धास तोंड लागण्यापूर्वी अर्जुनास अशी इच्छा उत्पन्न झाली कीं, एकवार दोन्ही सैन्यांचें एकदम निरीक्षण करून, त्या धोरणानें युद्धाचा कार्यक्रम ठरवावा. म्हणून त्यानें आपला सारथी भगवान् श्रीकृष्ण याला विनंति करून, आपला रथ दोन्ही सैन्यांच्या मध्यभागीं नेऊन उभा करविला. परंतु उभय दळें व त्यांतील प्रमुख योद्धे दृष्टीस पडतांच युद्धक्रम वगैरे निश्चित करण्याची गोष्ट बाजूस राहून, दोन्ही पक्षांत आपले आप्त व स्वजनच उभे असलेले अवलोकन करून व या सर्वांचा लवकरच आपल्या हातून नाश होणार असें मनांत येऊन, अर्जुनाचें अंतःकरण स्वजनप्रेमानें कळवळलें व हें युद्ध करावें कीं नाहीं असा त्याच्या मनांत संशय उत्पन्न झाला. आपल्या उद्देशाशीं हें युद्ध व त्याचे घोर परिणाम अगदींच विसंगत आहेत असें त्याला दिसूं लागलें. त्याचप्रमाणें ह्या युद्धामुळें आपल्या हातून गुरुद्रोह, स्वजनहिंसा, कुलक्षय इत्यादि महापातकें घडणार व तेणें-करून शेवटीं आपणास दुर्गति प्राप्त होणार अशीही अर्जुनाला भीति वाटूं लागली, आणि राज्यलोभाच्या म्हणजे ऐहिक सुखाच्या नादीं लागून, आपण हें महापातक करावयास उद्युक्त झालों, हें अत्यंत अनुचित होय असें म्हणून त्यानें स्वतःचा धिक्कारही करून घेतला. अखेरीस, आपण ह्या युद्धांत सामील व्हावयाचें नाहीं, किंबहुना शत्रूंनीं आपला वध केला तरी आपण त्यांचा प्रतिकार देखील करावयाचा नाहीं, म्हणजे आपण ह्या पातकास भागीदार होणार नाहीं, असा निश्चय करून अर्जुन धनुष्यबाण टाकून देऊन खिन्न अंतःकरणानें रथांत स्वस्थ बसला.

२. अर्जुनाची ही स्थिति भगवंतांच्या लक्षांत येतांच त्यांनीं त्याबद्दल अर्जुनाचा तीव्र शब्दांनीं स्पष्ट निषेध केला, तेव्हां अर्जुनानें आपली कल्पना श्रीकृष्णापुढें थोडक्यांत मांडली. अर्जुन म्हणाला, "श्रीकृष्णा, ऐहिक सुखोपभोगाकरितां उपस्थित केलेल्या घोर युद्धकर्मांत गुरुद्रोह, स्वजनहिंसा, कुलक्षय इत्यादि महापातकें समजून उमजून आचरून नरकाचें साधन करून ठेवण्यापेक्षां संन्यासवृत्तीनें भिक्षा मागत राहणें हें मला अधिक श्रेयस्कर वाटत आहे. तथापि स्वजनवियोगाच्या कल्पनेनें शोकग्रस्त झालेल्या माझ्या अंतःकरणास धर्म कोणता व अधर्म कोणता याचा निश्चित निर्णय करण्याचें सामर्थ्य उरलेलें नाहीं. म्हणून तुम्हीच कृपा करून मला श्रेयस्कर धर्म कोणता तो सांगा. कारण कुलधर्म व क्षात्रधर्म (आश्रमधर्म व वर्णधर्म) यांपैकीं श्रेष्ठ कोणता तें ठरविण्यास माझी बुद्धि असमर्थ आहे.

स्वजनवियोगाच्या आकस्मिक निमित्तानें कां होईना, पण अर्जुनास ह्या वेळीं

विषयोपभोगांविषयीं वैराग्य उत्पन्न झालें होतें. **'यदहरेव विरजेत् तदहरेव प्रव्रजेत्'** ह्या संन्यासमार्गीय तत्त्वाप्रमाणें अर्जुनाला यावेळीं कर्मसंन्यास करण्याचा अधिकार प्राप्त झाला होता असें म्हणण्यास हरकत नाहीं. रक्तपातासारख्या घोर कर्माचें फळही नरकप्राप्तीसारखें घोरच असलें पाहिजे ह्या नियमाप्रमाणेंच संन्यासमार्गांतील भिक्षावृत्तीसारखीं निरुपद्रवी कर्में अर्थात् पापकारक नाहींत हें उघड आहे. असें करितांना जरी स्वधर्मत्याग करावा लागला, तथापि संन्यासाश्रमस्वीकार जर मोक्षाला अवश्य असेल तर त्याकरितां असा स्वधर्मत्याग ( क्षात्रधर्मत्याग) केव्हां तरी करणें भागच आहे. ह्या सर्व कारणांवरून घोर दिसणाऱ्या कर्ममार्गापेक्षां निरुपद्रवी संन्यासमार्ग श्रेष्ठ व मोक्षास आवश्यक असल्यामुळें वैराग्य उत्पन्न होतांच मुमुक्षु मनुष्यानें त्या मार्गाचा स्वीकार करण्यास काय हरकत आहे, असा अर्जुनाच्या पूर्वपक्षांतील अभिप्राय आहे.

या वेळीं अर्जुनाची दृष्टि व्यक्तिधर्मावरच संलग्न झाली होती. व्यक्तिधर्माचें क्षेत्र जास्तींत जास्त वाढविलें तरी तें कुलधर्माच्या पलीकडे जात नाहीं, म्हणूनच गुरुद्रोह, पितृद्रोह, मित्रद्रोह यांसारखीं पातकें कुलधर्माच्या अगर व्यक्तिधर्माच्या मर्यादेंतच पडतात. व्यक्तिधर्मांत गुरफटलेल्या अर्जुनाला कुलधर्मच सर्वांत श्रेष्ठ वाटत असल्यामुळें, कुलक्षयाच्या भीतीनें तो गांगरून गेला होता; व कुलधर्म ही मानवी कर्तव्याची अंतिम मर्यादा आहे असें त्याला वाटत असल्यामुळें, कुलक्षयकारक युद्धापासून तो परावृत्त झाला होता. आपल्या कुलाला हें युद्ध हितकारक नाहीं सबब हें युद्ध करणें योग्य नाहीं असें त्यानें ठरविलें होतें. असें करणें क्षात्रधर्माच्या विरुद्ध आहे हेंही तो जाणून होता; पण क्षात्रधर्माचें आचरण करावें तर कुलधर्म बुडतो आणि कुलधर्माचें संरक्षण करावें तर क्षात्रधर्माचा त्याग करावा लागतो, अशा परस्परविरुद्ध दोन धर्मांच्या कात्रींत तो सांपडला होता. अर्जुन हा शीलगुणसंपन्न असा सर्वोत्कृष्ट आर्य क्षत्रिय होता. नितांत श्रेयस्कर असेल तेंच आपल्या हातून घडावें अशी त्याची उत्कट इच्छा होती. परस्परविरुद्ध दोन धर्मांपैकीं श्रेष्ठ कोणता हें त्याला निश्चित करितां येईना व कांहीं केलें तरी एका धर्माचा आपल्या हातून खास त्याग होणार असें त्याला वाटलें. याप्रमाणें पेचांत पडल्यामुळें तो अधिकच शोकग्रस्त झाला. त्यानें भगवंतांपुढें आपलें मन मोकळें केलें व आपणास खऱ्या श्रेयस्कर मार्गाचा उपदेश करण्याविषयीं भगवंताला विनंति केली.

अर्जुनाच्या या शंकेचें निरसन करण्याकरितां भगवंतांनीं पुढें ज्या कर्मयोग-निष्ठेचा उपदेश केला आहे, त्या निष्ठेंतील मुख्य तत्त्वाचा उल्लेख भगवंतांनीं सूत्र-रूपानें उपक्रमाधिकरणांत केला आहे.

शुद्ध बुद्धि हा कर्मयोगाचा मूळपाया किंवा आत्मा होय. या शुद्ध बुद्धीचें स्वरूप अ. २, श्लोक ४५ यांत स्पष्ट केलें आहे तें असें:—

**त्रैगुण्यविषया वेदा निस्त्रैगुण्यो भवार्जुन।**
**निर्द्वंद्वो नित्यसत्त्वस्थो निर्योगक्षेम आत्मवान्॥**

ह्या श्लोकांत सांगितलेले बुद्धीचे पांच अंश पूर्ण होणें हेंच शुद्धबुद्धीचें स्वरूप होय. निस्त्रैगुण्य, निर्द्वंद्व, नित्यसत्त्वस्थ, निर्योगक्षेम व आत्मवान् हे पांच अंश स्वतंत्र नसून त्या सर्वांची वाढ व पूर्णता एकसमयावच्छेदानेच होणारी आहे. निस्त्रैगुण्य म्हणजे उपभोगाविषयीं हेतु न ठेवणें, निर्द्वंद्व म्हणजे रागद्वेषादिकांचा मनावर परिणाम होऊं न देणें, निर्योगक्षेम म्हणजे कोणत्याही गोष्टीचें संपादन व संरक्षण करण्याची तळमळ नसणें, हे तीन अंश दोषनिवारणस्वरूप आहेत. नित्य-सत्त्वस्थ म्हणजे धृति, उत्साह, समत्व इत्यादि सात्त्विक गुणांची वृद्धि होणें, व आत्मवान् म्हणजे आध्यात्मिक व आधिभौतिक ज्ञानविज्ञानसंपन्न होणें, हे दोन अंश गुणसंपादनस्वरूपाचे आहेत. ह्याप्रमाणें पहिल्या तीन दोषांचें निवारण होऊन, सात्त्विक गुणाच्या साहचर्यानें ज्ञानविज्ञानाची पूर्णता होणें हीच बुद्धीची नितांत शुद्धता होय. अशी शुद्ध बुद्धि म्हणजे पंडा ज्याच्या ठिकाणीं असते, त्यालाच पंडित म्हणजे स्थितप्रज्ञ म्हणतात, असें उपक्रमाधिकरणांतील पहिल्याच श्लोकांत भगवंतांनीं सुचविलें आहे. उपक्रमाधिकरणांतील पहिल्या (अ. २ श्लोक ११) श्लोकांतील शोच्य व अशोच्य आणि गतासु व अगतासु या पदांनीं 'निर्योगक्षेम' हा अंश सूचित केला आहे. दुसऱ्या श्लोकांत आत्म्याचें नित्यत्व सांगून 'आत्मवान्' ह्या अंशाचें दिग्दर्शन केलें आहे. तिसऱ्या श्लोकांत जन्म-मरणाचे बाबतींत बुद्धिमान् पुरुष मोह पावत नाहीं असें म्हटलें आहे, त्यावरून "निस्त्रैगुण्य" ह्या अंशाचा बोध होतो. चौथ्या श्लोकांत शीतोष्ण–सुख-दुःखादिकांच्या तितिक्षेच्या वर्णनानें 'निर्द्वंद्व' हा अंश दाखविला आहे. व पांचव्या श्लोकांत समत्वाच्या उल्लेखानें 'नित्यसत्त्वस्थ' हा अंश दाखवून, अशा पांची अंशांनीं पूर्ण असलेला शुद्ध बुद्धीचा पुरुष स्थितप्रज्ञ कर्मयोगी मुक्त होतो असें त्या योगनिष्ठेचें फलही सांगितलें आहे.

भगवंतांना ह्या योगनिष्ठेचाच उपदेश अर्जुनाला करावयाचा होता; परंतु स्वजन-वियोगाच्या कल्पनेनें व परस्परविरुद्ध धर्मांच्या पेंचानें शोकाविव्हल झालेल्या त्याच्या अंतःकरणांतील शोक अगोदर नाहींसा केल्याखेरीज, हा उपदेश त्याच्या मनांत ठसणार नाहीं,हें लक्षांत आणून त्याचा शोक घालविण्याकरितां भगवंतांनीं प्रथम त्याला अद्वैत आत्मज्ञान सांगितलें आहे. कारण, मरणाबद्दलचा शोक नष्ट करण्यास आत्म-ज्ञानासारखा दुसरा उपायच नाहीं हें अनुभवसिद्ध आहे. शोकनिरसन हें आत्म-ज्ञानाचें फल आहे असें 'तरति शोकमात्मवित्' ह्या श्रुतिवाक्यांत स्पष्ट सांगितलें आहे. ह्याप्रमाणें आत्मज्ञानाच्या योगानें अर्जुनाचा शोक दूर करून, नंतर देहात्म-वादासारख्या इतर दृष्टींनी देखील शोक करणें कसें अनुचित ठरतें हें दाखवून; ज्या संन्यासमार्गाच्या दृष्टीनें अर्जुन कर्मत्याग करण्यास तयार झाला होता, त्या दृष्टीनें देखील कर्मत्याग कसा सदोष ठरतो, हें सिद्ध करून दाखविलें आहे. संन्यास-मार्गांत कर्म हें केवळ चित्तशुद्धीला उपयोगी पडणारें अतएव गौण असल्यामुळें, त्या दृष्टीनें केलेली कर्मांची मीमांसा अपुरी राहणारच. कारण, बुद्धिपुरःसर घडणारें प्रत्येक कर्म काम्यच असतें, अशी त्या मार्गांत कर्मांची व्याख्या असल्यामुळें, केव्हां तरी कर्मांचा त्याग करणेंच त्या मार्गांत अवश्य मानलें जातें. म्हणून अर्जुनाचा कर्मत्याग सदोष ठरत असला तरी, संकल्पपूर्वक संन्यासाश्रम स्वीकारिल्यास, म्हणजे आश्रमांतर केल्यास, विहितकर्मत्याग पापकारक होत नाहीं, असें संन्यास-मार्गाच्या दृष्टीनें सिद्ध होतें. संन्यासमार्ग व्यक्तिशः मोक्षदायक असला तरी, स्वतःस मोक्षदायक व समाजास सन्मार्गदर्शक असणारा कर्मयोगमार्ग अधिक प्रशस्त असल्यामुळें, तोच भगवान् श्रीकृष्णांनीं उपदेशिला आहे.

स्थिर बुद्धि हेंच कर्मयोगाचें मूलतत्त्व होय. बुद्धि जोंपर्यंत स्थिर झाली नाहीं तोंपर्यंत कर्मयोग साध्य होणें शक्य नाहीं. ह्या कर्मयोग–मार्गांत द्रव्यादि साधन-सामग्रीस विशेष महत्त्व नसतें व ह्या मार्गाचें थोडेंसें आचरण घडलें तरी त्यापासून आध्यात्मिक दृष्टया मोठा लाभ होतो. परंतु विषयोपभोगांच्या नादीं लागलेल्या पुरुषांची बुद्धि चंचल असल्यामुळें उपभोगवासना नष्ट करून, बुद्धि निश्चल व शुद्ध केल्याशिवाय, त्यांना कर्मयोगाचें आचरण पूर्णपणें करितां येणें शक्य नाहीं.

बुद्धि शुद्ध करावयाची म्हणजे, शुद्ध हेतु किंवा शुभेच्छा ( निस्त्रैगुण्य ), स्थैर्य किंवा निर्विकारता ( निर्द्वंद्व ) धृति, उत्साह, समत्व, सदसद्विवेक इत्यादि सद्वृत्ति ( नित्यसत्वस्थ ) प्रसाद किंवा समाधान ( निर्योगक्षेम ) व ज्ञानविज्ञान ( आत्म-

वान् ) ह्या पांच गुणांनीं पूर्ण व्हावयाची असते. हे पांचही गुण परस्परांस पोषक आहेत, तथापि त्यांत ज्ञानविज्ञान हें इतर गुणांचें उत्पादक असल्यामुळें, त्याला विशेष महत्त्व आहे. ज्ञानविज्ञानसंपन्न पुरुष कोणत्याही विषयोपभोगाची पर्वा बाळगीत नाहीं. तो उपभोगवासना न ठेवितां किंवा कर्मत्यागाचाही अशक्य दुराग्रह न धरितां, कर्तव्यबुद्धीनें कर्माचें आचरण करीत असतो. अशा शुद्ध हेतूनें कर्माचरण घडत असतां यशापयशाविषयीं त्याची बुद्धि सम म्हणजे निर्धास्त असते. बुद्धीच्या ह्या समत्वासच 'योग' असें म्हणतात.

हें समत्व म्हणजे पूर्वोक्त पांच अंशांनीं परिपूर्ण झालेल्या बुद्धियोगाचें परिणत स्वरूप होय. ही शुद्धबुद्धिच कर्माचें तारतम्य ठरविण्याची निर्दोष कसोटी होय. ह्या शुद्धबुद्धीनें कर्माचरण केल्यास त्याचा पापपुण्यात्मक बंधही नाहींसा होतो; आणि ह्या बुद्धियोगानेंच अमृतत्वाची प्राप्ति होते. उपभोगांविषयींची तळमळ नष्ट झाल्याखेरीज बुद्धीमध्यें पूर्ण समाधान उत्पन्न होत नाहीं व अशी समाधानवृत्ति झाल्याखेरीज बुद्धियोगाची पूर्णता होत नाहीं. बुद्धियोगयुक्त स्थितप्रज्ञाच्या अंतःकरणांतील उपभोगवासना नष्ट झालेली असल्यामुळें, त्याची स्वार्थासंबंधीं तळमळ शांत झालेली असते. विषयांविषयीं रागद्वेष नाहींसे झाल्यामुळें, त्याला सुखःदुखानें हर्षविषाद उत्पन्न होत नाहींत. स्थितप्रज्ञ पुरुष बुद्धियोगाच्या सामर्थ्यानें सर्व इंद्रियें स्वाधीन ठेवीत असतो. बुद्धीच्या नियंत्रणावांचून केवळ बाह्य इंद्रियांचा अवरोध करणें हा खरा इंद्रियनिग्रह नव्हे. कारण, बाह्य प्रयत्नांनीं इंद्रियें कितीही दाबून ठेविलीं, तरी अंतःकरणांतील विषयोपभोगाची आवड ज्ञानविज्ञान प्राप्त झाल्याखेरीज नाहींशी होत नाहीं. ही आवड किंवा रस कायम असेपर्यंत मनांत तरी विषयोपभोगाचें चिंतन सुरू असतेंच. त्यामुळेंच पुढें विषयांविषयीं आसक्ति उत्पन्न होते. ह्या आसक्तीनें विषयवासना उत्तेजित होऊं लागतात; त्यांना प्रतिबंध झाला असता क्रोध येतो; क्रोधानें सदसद्विवेक नष्ट होऊन मोह उत्पन्न होतो; मोहानें ध्येयाविषयींची स्मृतीही नाहींशी होते; स्मृति नष्ट झाल्यामुळें बुद्धीचा नाश होतो; आणि बुद्धिनाश हाच सर्वनाश होय. म्हणून ज्यानें आपली बुद्धि नितांत शुद्ध करून मन व इंद्रियें यांचा निग्रह केलेला असतो, तोच प्रसन्नचित्त व स्थितप्रज्ञ होय.

ह्याप्रमाणें निर्मम व निरहंकार झालेला पूर्ण स्थितप्रज्ञ पुरुष निष्काम बुद्धीनें कर्माचरण करीत असतो, तथापि उपभोगाकडे त्याचें लक्ष मुळींच असत नाहीं.

सारांश, ज्ञानविज्ञानयुक्त शुद्ध-बुद्धिपूर्वक निष्काम कर्माचरण हीच जीवन्मुक्तावस्था किंवा ब्राह्मी स्थिति होय व ह्याच स्थितींत ब्रह्मानंदाचा लाभ होतो.

३. कोणत्याही प्रमेयास तात्त्विक व व्यावहारिक अशीं दोन स्वरूपें असतात; व तत्त्वांत आणि व्यवहारांत थोडाफार भेदही दिसतो. म्हणून प्रत्येक सिद्धान्ताचें तात्त्विक व व्यावहारिक ह्या दोन्ही दृष्टींनीं निवेचन झाल्याखेरीज त्याचें विवेचन पूर्ण होत नाहीं. त्याप्रमाणें बुद्धियोग हें योगनिष्ठेचें तात्त्विक स्वरूप असून कर्मयोग हें त्याच निष्ठेचें व्यावहारिक स्वरूप आहे. म्हणून बुद्धियोगाच्या विवेचनानंतर कर्मयोगाचें विवेचन क्रमानेंच प्राप्त होतें. कर्म म्हणजे सृष्टि-व्यापार, ह्यातच प्राणिमात्राच्या शारीरिक व मानसिक चलनवलनांचाही अंतर्भाव होतो. सृष्टि कर्ममय असल्यामुळें, कर्म हा प्रत्येक स्थूल सूक्ष्म सृष्टपदार्थाचा स्वाभाविक धर्मच असतो. बुद्धि, मन व इंद्रियें हेही सृष्ट पदार्थच असल्या-मुळें, कर्म हा त्यांचाही स्वाभाविक धर्म आहे हें निराळें सांगावयास नको. ह्या दृष्टीनें विचार केला असतां, ह्या जगांत कर्म कोणासच सोडतां येणें शक्य नाहीं. ह्याप्रमाणें जीवास कर्म करणें किंवा न करणें ह्या बाबतींत स्वातंत्र्य नसलें तरी, बुद्धीच्या साह्यानें आपल्या कर्मांचा सदुपयोग किंवा दुरुपयोग करण्याच्या बाबतींत मात्र त्याला पूर्ण स्वातंत्र्य असतें, समुद्रांत असलेल्या नावेची गति—हालचाल—पूर्ण-पणें बंद करणें नावाड्याच्या हातीं नसतें, तथापि वाऱ्याच्या साह्यानें ती नाव इष्ट दिशेस नेणें किंवा भलतीकडे वाहूं देणें हें मात्र नावाड्याच्या स्वाधीन असून त्याविषयीं त्याच्यावर जबाबदारीही असते. त्याप्रमाणें मनाच्या द्वारानें इंद्रियावर शुद्धबुद्धीचें नियमन ठेवून कर्मास योग्य वळण देण्याची जबाबदारी जीवावरच असते.

कर्मामध्यें चेष्टारूप कर्म व बुद्धिपूर्वक कर्म असे दोन प्रकार होतात. श्वासो-च्छ्वासासारखीं, बुद्धीच्या साहाय्यावांचून आपोआप घडणारीं कर्मे चेष्टारूप होत. ह्या कर्मांविषयीं विधिनिषेधादि नियम शक्यही नसतात व अवश्यही नसतात. बुद्धि-पूर्वक कर्मांत इच्छा व अंतर्बाह्य प्रयत्न, असा क्रम असतो आणि अशा कर्मांबद्दलच शास्त्रांत विधिनिषेधादि नियम केलेले असतात. इच्छा म्हणजे हेतु हें बुद्धीचेंच स्वरूप आहे व बुद्धि हीच प्रयत्नाला प्रेरक असते. म्हणून कर्मांचा बरेवाईटपणा त्या कर्मांच्या बाह्य स्वरूपावर अवलंबून नसून कर्त्याच्या बुद्धीवर अवलंबून असतो. म्हणजे ज्ञानविज्ञानयुक्त शुद्धबुद्धीनें केलेलें कर्म हेंच सत्कर्म होय व त्याच्या उलट घडणारें कर्म हें असत्कर्म होय. अर्थात् सत्कर्माचा परिणाम श्रेयस्कर व असत्कर्माचा

परिणाम बंधनकारक होतो. त्याप्रमाणें कर्म अजीबात सुटणें जरी अशक्य असलें, तथापि तें कर्म बंधरहित व श्रेयस्कर कसें होईल, याचा विचार करण्याची जबाबदारी प्रत्येक मनुष्यावर आहे.

सदिच्छा हें सत्कर्माचें मूळ असून भगवदुपासनेची इच्छा हीच सदिच्छा होय. मन व इंद्रियें यांचे व्यापार, म्हणजे अंतर्बाह्य प्रयत्न, अशा सदिच्छेस अनुसरून चालविले असतां, तें कर्म बंधरहित व श्रेयस्कर होतें. त्याप्रमाणें शुद्धबुद्धीनें भगवदुपासनार्थ कर्माचरण करणें हें प्रत्येक मनुष्याचें कर्तव्य होय. असें सत्कर्म मनुष्याच्या ऐहिक व पारमार्थिक कल्याणास साधन होत असून, जगताच्या-समाजाच्या-धारणपोषणासही अवश्य असतें. मनुष्याला जोंपर्यंत ह्या जगांत आपली शरीरयात्रा चालवावयाची असते, तोंपर्यंत जगताच्या धारणपोषणाकरितां सत्कर्माचरण करणें त्याला भागच असतें. मग तो संन्यासी असो किंवा कर्मयोगी असो. असें न करणाऱ्या मनुष्यास ह्या जगांत जिवंत राहण्याचा हक्कच नाहीं. बुद्धियोगयुक्त स्थितप्रज्ञ पुरुषाला स्वतःकरितां कशाचीही अपेक्षा नसते. परंतु त्याचें सत्कर्माचरण केवळ जगताच्या धारणपोषणाकरितांच चाललेलें असतें. सत्कर्म कोणतें व असत्कर्म कोणतें ह्याचा तात्त्विक निर्णय करण्याची पात्रता सर्वांच्याच ठिकाणीं नसल्यामुळें, श्रेष्ठ पुरुषांच्या आचरणाचें अनुकरण करण्याचीच बहुजनसमाजाची प्रवृत्ति असते. अर्थातच ज्ञानी स्थितप्रज्ञ पुरुषाचें आचरण पाहून त्याप्रमाणें वागण्याचा प्रयत्न सामान्य लोक करीत असतात. म्हणून स्थितप्रज्ञानें आपलें आचरण शुद्ध आदर्शरूप ठेवणें अवश्य असतें. समाजाला शुद्ध व नैतिक वळण लावणें हें जगताच्या धारणपोषणांतील एक महत्त्वाचें कार्य आहे. म्हणून भगवान् श्रीकृष्णांनीं देखील स्वतः सत्कर्माचरण करून जगताला सन्मार्ग दाखविला आहे. श्रीकृष्णाच्या चारित्रासंबंधानें नानाविध कल्पना प्रचलित आहेत. त्यांत अनीतिकारक अशाही कांहीं गोष्टींचा समावेश झाला आहे. परंतु या अनीतिकारक गोष्टींस कविकल्पनेवांचून दुसरा आधार बिलकुल नाहीं. श्रीकृष्णाच्या चरित्रांतील विसंगत गोष्टींची लोकसंग्रहाच्या तत्त्वानें छाननी केल्यास त्याच्या चारित्र्याची संगति इतिहासपुराणावरून देखील उत्कृष्ट बसवितां येते. म्हणून कविकल्पनेमुळें श्रीकृष्णाच्या चरित्रासंबंधानें जो अत्यंत गैरसमज रूढ होऊन बसला आहे, तो निखालस साफ खोटा आहे हें हरिवंशासारख्या ऐतिहासिक ग्रन्थावरून सिद्ध करतां येण्याजोगें आहे. सारांश, लोकसंग्रहाच्या तत्त्वास अनुसरून माझें चरित्र आदर्शरूप आहे

असें भगवान् श्रीकृष्णांनीं म्हटलें आहे, तें झळझळीत सूर्यप्रकाशाइतकें ऐतिहासिक सत्य आहे हें प्रत्येकानें लक्षांत ठेवलें पाहिजे. मग इतर ज्ञानी पुरुषांनीं देखील हें कार्य यावज्जीव चालविलें पाहिजे असें निराळें सांगण्याची आवश्यकताच नाहीं. असें असतां ज्ञानी पुरुषानें सत्कर्माचरण केलें नाहीं तर त्यांत त्याचें स्वतःचें जरी कांहीं नुकसान नसलें तरी, सामान्य जनांचा बुद्धिभेद करून त्यांस कुमार्गास लावल्याचें खापर त्याच्या डोक्यावर फुटल्याशिवाय रहावयाचें नाहीं. म्हणून स्थितप्रज्ञ सिद्ध असो वा साधक असो, त्यानें शुद्ध बुद्धीनें भगवदुपासनार्थ यावज्जीव सत्कर्माचरण करीत राहून लोकांना सन्मार्ग दाखविणे अवश्य आहे. सारांश, शुद्ध हेतु, निर्विकार अंतःकरण, समाधानवृत्ति, धृति, उत्साह, समत्व, परमेश्वरासंबंधीं ज्ञानविज्ञान ह्यांनीं युक्त म्हणजे योगयुक्त बुद्धीनें जगाच्या धारणपोषणार्थ नियत कर्माचरण करीत राहणें म्हणजे कर्मयोग आचरण करणें हेंच योगनिष्ठेचें तात्त्विक व व्यावहारिक स्वरूप होय.

ह्याप्रमाणे योगनिष्ठेचें ज्ञान होण्यापूर्वी श्रद्धापूर्वक भगवद्भक्तानें विहितकर्माचरण करूं लागलें असतां, भगवत्कृपेनें कर्मयोग क्रमाक्रमानें सर्वांगांनीं परिपूर्ण होत जातो. समाजकल्याणाची सर्व जबाबदारी व्यक्तीवरच असल्यामुळें, त्या बाबतींत व्यक्तीला जरी पारतंत्र्य असलें तरी, प्रकृतिस्वभावाचे बाबतींत व्यक्ति पूर्ण स्वतंत्र आहे. म्हणजे व्यक्तीनें आपल्या स्वभावास अनुसरून कर्माचें बाह्य स्वरूप पसंत करावें व त्या दिशेनें स्वतः अमृतत्व संपादन करून लोककल्याणही करावे.

ह्या कर्मयोगमार्गांत प्रथमपासूनच मनुष्यानें विषयेंद्रियसंयोगानें उत्पन्न होणाऱ्या रागद्वेषांच्या स्वाधीन होतां कामा नये. कर्तव्याचरणाचे बाबतींत म्हणजे स्वभावानुसार बुद्धियोगपूर्वक प्राप्त कर्माचरणाचे बाबतींत ह्या रागद्वेषांची किंबहुना मरणाचीही पर्वा न करितां स्वकर्तव्याचरण केलें पाहिजे, कारण ह्या रागद्वेषांच्या अधीनत्वामुळेंच मनुष्य कर्तव्यपराङ्मुख होत असतो. रागद्वेषमूलक कर्म म्हणजेच पाप होय. रागद्वेष हीं कामाचीं म्हणजे उपभोगवासनेचीं रूपांतरें होत. ह्यावरून काम हाच मनुष्याचा शत्रु आहे. म्हणजे तोच सर्व दुष्कर्मांचें मूळ कारण आहे, हें उघड आहे. हा काम मनुष्याची सदसद्विवेकशक्ति नष्ट करून, त्याला पापाचरणास प्रवृत्त करितो, म्हणजे कर्तव्यपराङ्मुख करितो. इंद्रियें मन व बुद्धि हेंच कामाचें अधिष्ठान असल्यामुळें, त्याला जिंकावयास इंद्रियनिग्रहापासून आरंभ केला पाहिजे. विषयवासनांनीं सदोष झालेली बुद्धि, मनावर व इंद्रियांवर नियमन

ठेवण्याचें आपलें स्वाभाविक कर्म करण्यास असमर्थ होते, व सर्व कर्मे इंद्रियांच्या रागद्वेषाच्या ( कामाच्या ) तंत्रानेंच चालूं लागतात. तेणेंकरून बुद्धिनाश होऊन मनुष्याचा अधःपात होतो. म्हणून आत्मज्ञानाच्या योगानें बुद्धींतील विषयवासना म्हणजे काम नाहींसा होऊन, शुद्ध बुद्धीचें मनावर व मनाचें इंद्रियांवर यथायोग्य नियमन चालूं लागलें म्हणजेच बुद्धि निर्द्वंद्व झाली असें समजावें.

८. जीवात्मा व परमात्मा हे एकच असून परमात्म्याचें ज्ञान हेंच आत्मज्ञान होय. परमात्मा अज व अव्यक्त असला तरी प्रकृतीच्या साह्यानें जगाच्या धारण-पोषणाकरितां म्हणजे साधूंचें परिपालन व दुष्टांचें शासन करून धर्मसंस्थापना करण्याकरितां वेळोवेळीं ज्या त्या परिस्थितीस योग्य असलेल्या स्वरूपानें प्रगट होतो. परमात्म्याचे हेतु व चरित्र यांच्या यथार्थ ज्ञानानेंच मनुष्याची बुद्धि शुद्ध होऊन तो जन्ममरणांतून मुक्त होतो.

परमेश्वराची उपासना जशा हेतूनें करावी, तसें फल या मनुष्यलोकांत प्राप्त होत असतें. अज्ञ मनुष्य उपभोगाच्या नादीं लागल्यामुळें शुद्ध हेतूनें परमेश्वराची उपासना न करितां, इतर क्षुद्र देवतांची उपासना करूं लागतो, व त्याच्या क्षुद्र हेतूप्रमाणें त्याला फलप्राप्तिही क्षुद्रच होते. उपासनेच्या म्हणजे कर्माच्या बाह्य स्वरूपांत जरी उच्चनीचपणा दिसत असला, तरी, कर्त्याचा हेतु शुद्ध असेल तर कोणत्याही स्वरूपाचें कर्म ही परमेश्वराची उपासनाच होते. कर्माच्या बाह्य स्वरूपांतील भेद कर्त्यांच्या स्वाभाविक गुणांमुळें उत्पन्न झालेला असतो व या स्वाभाविक गुणांना अनुसरूनच समाजामध्यें चातुर्वर्ण्य म्हणजे चार वर्णांच्या कर्मांची व्यवस्था ठरलेली असते. ही वर्णव्यवस्था गुणकर्मविभागास अनुसरून परमेश्वरानें केली असली, तथापि त्यांतील उच्चनीच-भावाची जबाबदारी परमेश्वरावर नसून ज्याच्या त्याच्या गुणकर्मांवरच आहे हें उघड आहे ह्याप्रमाणें परमेश्वराचें चरित्र हेतुपुरःसर असलें तरी, आसक्तिरहित असतें. कर्माचें हें तत्त्व ओळखून जो कर्माचरण करितो तो त्या कर्मांमुळें बद्ध होत नाहीं.

परमेश्वराचें स्वरूप व हेतु यांचें यथार्थ ज्ञान संपादन करून तदनुसार वर्तन ठेवणें हीच परमेश्वराची सर्वांत श्रेष्ठ उपासना होय. ह्याप्रमाणें उपासनामय हेतूनें केलेलें कर्म बंधक नसल्यामुळें, तें तत्त्वतः अकर्मच होय आणि सकाम व स्वार्थपर हेतूनें घडणारें कर्म बाह्यतः दिसत नसलें, तरी तें तत्त्वतः कर्मच होय. प्रत्येक

मनुष्यानें कर्माचें हें तत्त्व अवश्य ओळखलें पाहिजे. ह्या तत्त्वाकडे दुर्लक्ष झाल्या मुळे, मोठमोठ्या लोकांना देखील कर्माकर्माविषयीं मोह उत्पन्न होतो. म्हणून, वरीलप्रमाणें निष्काम कर्मास जो अकर्म समजतो व सकाम म्हणजे कामनापूर्वक केलेल्या स्तब्धतेस किंवा संन्यासास देखील कर्म समजतो, तोच कर्माकर्माचें तत्त्व जाणणारा स्थितप्रज्ञ कर्मयोगी होय. तात्पर्य, बुद्धींतील विषयवासनांचा दोष नाहींसा केल्यानेंच निस्त्रैगुण्य पूर्ण होत नसून, हेतु निष्काम उपासनामय म्हणजे शुद्ध झाला म्हणजेच त्याची खरी पूर्णता होते. ह्याप्रमाणें स्वावलंबी, निर्विकार, समबुद्धि व ज्ञानविज्ञानसंपन्न स्थितप्रज्ञ पुरुष शुद्ध हेतूनें जीं जीं कर्मे करीत असतो, तीं सर्व कर्मे भगवदुपासनास्वरूपच होतात.

ज्ञानविज्ञानपूर्वक शुद्ध बुद्धीनें भगवदुपासनार्थ कर्मयोगाचरण करणें हाच ज्ञान यज्ञ होय. आज्यादि हवनद्रव्यें, गंधपुष्पादि पूजाद्रव्यें आणि अन्नवस्त्रादि सामग्री ह्यांच्या साह्यानें केलेलें होमहवन, मूर्तिपूजा किंवा परोपकार हे सर्व द्रव्ययज्ञ होत. आसनप्राणायामादिकांनीं संपादन करावयाचा इंद्रियनिग्रह हाच तपोयज्ञ होय. ज्ञानपूर्वक सर्वकर्मसंन्यास करून, ध्यानधारणादिकांत निमग्न असणें हा योगयज्ञ होय व वेदशास्त्रादिकांचें अध्ययन करीत राहणें हा स्वाध्याय यज्ञ होय. ह्या सर्व यज्ञांत ज्ञानयज्ञच श्रेष्ठ आहे. गुरूपदेशानें किंवा शास्त्राध्ययनानें प्राप्त झालेलें ज्ञान कर्मयोगाचरणानें परिपक्व झालें म्हणजे ब्रह्मसाक्षात्कार होतो. ह्या जगांत ज्ञाना इतकी पवित्र वस्तु दुसरी कोणतीही नाहीं. अंतःकरण कितीही पापयुक्त असलें तरी, ज्ञानाच्या योगानें तें तात्काळ पवित्र होतें; व हें ज्ञान प्राप्त झालें असतां कर्माकर्माविषयीं अंतःकरणांत संशय किंवा मोह राहात नाहीं. सारांश, आत्मज्ञानाच्या योगानें अंतःकरणांतील दोष नाहींसे करून, शुद्ध बुद्धीनें कर्मयोगाचरण करणें हेंच मनुष्याचें श्रेष्ठ कर्तव्य होय असें सिद्ध होतें.

५. ज्ञानप्राप्तीनंतर ( परोक्ष ज्ञानानंतर ) कर्मसंन्यास व कर्मयोग ह्या स्वतंत्र दोन निष्ठा शास्त्रांत सांगितल्या आहेत ( गीता—अ.३, श्लोक ३, व बृहदा० ४।४।२२). ज्ञानप्राप्तीनंतर ह्या दोन निष्ठांचा विकल्प असला तरी, त्यांपैकीं संन्यासनिष्ठेपेक्षां कर्मयोगनिष्ठा अधिक प्रशस्त आहे. कारण, कर्मयोगाचें अंतरंग जो बुद्धियोग, त्यामध्येंच संन्यासमार्गांतील तत्त्वांचाही अंतर्भाव होत असून कर्मसंन्यासापेक्षां कर्मयोगच ज्ञानाच्या परिपाकाला विशेष उपयोगी पडतो ( अ. ५, श्लोक ६ ). शिवाय लोकसंग्रहासही कर्मयोग उपकारक होत असल्यामुळें, संन्यासापेक्षां योग-

निष्ठाच श्रेष्ठ ठरते. तथापि ह्या दोन्हींपैकीं कोणत्याही निष्ठेचें अवलंबन केलें, तरी मोक्ष हें एकच फल प्राप्त होतें ह्यांत संशय नाहीं.

संन्यासमार्गांत प्रथमतः चित्तशुद्धीकरितां तरी कर्मयोगाची अपेक्षा असतेच, परंतु कर्मयोगमार्गांत मात्र कर्मसंन्यासाची केव्हांही गरज नसते. योगनिष्ठेंत उपभोगवासनांचाच संन्यास म्हणजे त्याग करावयाचा असतो. कर्मयोगी स्थितप्रज्ञ पुरुष कोणत्याही कर्माविषयीं विचार करितांना कर्म हा इंद्रियें व विषय यांच। स्वाभाविक संबंध घडत असून, त्याचा आत्म्याशीं संबंध नाहीं, म्हणजे तें आत्म्याचें कर्म नव्हे असें समजतो, अर्थात् कोणत्याही कर्माचें इष्टानिष्ट फल किंवा पापपुण्य यांचा आत्म्याशीं संबंध नाहीं हें जाणतो, परंतु ज्यांची बुद्धि अज्ञानानें आवृत झालेली असते, ते बुद्धीच्या गुणांचा संबंध आत्म्याशीं जोडून, आत्मा हाच कर्मांचा कर्ता व भोक्ता आहे असें समजतात. आत्मज्ञानाच्या योगानें बुद्धि निर्मल झाली म्हणजे हें आत्म्याविषयींचें अज्ञान नष्ट होऊन ते पूर्ण स्थितप्रज्ञ होतात व शेवटीं मुक्त होतात.

आत्मतत्त्व म्हणजे ब्रह्म पूर्ण शुद्ध असून सर्व उच्चनीच पदार्थांत सारखेंच भरलेलें असल्यामुळें त्याच्या यथार्थ ज्ञानानें प्रकाशित झालेल्या बुद्धीमध्येंही समत्वगुणाचा उदय होतो. अशा समबुद्धीचे पुरुष बाह्यत: दिसणाऱ्या कृत्रिम उच्चनीच भावास महत्त्व देत नाहींत. ते बाह्य विषयांच्या उपभोगांविषयीं विरक्त असल्यामुळें, त्यांच्या अंतःकरणांत हर्ष, विषाद किंवा मोह इत्यादि विकार उत्पन्न होत नाहींत. ते कामक्रोधांमुळें उत्पन्न होणारे वेग सहन करून समबुद्धिनियत अंतःकरणानें सर्वांच्या हिताकरितां उत्साहपूर्वक कर्तव्यतत्पर असतात. सारांश, आत्मज्ञानानें शुद्ध झालेल्या बुद्धींत समत्वादि सात्त्विक गुणांचा विकास झाला म्हणजे ती नित्यसत्त्वस्थ होते व असे नित्यसत्त्वस्थ बुद्धिमान् कर्मयोगी ब्रह्मपदाला प्राप्त होतात.

६. उपभोगवासनांचा पूर्ण त्याग करून सर्वभूतहितार्थ कर्तव्यबुद्धीनें कर्माचरण करणारा स्थितप्रज्ञ पुरुषच खरा संन्यासी व कर्मयोगी होय. या कर्मयोगमार्गांत बुद्धि नितान्त शुद्ध होणें अत्यंत अवश्य असतें. बुद्धि शुद्ध होण्यास म्हणजे बुद्धीमध्यें शुद्ध हेतु, स्थैर्य व समत्वादि सात्त्विक गुण यांचा पूर्ण विकास होण्यास मनोनिग्रहाची आवश्यकता असते. हा मनोनिग्रह संपादन करण्यास अभ्यासयोग व साम्ययोग अशीं दोन प्रकारचीं साधनें शास्त्रांत सांगितलीं आहेत.

प्रतिदिवशीं शुचिर्भूत होऊन पवित्र व एकान्तस्थलीं आसन स्थापन करून पद्मासनादि विधीनें त्या आसनावर स्थिर बसावें, देह सरळ ठेवून व नासाग्रीं दृष्टि लावून प्राणायामपद्धतीनें सर्व बाह्येंद्रियांचे व्यापार बंद करावेत, आत्मज्ञानपूर्वक ध्यानधारणेच्या योगानें चित्तवृत्तीचा निरोध करून परमात्म्याच्या ठिकाणीं मन एकाग्र व निश्चल करावें. ह्याप्रमाणें ध्येयवस्तूचे ठिकाणीं चित्ताचा पूर्ण लय झाला म्हणजे निरतिशय समाधिसुखाचा लाभ होतो, हा अभ्यासयोग होय. ह्या अभ्यासयोगांत आहार, निद्रा व शरीराची हालचाल इत्यादि कर्मे फारच नियमित ठेवावीं लागतात. या साधनांचें अवलंबन करणाऱ्या अभ्यासयोगी पुरुषास समाजांत राहणें किंवा जगाच्या धारणपोषणाकडे लक्ष देणें अशक्य असतें.

साम्ययोगमार्गांत सर्व विषयवासनांचा त्याग करून व बुद्धीच्या सदसद्विवेकानें क्रमाक्रमानें मन स्थिर करून इंद्रियांचें नियमन करावयाचें असतें, आणि मनाचा चंचलपणा नाहींसा करून तें शुद्धबुद्धीच्या स्वाधीन करावयाचें असतें. याप्रमाणें बुद्धीचें मनावर व मनाचें इंद्रियांवर योग्य नियमन चालूं लागलें म्हणजे मनोनिग्रह पूर्ण होतो. या साम्ययोगांत कर्तव्यतत्परता अवश्य असल्यामुळें त्या साधनास समाजांत राहणें व लोकहित साधणें इत्यादि गोष्टी विरोधी होत नाहींत. त्याचप्रमाणें साम्ययोगांत एकान्तवास स्वीकारून इंद्रियांचे व्यापार बंद करण्याची खटपटही करावी लागत नाहीं. म्हणून अभ्यासयोगापेक्षां साम्ययोगच सुलभ व प्रशस्त होय. ह्या साम्ययोगानें मनोनिग्रह पूर्ण झाला म्हणजे, अनायासानें ब्रह्मप्राप्ति होते. या साम्ययोगाच्या साधनानें सिद्धावस्थेस पोंचलेला स्थितप्रज्ञ पुरुष सर्वांभूतीं एकच परमात्मा भरलेला आहे हें तत्त्व पूर्णपणें ओळखून, कर्मयोगरूपानें विश्वरूप परमात्म्याची उपासना करीत असतो व तो आत्मौपम्यदृष्टीनें सर्वांच्या सुखदुःखांचा विचार करीत असल्यामुळें त्याच्या हातून सर्व प्राणिमात्रांचें हितच होत असतें.

मन स्वभावतः चंचल व अनिवार असलें तथापि बुद्धीच्या सतत प्रयत्नानें व वैराग्यानें त्याचा निग्रह होणें शक्य आहे. असा प्रयत्न चालू असतां मृत्यूसारख्या आपत्तींनीं त्या प्रयत्नांत खंड पडला तरी, झालेल्या प्रयत्नानें प्राप्त झालेला बुद्धियोग नष्ट होईल कीं काय व पुनः बुद्धियोग प्राप्त होईल कीं नाहीं, अशी भीति बाळगण्याचें कारण नाहीं. कारण, बुद्धिपूर्वक सन्मार्गास प्रवृत्त झालेल्या पुरुषाचा ऐहिक किंवा पारमार्थिक नाश होत नाहीं. मृत्यूमुळें योगभ्रष्ट झालेला साधक पुरुष

पुनः योग्य कुलांत जन्म घेतो व त्याचे बौद्धिक संस्कार कायम असल्यामुळें त्याचा पूर्वजन्मांतील कर्मयोग तसाच पुढें सुरू होतो, व तो क्रमाक्रमानें पूर्णतेला पोंचतो. तात्पर्य, साधकानें एकदां सद्धेतुपूर्वक कर्मयोगाचरणाचा प्रयत्न सुरू केला म्हणजे हा प्रयत्न पूर्ण होईल कीं नाहीं याविषयीं मनांत तळमळ किंवा धास्ती बाळगण्याचें कारण नाहीं. कारण एकदां सुरू झालेला हा प्रयत्न मध्येंच न थांबतां क्रमाक्रमानें पूर्णतेला पोंचल्यावांचून रहातच नाहीं. म्हणून त्यानें आपली बुद्धि निर्योगक्षेम ठेवावी.

७. ह्याप्रमाणें शुद्ध हेतु, निर्विकार स्थिर अंतःकरण, सात्त्विक वृत्ति व समाधान ह्या सर्व गुणांचा बुद्धीमध्यें विकास होण्यास आत्मज्ञानाची आवश्यकता असते. हें आत्मज्ञान भगवद्भक्तियुक्त अंतःकरणानें कर्माचरण करीत असतां संपादन करावयाचें असतें. पूर्ण आत्मज्ञान म्हणजे विज्ञानासह ( सृष्टिज्ञानासह ) ज्ञान ( परमात्म्याचें ज्ञान ) होय. विज्ञानावांचून ज्ञानाची पूर्णता होत नाहीं, व आत्मज्ञानावांचून केवळ विज्ञान अमृतत्वाला उपयोगी पडत नाहीं.

पंचमहाभूतें, मन, बुद्धि व अहंकार किंवा अव्यक्त प्रकृति हीं सृष्टीचीं आठ मूलतत्त्वें, ही परमात्म्याची अपरा प्रकृति होय ह्या मूलतत्त्वांचें म्हणजे सृष्टीचें सोपपत्तिक ज्ञान हेंच विज्ञान होय. सर्व सृष्टपदार्थांच्या अंतर्यामीं जीवस्वरूपानें राहणारा परमेश्वरी अंश ही परमात्म्याची परा प्रकृति होय. आणि ह्या अविनाशी परा प्रकृतीचें यथार्थ ज्ञान हेंच आत्मज्ञान होय. अपरा व परा प्रकृति हीं एकाच परमात्म तत्त्वाचीं दोन स्वरूपें असल्यामुळें, सर्व सृष्टि परमात्म्यापासूनच उत्पन्न होते, व परमात्म्याचे ठिकाणींच लय पावते. त्याचप्रमाणें सर्व सृष्टीला आधार एक परमात्माच आहे हें उघड आहे. प्रत्येक पदार्थामध्यें असणारी धारक-पोषक शक्ति हीच परमात्म्याची जीवरूप परा प्रकृति होय. ह्यावरून एक परमात्माच ह्या सर्व सृष्टीस अंतर्बाह्य व्यापून राहिलेला आहे व तोच ह्या विश्वाचा चालक आणि नियामक आहे, असें सिद्ध होतें.

सृष्टीचा नानाविधपणा परमात्मज्ञानास अत्यंत उपयोगी असून, अज्ञ मनुष्य ह्या सृष्टीच्या बाह्य देखाव्यास भुलून जाऊन परमात्म्याचें तात्त्विक स्वरूप ओळखीत नाहीं. ह्या तात्त्विक ज्ञानाकडे दुर्लक्ष करून, केवळ भौतिक शास्त्रांच्याच नादीं लागून मनुष्यानें नुसतें विज्ञानच संपादन केलें तर, त्याचें पर्यवसान आसुरी स्वभावांत होण्याचा संभव असतो. त्याचप्रमाणें विज्ञानाकडे अजिबात दुर्लक्ष करून कोणी नुसत्या तत्त्वज्ञानाच्याच पाठीस लागेल तर त्या ज्ञानानें त्याच्या सामर्थ्याचा विकास

होत नाहीं. म्हणजे विज्ञानानें सामर्थ्याचें व आत्मज्ञानानें सद्‌गुणांचें संवर्धन होतें. म्हणून ज्ञानाच्या पूर्णतेस विज्ञानाची अत्यंत आवश्यकता असते.

सृष्टिरचना हीच परमेश्वरी माया होय. ज्ञानविज्ञानसंपन्न पुरुष सृष्टीच्या ह्या बाह्य देखाव्यास म्हणजे मायेस न भुलतां परमेश्वराचें तात्विक स्वरूप ओळखून त्याची उपासना करितात. म्हणून ते मायामोहांतून पार पडतात. परमेश्वराची उपासना करणारांचे चार प्रकार होतात. दुःखी, सकाम, जिज्ञासु व ज्ञानी. ह्या सर्वांत ज्ञानी उपासक म्हणजे ज्ञानविज्ञानसंपन्न भक्तियुक्त कर्मयोगी पुरुष श्रेष्ठ होय हें उघड आहे. जिज्ञासु उपासकाच्या उपासनेचें पर्यवसान क्रमाक्रमानें ज्ञानांतच होतें, म्हणजे तो शेवटीं ज्ञानी उपासकच होतो. परंतु दुःखनिवारणाकरितां किंवा उपभोगसंपादनाकरितां जे उपासना करीत असतात, त्यांची बुद्धि विषयवासनांनीं सदोष झालेली असल्यामुळें, त्यांना परमेश्वराचें यथार्थ ज्ञान नसतें. म्हणून ते आपल्या वासना तृप्त करून घेण्याकरितां, इतर देवतांची श्रद्धापूर्वक उपासना करितात. आणि त्यांच्या संकुचित हेतूंप्रमाणें त्यांना फलप्राप्तिही संकुचित होते.

परमेश्वरी मायेनें म्हणजे सृष्टीच्या बाह्य देखाव्यानें ज्यांची बुद्धि मोहित झालेली असते, त्यांना परमेश्वराचें यथार्थ ज्ञान होत नाहीं. असे अशुद्ध बुद्धीचे लोक आपली बुद्धि शुद्ध करण्याचा प्रयत्न न करितां, परमेश्वराविषयीं व सृष्टीविषयीं भलभलत्या कल्पना लढवून आपला गैरसमज करून घेतात. परंतु कर्मयोगाचरणानें ज्यांच्या बुद्धींतील दोष नाहींसे झालेले असतात ते स्थितप्रज्ञ, सर्वज्ञ परमेश्वराची ज्ञानविज्ञानपूर्वक नेहमीं उपासना करीत असतात, म्हणजे ते आत्मवान् होतात.

ज्ञानविज्ञानाचे स्थूल मानानें सहा प्रकार होतात. ते असे—१ अविनाशी शुद्ध ब्रह्मतत्त्व, २ अध्यात्म म्हणजे स्वभाव ( जीवाचा त्रिगुणात्मक उपाधि ), ३ कर्म म्हणजे विश्वोत्पादक प्रकृति-पुरुषसंयोग, ४ अधिभूत म्हणजे उत्पत्तिविनाशशाली सृष्ट पदार्थ, ५ अधिदेव म्हणजे पदार्थांच्या अंतर्यामीं असणारी नियामक ईशशक्ति व ६ अधियज्ञ म्हणजे उपासनेचा फलदाता व फलभोक्ता. यांपैकीं पहिले तीन प्रकार अव्यक्तांत समाविष्ट होत असून पुढचे तीन व्यक्तामध्यें अंतर्भूत होतात.

ह्या सर्व प्रकारांनीं ज्याचें ज्ञानविज्ञान पूर्ण झालेलें असेल, त्याची बुद्धि नेहमीं परमेश्वरस्वरूपच झालेली असल्यामुळें, अंतकाळींही त्याचें ईशस्मरण कायम असतें

हें निराळें सांगावयास नको. मनुष्य नेहमीं ज्या विषयाचें चिंतन करीत असतो, त्याच विषयाचें त्याला अंतकाळीं स्मरण होणें साहजिक असतें. आणि जी भावना अंतकाळीं उद्‌भूत असते, तदनुसार त्याला पुढें जन्म प्राप्त होतो. म्हणून प्रत्येकानें सर्वकाळ निष्काम कर्तव्य-तत्पर राहून ईशचिंतन कायम ठेविलें पाहिजे.

ईशचिंतन करण्याचे दोन मार्ग आहेत; एक ध्यानधारणापद्धतीनें व दुसरा ज्ञानविज्ञानयुक्त विचारपद्धतीनें. सर्व-शक्तिमान्, सर्वज्ञ, अनादि, सूक्ष्म व तेजोमय परमेश्वराचें भक्तियुक्त स्थिर चित्तानें ध्यान करीत प्राणायाम-पद्धतीनें आज्ञाचक्रांत प्राणवायूची स्थापना करून प्रणवोच्चारपूर्वक जो देहत्याग करितो तो परमगतीला प्राप्त होतो; हा ध्यानमार्ग होय. आणि जो नेहमीं बुद्धियोगयुक्त कर्मयोगाचरण करीत असतां एकाग्र चित्तानें ज्ञानविज्ञानात्मक विचारपद्धतीनें परमेश्वराचें चिंतन करीत असतो, त्याला अंतकालीं ईशस्मरण जागृत ठेवणें ध्यानमार्गापेक्षां अधिक सुलभ असतें. हा ज्ञानविज्ञानमार्ग होय. ह्याप्रमाणें अंतकालीं ईशस्मरण करणारे पुरुष ह्या दुःखमय व अस्थिर जन्ममरणरूप भवचक्रांतून मुक्त होतात.

परमेश्वराच्या अव्यक्त प्रकृतीपासून ब्रह्मदेवासुद्धां सर्व विश्व उत्पन्न होतें व त्या प्रकृतींतच लय पावतें. सृष्टीचें हें चक्र अनादिकालापासून सारखें चालू आहे. तथापि ज्यांना भगवत्प्राप्ति होते तेच ह्या चक्रांतून मुक्त होतात. ह्या मुक्तिमार्गा-सच अर्चिरादिमार्ग किंवा देवयान असें म्हणतात. आणि ह्या सृष्टिचक्रांतच राहून पुण्यकर्मानें जे वारंवार स्वर्गादि लोक प्राप्त करून घेतात, पण ते ह्या चक्रांतून मात्र सुटत नाहींत, त्यांच्या मार्गास धूम्रादिमार्ग किंवा पितृयाण असें म्हणतात. ह्याप्रमाणें सृष्टिचक्रांतून मुक्त होणें व सृष्टिचक्रांतच फिरत राहणें अशा पदार्थमात्राच्या दोन प्रकारच्या गति नेहमीं सुरू असतात. म्हणून वेदाध्ययन, यज्ञयागादि उपासना दानधर्म, तपश्चर्या इत्यादि कर्में सकाम बुद्धीनें करून धूम्रादि मार्गाचें अवलंबन करण्यापेक्षां तींच कर्में योगयुक्त बुद्धीनें ज्ञानविज्ञानमय भक्तिपूर्वक सतत आचरण करून अर्चिरादि मार्गाचें अवलंबन करणेंच अधिक श्रेयस्कर होय, हें उघड आहे.

९. भगवद्भक्तीचें स्वरूप ज्ञानविज्ञानमय होण्यास पूर्वी सांगितलेलें ज्ञानविज्ञानाचे सहा प्रकार पूर्णपणें समजणें अवश्य आहे. ही ज्ञानविज्ञानमय भक्ति किंवा उपासना हीच राजविद्या म्हणजे श्रेष्ठ विद्या होय. जिज्ञासायुक्त श्रद्धा हा ह्या विद्येचा मूळ पाया आहे.

उपासनामार्गांत उपास्य परमेश्वराचें स्वरूप व सामर्थ्य यांचें ज्ञान प्रथम व्हावें

लागतें. परमेश्वर आपल्या अव्यक्त मूलप्रकृतीच्या योगानें सर्व विश्व उत्पन्न करितो आणि ह्या अव्यक्त प्रकृतींतच विश्वाचा लयही करितो. म्हणजे विश्वाची उभारणी व संहारणी ह्या अव्यक्त प्रकृतीपासूनच होत असतात. अव्यक्त प्रकृति परमेश्वर-स्वरूपच असून तिच्या ठिकाणीं कर्तृत्वशक्तिही परमेश्वराच्या सामर्थ्यानेंच उत्पन्न होत असते. ह्यावरून सर्व विश्वाचा आधार, प्रेरक, चालक व नियामक एक परमात्माच आहे, हें उघड आहे. तथापि ह्या सर्व व्यापारांचे ठिकाणीं परमात्म्याची आसक्ति नसल्यामुळें, कर्मयोगशास्त्राच्या नियमाप्रमाणें, त्याला ह्या कर्माचा लेप लागणें शक्य नाहीं.

ह्याप्रमाणें परमेश्वराचें स्वरूप व सामर्थ्य ओळखणारे ज्ञानविज्ञानसंपन्न महात्मे एकाग्र चित्तानें नित्य कर्मयोगाचरण करीत राहून, परमेश्वराची अनेक प्रकारांनीं उपासना करीत असतात. परमेश्वर विश्वतोमुख ( विश्वव्यापी ) असल्यामुळें योग-युक्त बुद्धीनें केलेलें कोणतेंही कर्म ही त्याची उपासनाच होते. यज्ञयाग, वेदाध्ययन, जगताच्या धारणपोषणार्थ अवश्य असलेलीं कर्मे, दानधर्म, परोपकार इत्यादि सर्व कर्मे निष्काम बुद्धीनें केलीं असतां, ती परमेश्वराची उपासनाच होते. कारण ह्या सर्वांत परमेश्वर भरलेलाच आहे. परंतु तींच कर्मे फलासक्तिपूर्वक केल्यास त्यांच्या योगानें अमृतत्व न मिळतां, स्वर्गभोगादि अस्थिर फलें मात्र प्राप्त होतात, व तेणें-करून जन्ममृत्यूच्या येरझारा चुकत नाहींत. अनन्य बुद्धीनें परमेश्वराराधन करणाऱ्या भगवद्भक्त कर्मयोग्याचा योगक्षेम परमेश्वर चालवितो, म्हणजे ऐश्वर्य ( नैतिक प्रभाव ) हा कर्मयोगाचा सहज धर्म असल्यामुळें, कर्मयोगी भगवद्भक्तास कोणत्याही गोष्टीची वाण पडत नाहीं.

श्रद्धापूर्वक कोणत्याही देवतेची उपासना केली तरी ती परमेश्वरालाच पोंचते. कारण, परमेश्वर हाच सर्व यज्ञांचा म्हणजे उपासनांचा फलदाता ( प्रभु ) म्हणजे सृष्टींतील अधियज्ञ, व सर्व उपासनांचा भोक्ता, म्हणजे देहांतील अधियज्ञ आहे. परंतु उपासनामार्गांतील हें व्यापक तत्त्व न कळल्यामुळें, मनुष्य संकुचित भावनेनें उपासना करितो व त्याचें फलही तदनुसार क्षुद्रच मिळतें. म्हणून प्रेमळ अंतःकरणानें व शुद्ध बुद्धीनें आपल्याजवळ जें असेल तें परमेश्वरास अर्पण केलें असतां, तो भक्तवत्सल परमात्मा त्याचा अव्हेर न करितां आदरपूर्वक स्वीकार करितो.

मनुष्यानें आपण करीत असलेलीं यज्ञ, दान, तप इतकेंच नव्हे, तर सर्व

व्यावहारिक कर्मे देखील परमेश्वरास अर्पण करावीं, म्हणजे तीं विश्वव्यापी परमेश्वराची उपासना आहे असें समजून, शुद्ध बुद्धीनें आचरण करावीं. अशा निष्काम उपासनेनेंच मनुष्य कर्मबंधांतून मुक्त होऊन भगवत्स्वरूप होतो. परमेश्वर विश्वतोमुख असल्यामुळें, शुद्ध बुद्धीनें केलेलें कोणतेंही कर्म ही परमेश्वराची उपासनाच होते, असें सिद्ध झाल्यावर, निःस्वार्थी देशसेवा, लोकशिक्षण, शास्त्रीय शोध इत्यादि कार्यें शुद्ध बुद्धीनें चालविणें ही देखील परमेश्वराची उपासनाच होते हें निराळें सांगण्याची आवश्यकता नाहीं. ज्याच्या अंतःकरणांत ह्याप्रमाणें व्यापक भगवद्भक्तीचा उदय झाला असेल, त्याचा नाश किंवा अधःपात कधींही होत नाहीं. असा मनुष्य मूळचा पातकी असला, तरी तो ह्या उपासनामार्गानें क्रमाक्रमानें शुद्ध होत जाऊन, शेवटीं कृतार्थ होतो. प्रत्येक श्रद्धावान् जिज्ञासु मनुष्यास हा उपासनामार्ग आचरण करण्याचा अधिकार आहे. मग तो ब्राह्मण असो किंवा शूद्र असो, किंबहुना स्त्री असो, किंवा पुरुष असो. म्हणून प्रत्येक मानवी प्राण्यानें आपले सर्व व्यवहार प्रेमळ अंतःकरणानें परमेश्वरार्पण म्हणजे ईश्वरोपासनामय करावे, म्हणजे खचित भगवत्प्राप्ति होते.

१०. मनुष्याचे सर्व व्यवहार उपासनामय होण्यास त्याला ह्या सृष्टीमध्यें परमेश्वर कसा व्यापून राहिला आहे ह्याचें, म्हणजे ईश्वरी विभूतींचें, अर्थात् अधिदैवाचें ज्ञान होणें अवश्य आहे. विश्वांतील दृश्य विभूति मनुष्यास सहज समजण्यासारख्या असल्यामुळें त्यायोगें त्याचें ज्ञानविज्ञान क्रमाक्रमानें वाढत जाऊन, परमेश्वराचें विश्वव्यापकत्व त्याच्या अंतःकरणांत बिंबतें.

मनुष्याची बुद्धि, मन व अंतःकरणाच्या निरनिराळ्या भावना ह्या परमेश्वरी शक्तीनेंच उत्पन्न होतात. त्याचप्रमाणें जगाचें धारणपोषण व नियमन करणाऱ्या अदृश्य शक्ति म्हणजे इंद्रादि देवता, सूर्यचंद्रादि आकाशस्थ तेजोमय गोल, गंगादि पवित्र महानद्या, वेदशास्त्रादि उच्च वाङ्मय, प्रणवादि मंत्र, मानवी समाजांतील ज्ञान विज्ञानसंपन्न लोकनायक व पुण्यपुरुष ( लोकसंग्रहकर्ते ) इत्यादि सर्व परमेश्वराच्या विभूतिच होत. किंबहुना स्थावर-जंगम सृष्टींतील सामर्थ्यवान्, तेजस्वी व पवित्र असा प्रत्येक पदार्थ ही परमेश्वराची विभूतिच आहे. हें अवघें विश्व परमात्म्याच्या एका अंशांतच अंतर्भूत झालेलें आहे.

ह्याप्रमाणें परमेश्वरी विभूतींचें व्यापक ज्ञान झाल्यानें मनुष्याला परमेश्वरस्वरूपाची यथार्थ ओळख पटते. तेणेंकरून परमेश्वराविषयीं अंतःकरणांत दृढ भक्ति

उत्पन्न होऊन त्याचे सर्व व्यवहार ईश्वरोपासनास्वरूप होऊं लागतात व त्याची समाधानवृत्ति अढळ राहते.

११. ज्ञानविज्ञानसंपन्न भगवद्भक्ताला सर्व विश्व परमेश्वररूप दिसूं लागतें. हा विश्वरूप परमेश्वर चराचर भूतांचा उत्पादक, पालक व नियामक म्हणजे अधिभूत आहे. त्याचप्रमाणें तो सर्वांचा हितकर्ता, सर्वाधार व सर्वसाक्षी असून, दुष्टांचें शासन करणाराही आहे. हें सर्व विश्व परमेश्वरस्वरूप आहे असा अनुभव येणें हीच ज्ञानविज्ञानमय भक्तीची पराकाष्ठा होय. ही विश्वरूपदृष्टि केवळ वेदाध्ययनानें, यज्ञयागानें, तपश्चर्येनें किंवा दानधर्मानें प्राप्त होणें शक्य नसून अनन्य भक्तीनें भगवत्कृपा झाली तरच ती प्राप्त होते. म्हणून जो पुरुष सर्वांभूतीं निर्वैर असून कर्मफलाची आसक्ति न ठेवितां ईश्वरार्पण बुद्धीनें कर्तव्याचरण करीत राहून भगवत्परायण व भगवद्भक्त असतो तोच परमेश्वरस्वरूपाला प्राप्त होतो.

१२. कर्मयोगांतर्गत भगवद्भक्ति किंवा व्यक्तोपासना अव्यक्तोपासनेपेक्षां सुलभ आहे. अव्यक्त ब्रह्मतत्त्व अनिर्देश्य, अनिर्वचनीय व अचिंत्य असल्यामुळें, त्याची उपासना करणें बरेंच कठिण असतें. परंतु व्यक्तोपासक भगवद्भक्त ईश्वरकृपेनें अल्पकालांतच संसारबंधांतून मुक्त होतो. जिज्ञासायुक्त श्रद्धा, साम्यबुद्धीचा अभ्यास, उपासनार्थ कर्माचरण व कर्मफलांचा म्हणजे उपभोगवासनांचा त्याग हीं भगवद्भक्तीची पूर्णता संपादन करण्याचीं साधनें आहेत. शुद्ध हेतु, तितिक्षा, सात्त्विक वृत्ति, समाधान, ज्ञानविज्ञान व परमात्म्याच्या ठिकाणीं प्रेम, म्हणजे बुद्धियोगाच्या पांचीं अंशांनीं युक्त भगवद्भक्ति हीं उपासनेच्या पूर्णतेचीं लक्षणें होत. असा पूर्ण भक्तच परमेश्वराला अत्यंत प्रिय असतो.

१३. उपासना व्यक्त असो वा अव्यक्त असो, तिला ज्ञानविज्ञानाची सारखीच आवश्यकता असते. सर्वांभूतीं परमेश्वर आहे अशी भावना दृढ होण्यास हीं भूतें म्हणजे सृष्टि कशी उत्पन्न झाली व तिचें स्वरूप काय, म्हणजे भूतोत्पादक प्रकृतिपुरुषसंयोग ( विसर्ग किंवा कर्म ) समजणें अवश्य आहे.

अव्यक्त प्रकृति, बुद्धि, अहंकार, मन, पांच कर्मेंद्रियें, पांच ज्ञानेंद्रियें, पांच विषय व पंचमहाभूतें हीं सृष्टीचीं २४ मूलतत्त्वें आहेत. मूळ अव्यक्त प्रकृतीपासूनच पुढील २३ तत्त्वें ( विकृति ) उत्पन्न झालेलीं आहेत. इच्छा, द्वेष, सुखदुःख, चेतना इत्यादि मनोधर्म आहेत. ह्या सर्वांच्या समुदायास क्षेत्र अशी संज्ञा आहे. प्राणिमात्रांचे देह ह्याच तत्त्वांनीं बनलेले असल्यामुळें प्रत्येक देह हें क्षेत्रच

होय. ह्या क्षेत्रास व्यापून राहणारा, क्षेत्राचा द्रष्टा व ज्ञाता आत्मा हाच क्षेत्रज्ञ होय. सर्व क्षेत्रें एकमेकांहून भिन्न असलीं तरी, आत्मा हा सर्व क्षेत्रांना व्यापक असल्यामुळें एकच असतो. आत्मवस्तु हेंच ज्ञेय ( समजून घ्यावयाचें ) आहे. सद्गुण हे आत्मज्ञानाचे पोषक व निदर्शक असल्यामुळें, त्यांच्या वृद्धीबरोबरच ज्ञानाची वृद्धि होत असते व ज्ञान जसजसें वाढत जाईल तसतसे सद्गुणही वाढत जातात.

ज्ञेय परमात्मा म्हणजे ब्रह्मतत्त्व अनादि, अनंत, व्यापक, प्रकाशक, सूक्ष्म, अविभाज्य, निर्गुण, अनिर्देश्य, अनिर्वचनीय, अचिंत्य, धारक, पोषक, उत्पादक, नियामक, ज्ञानगम्य व बुद्धीचे ठिकाणीं विशेषतः उद्भूत होणारें आहे. ह्या निर्गुण निराकार व्यापक ब्रह्मतत्त्वाच्या एका अंशांत विवर्तानें मूलप्रकृति उद्भूत झाली' तेव्हां त्या अंशाचींच प्रकृति व पुरुष अशीं दोन स्वरूपें बनलीं. ह्या प्रकृति-पुरुष-संयोगानेंच सर्व सृष्टि उत्पन्न झाली. हे प्रकृति-पुरुष केव्हां प्रगट झाले, हें समजणें शक्य नसल्यामुळें, त्यांस अनादि म्हणतात. हा प्रकृति-पुरुषसंयोग म्हणजे क्षेत्र-क्षेत्रज्ञसंयोग हेंच सृष्ट पदार्थांना उत्पादक व पोषक विसर्ग म्हणजे कर्म होय. हें प्रकृति-पुरुषांचें व विसर्गाचें ज्ञान, आत्मज्ञानाच्या पूर्णतेस अत्यंत अवश्य आहे. परमात्मा म्हणजे पुरुष अनादि, निर्गुण व अव्यय असल्यामुळें, तो स्वतः कांहीं करीत नसून सर्व कर्तृत्व त्याच्या सान्निध्यानें प्रकृतीच्याच ठिकाणीं असतें, म्हणून आत्मा कोणत्याही कर्मापासून अलिप्त असतो. ज्याप्रमाणें एकच सूर्य सर्व जगास प्रकाशित करितो, त्याप्रमाणें एकच परमात्मा सर्व क्षेत्रांस प्रकाशित करितो. याप्रमाणें क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांमधील फरक, त्यांचा संबंध व विसर्ग यांचें यथार्थ ज्ञान झालें म्हणजे मनुष्यास निर्मल ज्ञानदृष्टि प्राप्त होते.

१४. सृष्टीमध्यें जे जे पदार्थ (मूर्ति) उत्पन्न होतात ते सर्व क्षेत्र व क्षेत्रज्ञ किंवा प्रकृति व पुरुष यांच्या संयोगानेंच होत असतात. म्हणजे प्रत्येक सृष्ट पदार्थांत जड व चैतन्य यांचें मिश्रण असतें. जड प्रकृति त्रिगुणात्मक असल्यामुळें, प्रत्येक पदार्थांत सत्त्व, रज व तम हे तिन्ही गुण असावयाचेच. हे त्रिगुण व्यक्त होण्यास त्या त्या पदार्थांत असणाऱ्या अविभक्त चैतन्यांशाची आवश्यकता असते. चैतन्याच्या ( परमात्मतत्त्वाच्या ) अधिष्ठानानें व्यक्त होणाऱ्या ह्या त्रिगुणांच्या मिश्रणासच स्वभाव किंवा अध्यात्म म्हणतात.

स्वभावांतील हे तीन गुण सर्वत्र सारखेच नसून, त्यांचें मिश्रण कमीजास्त

प्रमाणांत झालेलें असतें. त्यामुळें स्वभावाचे सात्त्विक, राजस व तामस असे तीन भेद होतात. सत्त्वगुण निर्दोष, प्रकाशक व ज्ञानवर्धक असतो; तर रजोगुण वासनात्मक, आसक्तिवर्धक व बंधकारक असतो; आणि तमोगुण मोहकारक, प्रमादजनक व अज्ञानमय असतो. ह्या तिहींचीं कार्यें अनुक्रमें ज्ञान, लोभ व मोह अशीं होतात. ह्यापैकीं रजोगुण व तमोगुण म्हणजे लोभ व मोह यांचा त्याग करून, भगवद्भक्तियुक्त निष्काम कर्मयोगाचरणानें सत्त्वगुणाची पूर्ण वृद्धि झाली म्हणजे बुद्धि नितांत शुद्ध होते व अशा सात्त्विक शुद्ध बुद्धीच्या पुरुषासच त्रिगुणातीत म्हणतात. असा त्रिगुणातीत पुरुष लोकसंग्रहार्थ सर्व कर्में करीत असतांही, कर्मांचें कर्तृत्व गुणांचें ( स्वभावाचें ) असून आत्मा त्यापासून अलिप्त आहे, हें तत्त्व केव्हांही विसरत नाहीं. अशा पुरुषासच अध्यात्माचें यथार्थ ज्ञान झालेलें असतें आणि तोच परमात्मस्वरूप होतो.

१५. त्रिगुणात्मक स्वभावाला जसें आत्मतत्त्वाचें अधिष्ठान असतें, तसेंच ह्या अनादि संसारवृक्षाचें अधिष्ठान म्हणजे मूळ परब्रह्म हेंच आहे. हा संसारवृक्ष अति विस्तृत आहे, तथापि अनासक्तीच्या म्हणजे स्वार्थत्यागरूपी शस्त्रानें त्याचे पाश तोडून टाकून आपला अमृतत्वाचा मार्ग मोकळा केला पाहिजे. पांच अंशांनीं पूर्ण बुद्धियोग संपादन केला पाहिजे. ह्या बुद्धियोगानें प्राप्त होणारें अमृतत्व हेंच ब्रह्मपद होय. ह्या ब्रह्मपदास पोंचल्यावर, पुनरावृत्तीची शंकासुद्धां उरत नाहीं.

त्रिगुणांच्या उपाधीनें युक्त असणाऱ्या जीवात्म्यामध्यें असलेलें आत्मतत्त्व हा परमात्म्याचा ( परब्रह्माचा ) अंशच असतो. म्हणजे, जीवात्मा व परमात्मा' किंवा जीव व ब्रह्म हे पूर्ण एकरूपच आहेत. जीवात्मा जीवदशेंत असेपर्यंत, तो कोठेंही असला तरी त्याचा त्रिगुणात्मक उपाधि त्याच्याबरोबरच असतो. ज्ञानदृष्टि पुरुषांना जीवात्म्याचें खरें शुद्ध चैतन्यस्वरूप पूर्णपणें समजलेलें असतें; परंतु अज्ञानी लोक मात्र उपाधीलाच जीवस्वरूप मानितात, त्यामुळें ते कर्मबंधांत गुरफटून जातात. बुद्धि हें त्रिगुणात्मक उपाधीचें व्यक्त स्वरूप होय. आत्मतत्त्व सर्वत्र भरलेलें आहे. तथापि, बुद्धि विशेष सूक्ष्म व बिंबोद्ग्राही असल्यामुळें, तिच्या ठिकाणीं आत्मस्वरूप विशेष स्पष्ट रीतीनें प्रत्ययास येतें व त्याची ओळखही बुद्धिद्वाराच पटावयाची असते. म्हणून परमात्मा सर्वांच्या बुद्धीमध्यें वास करितो असें म्हणतात. त्याच्याच सामर्थ्यानें बुद्धि कार्यक्षम होते. हा परमात्माच सर्व ज्ञानाचा उगम, श्रेष्ठ, प्राप्तव्य, उच्चध्येय व सर्व शास्त्रार्थांचा निष्कर्ष होय.

त्रिगुणांच्या मिश्रणानें बनलेलें सर्व विश्व हें क्षर ( विनाशी ) व या संपूर्ण विश्वाला अधिष्ठान असणारा चैतन्यांश हा अक्षर ( अविनाशी ) होय. परंतु ह्या क्षर सृष्टीच्या पलीकडचा व क्षर उपाधिविशिष्ट अक्षरांशाहून उत्तम म्हणजे शुद्ध-स्वरूप परब्रह्म हाच पुरुषोत्तम होय. आणि हा पुरुषोत्तम परमात्मा सच्चिदानंद-स्वरूप असून सर्व विश्वाचा प्रेरक व नियामक आहे. हें पूर्ण ज्ञानविज्ञान म्हणजे ब्रह्मविद्या संपादन केलेला ज्ञानी पुरुष सर्व भावानें परमेश्वराची उपासना करण्यास समर्थ होतो. त्याचप्रमाणें भगवंतांनीं उपदेशिलेल्या या गुह्यतम शास्त्राच्या पूर्ण अध्ययनानें मनुष्य बुद्धियोगसंपन्न ( स्थितप्रज्ञ ) व कृतार्थ ( जीवन्मुक्त ) होतो.

अध्याय २, श्लोक ३९ पासून सुरू झालेलें योगनिष्ठेचें शास्त्रीय विवेचन येथें पूर्ण झालें आहे. योगनिष्ठेच्या या उपदेशाची पूर्तता करितांना उपसंहारादाखल भगवंतांनीं तीन तत्त्वांचा उल्लेख केला आहे. एक सर्वभावानें ईश्वरोपासना, दुसरें बुद्धियोग आणि तिसरें मानवी जन्माची सार्थकता. भगवान् श्रीकृष्णांनीं सांगितलेली ही गीताशास्त्राची फलश्रुतिच होय, मात्र येथें फलश्रुति म्हणजे अर्थ-वाद नव्हे. गीताशास्त्राच्या ज्ञानाचा तो सहजसिद्ध परिणामच आहे. श्रीकृष्णांनीं उल्लेखिलेल्या वरील तीन गोष्टींपैकीं पहिली म्हणजे सर्वभावानें केलें जाणारें परमेश्वराचें भजन ही गोष्ट विशेष विचार करण्याजोगी आहे. योगयुक्त बुद्धीनें केलेलें कोणतेंही कर्म ईश्वरोपासनास्वरूप होतें, असें गीताशास्त्रांत ठिकठिकाणीं सांगितलें आहे. त्याचप्रमाणें उपास्य–देवता किंवा प्रतीक निश्चित करतांना, उपासना जितकी अधिक व्यापक होईल तितकी ती श्रेष्ठ होते असेंही व्यक्तोपासनेच्या म्हणजे अधियज्ञ, अधिदैव, अधिभूत यांच्या विवेचनांत सांगितलेलें आहे. यावरून विश्वा-च्या किंवा सकल जीवांच्या कल्याणाच्या दिशेनें राष्ट्र किंवा वैदिक धर्माच्या मर्यादेंत येणारा समाज हेंच ईश्वराचें व्यापक प्रतीक निश्चित करून, ज्ञानविज्ञानयुक्त निष्काम बुद्धीनें त्याची उपासना करणें हीच सर्वभावाची ईश्वरोपासना होय व या उपासनेनेंच जीवाला अमृतत्वाची प्राप्ति होते असा गीताशास्त्राचा स्पष्ट उपदेश आहे.

( अध्याय १६ हा उपसंहारादाखल आला असून, १७ व १८ हे अध्याय अर्जुनाच्या प्रश्नावरून उपस्थित झाले असले तरी, त्यांचा देखील उपसंहारांतच समावेश होतो. म्हणजे १५ व्या अध्यायाचे अखेरीस शास्त्रीय उपदेश पुरा होत असून पुढील तीन अध्याय उपसंहाराकरितांच आहेत.)

**१६. मानवी प्राण्यांच्या मनोभूमिकेंत दैवी संपत्तीचीं व आसुरी संपत्तीचीं बीजें**

निसर्गतःचे कमी–जास्त प्रमाणांत असतात. प्राण्याच्या देहाबरोबर त्याच्या मनाचीही उत्क्रान्ति होत असल्यामुळें, वरील गुणदोष उपजत त्याच्या बुद्धींत असणें अपरिहार्य आहे. त्यांतल्या त्यांत कांहींच्या बुद्धीचा कल पहिल्यापासूनच दैवी संपत्तीकडे असतो व कांहींच्या बुद्धीचा कल उपजतच आसुरी संपत्तीकडे वळतो. आसुरी संपत्तीकडे ओढा असलेल्या मनास योग्य वळण लावून दैवी संपत्तीच्या मार्गावर आणून सोडण्याचें कार्य धर्मशास्त्रास करावयाचें असतें. मानवी मनास एकदां दैवी संपत्तीची गोडी लागल्यावर वेदान्तशास्त्राचें कार्य सुरू होतें. अर्जुनाचा उपजत कल दैवी संपत्तीकडे असल्यामुळेंच शाश्वत कल्याणाची त्याला उत्कंठा उत्पन्न झाली आणि ती पूर्ण करण्याकरितां भगवंतांनीं त्याला ब्रह्मविद्यांतर्गत कर्मयोगशास्त्राचा उपदेश केला.

धार्मिक नीति म्हणजेच दैवी संपत्ति होय; अर्थात् अनीतीलाच आसुरी संपत्ति हें नांव दिलें आहे. आस्तिकपणाचें दैवी संपत्तींत पर्यवसान होतें, नास्तिकवादी कितीही वैराग्यशील व नीतिमान् असले तरी त्यांच्या नास्तिकपणाचा परिणाम आसुरी संपत्तींतच होतो. आसुरी संपत्तीची अखेर अधम गर्तींत किंवा अधःपातांत होते. त्या नीच स्थितींतून त्याची सुटका होत नाहीं. आसुरी संपत्तीच्या म्हणजे अनीतीच्या चिखलांत आकंठ रुतलेल्या मनुष्यास त्यांतून वर निघावयाचें असल्यास शास्त्रविधीला शरण गेल्यावांचून गत्यंतर नसतें. शास्त्राचा आधार घेऊन त्यानें कर्माचरणाचा अभ्यास केल्यास त्याला दैवी संपत्तीचा राजरस्ता हळुहळू दिसूं लागतो व अखेरीस तो अमृतत्वाला पात्र होतो.

दैवी संपत्तीचें किंवा नीतिचें अमृतत्त्व हेंच साध्य होय; पण नीतिभ्रष्ट मनुष्याची दृष्टि एकाएकीं या साध्यावर जाणें शक्य नसतें, म्हणून शास्त्रविधीच्या आधारानेंच त्याला अनीतीच्या खड्ड्यांतून वर येणें भाग असतें.

१७. अनीतीच्या तावडींतून सुटण्यास शास्त्रविधीप्रमाणें श्रद्धेचीही आवश्यकता असते. शास्त्र व श्रद्धा या दोहोंमध्यें श्रद्धा मुख्य होय. तथापि ती शास्त्रविधीकडे केव्हांही दुर्लक्ष करीत नाहीं. श्रद्धा म्हणजे आस्थेवाईकपणा. असा श्रद्धावान् किंवा आस्थेवाईक मनुष्य जाणून बुजून शास्त्रविधीची केव्हांही हेटाळणी करीत नाहीं. विषयसेवनासारखीं केवळ व्यावहारिक कर्मे आणि यज्ञ, दान, तप ह्यांसारखीं धार्मिक अगर पारमार्थिक कर्मे आस्थावान् मनुष्य सात्त्विक पद्धतीनेंच करितो. ज्याच्या अंतःकरणांत अमृतत्वाची इच्छा उत्पन्न झालेली असते, त्याचा आस्थे-

वाईकपणाही सात्त्विक स्वरूपाचाच असतो. कारण आस्था किंवा श्रद्धा हा मनाचाच धर्म आहे. अशा सात्त्विक श्रद्धावान् मनुष्याचा सर्व कल सात्त्विक कर्मांकडे सहजच असतो. यावरून कर्मयोगमार्गांत शास्त्रविधीपेक्षां श्रद्धेचें महत्त्व अधिक आहे असें निर्विवाद सिद्ध होतें. अश्रद्धेनें म्हणजे अनास्थेनें केलेल्या कोणत्याही कर्माचा कांहींच उपयोग होत नाहीं. कर्मयोगाला तर श्रद्धेची प्रारंभापासूनच जरूर असते. मनुष्याला फारसें ज्ञान नसलें तरी प्रथम श्रद्धापूर्वक शास्त्रविहित कर्म करून त्यांच्या फलांचा त्याग करावा म्हणजे अशा श्रद्धापूर्वक त्यागानेंच त्याचा कर्मयोग पूर्ण होऊन तो कृतार्थ होतो.

१८. त्याग व संन्यास हे वर वर दिसण्यांत एकच दिसत असले तरी, त्यांच्या स्वरूपांत स्पष्ट फरक आहे. बुद्धिपुरःसर केलेलें प्रत्येक कर्म काम्य होत असल्यामुळें, तें कर्मच शक्य तितकें अजिबात टाकणें म्हणजे संन्यास होय.

**अकामस्य क्रिया काचिद्दृश्या नैवेह कर्हिचित् ।**
**यद्यद्धि क्रियते जंतुस्तत्तत्कामस्य चेष्टितम् ॥**

असें मनुस्मृतींत सांगितलें आहे. इच्छारहित मनुष्याचें कर्म आढळून येत नाहीं. प्राणी जें जें करितो तें सर्व कामाचेंच कर्म होय, असा याचा अर्थ आहे. या न्यायानें पाहतां प्रत्येक कर्म काम्यच म्हणावें लागतें व हें सर्व काम्य कर्म संन्यासमार्गानें त्याज्य ठरविलें आहे. वरील मनुस्मृतींतील नियम तत्त्वतः खरा असला तरी तो व्यवहार्य नाहीं हें ओळखूनच भगवान् मनूनें 'कामात्मता न प्रशस्ता' इत्यादि श्लोकांमध्यें काम्य झालें तरी सत्कर्म ग्राह्य सांगितलें आहे.

संन्यासमार्गांत वासना व कर्म हीं दोन्ही टाकावयाचीं असतात पण त्यागाचें तसें नाहीं. त्यांत शुद्ध बुद्धीनें सर्व कर्तव्यकर्में आचरण करून त्यांचीं फलें टाकावयाचीं आहेत. म्हणजे संन्यासांत कर्म व वासना हीं दोन्ही त्याज्य असून त्यागांत फक्त विषयवासनाच त्याज्य आहेत, कर्में त्याज्य नाहींत; हा ह्या दोहोंतील मोठा फरक होय. संन्यासापेक्षां त्याग श्रेष्ठ असून व्यवहार्य आहे. ज्ञानी पुरुष स्वतः मुक्त झाला तरी, त्याला लोककल्याणाकरितां यज्ञ, दान, तपादि कर्में कशीं अवश्य करावीं लागतात हें संन्यासमार्गाचे संस्थापक श्रीशंकराचार्य यांच्याच जीवनचरित्रावरून सहज लक्षांत येण्याजोगें आहे. यावरून ज्ञानी पुरुष साधक असला काय किंवा सिद्ध असला काय, स्वहिताच्या किंवा लोकहिताच्या दृष्टीनें त्यानें कर्माचरण करणेंच अधिक श्रेयस्कर होय. कर्माचरण

हें नैसर्गिक नियमास धरून असल्यामुळें, अव्यवहार्य कर्मसंन्यासाचें वळण समाजास लागणें सार्वजनिक दृष्ट्या तर मुळींच हितकारक नाहीं.

प्राणिमात्राला जिवंतपणीं कर्म पूर्णपणें सोडतां येणें अशक्य आहे. म्हणूनच त्यागाचा प्रशस्त मार्ग भगवंतांनीं उपदेशिला आहे. कर्म एकाच कारणापासून निष्पन्न होत नसून त्याचीं कारणें अनेक असतात. तथापि कर्माला प्रेरक कारण कोणतें, हा प्रश्न शास्त्रांत बराच वादग्रस्त होऊन बसला आहे. या प्रेरक कारणास च शास्त्रामध्यें चोदना असें म्हणतात. ज्ञान, ( ज्याचें ज्ञान होतें तो पदार्थ ) ज्ञेय, बुद्धि, धृति आणि सुख हीं सर्व मिळून कर्मास प्रेरणा करितात. या सर्वांचा समुच्चय म्हणजे चोदना होय. हीं सर्व पूर्ण सात्त्विक झालीं म्हणजे चोदना पूर्ण सात्त्विक झाली असें म्हणतां येतें. अशा सात्त्विक चोदनेच्या योगानें घडणारें प्रत्येक कर्म सात्त्विकच असावयाचें, मग तें कर्म वैयक्तिक असो अथवा सार्वजनिक असो.

प्राचीन धर्मशास्त्रांत वर्ण व आश्रम असे दोन भेद केले आहेत, त्यांपैकीं वैयक्तिक कर्मांचा आश्रमधर्मांत समावेश होतो आणि सार्वजनिक कर्में वर्णधर्मांत समाविष्ट होतात. ब्रह्मचर्य किंवा गार्हस्थ्य या आश्रमधर्मांपेक्षां ब्राह्मण-क्षत्रियादि सामुदायिक वर्णधर्मांचीच राष्ट्राला नेहमीं अधिक गरज असते. मनुष्य विवाहित असला काय अगर अविवाहित असला काय, त्याची प्रामाणिक लोकसेवेची उत्कंठाच राष्ट्राच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाची आहे.

उपासना, ज्ञानविज्ञान व शील इत्यादिकांचें संशोधन व संवर्धन करणें हा ब्राह्मणधर्म होय. शांति, आत्मसंयमन, पावित्र्य, सरळपणा व स्वाध्याय म्हणजे दृढतर विद्याव्यासंग हे गुण ज्याच्या स्वभावांत उत्कटतेनें वास करितात तोच ब्राह्मणधर्माचें आचरण करण्यास लायक असतो. ब्राह्मणधर्माचें संरक्षण म्हणजे राष्ट्राच्या किंवा समाजाच्या अंतरंगाचें संरक्षण होय. प्रत्येक समाजांत हें अंतरंग-शुद्धीचें कार्य करणारीं माणसें असावींच लागतात. राष्ट्राचें अंतरंग संशोधन करणारे ज्ञानी पुरुष न्यायान्याय ठरविण्यास समर्थ असून, समाजांतील ज्ञानदानाचें पवित्र कार्य त्यांच्याकडेच असावें लागतें. ह्या तत्त्वास अनुसरून न्यायान्याय ठरविणें व ज्ञानदान करणें हीं कर्में आर्यांनीं ब्राह्मणधर्मांतच समाविष्ट केलीं आहेत.

न्यायदानाचें कार्य बरोबर झालें तरी तेवढ्यानें राष्ट्राच्या अंतरंगशुद्धीचें कार्य पूर्ण होत नाहीं. तें पुरें होण्यास न्यायाचा प्रत्यक्ष व्यवहारच घडावा लागतो.

न्यायाची प्रत्यक्ष अम्मलबजावणी करण्यास तेजस्विता, शौर्य, चिकाटी, धैर्य, औदार्य व सत्ता या गुणांची आवश्यकता असते. हे गुण ज्यांच्या स्वभावांत उत्कटतेनें वास करितात, त्यांच्यावरच राष्ट्राच्या संरक्षणाची म्हणजे क्षात्रधर्माची जबाबदारी असते.

शीलसंवर्धन व संरक्षण इत्यादि राष्ट्रकार्यांची योग्य तजवीज झाली तरी, '**सर्वारंभास्तंडुलप्रस्थमूलाः**' या न्यायानें अन्नवस्त्राची योग्य तरतूद झाल्या-खेरीज समाजाचें कोणतेंही कार्य चालणें शक्य नसतें. अन्नवस्त्राबरोबरच शेतकी, गोरक्षण, कलाकौशल्य, व्यापार वगैरे गोष्टींची आवश्यकता उत्पन्न होते. व ज्या विद्यासंपन्न लोकांत वरील गुणकर्मांचें प्रावीण्य असेल त्यांच्यावरच राष्ट्रीय संपत्ती-च्या उत्पादनाची व संवर्धनाची म्हणजे वैश्यधर्माची जबाबदारी येते.

समाज कितीही उत्कर्षशाली असला तथापि बुद्धीनें कमी पण शरीरप्रकृतीनें काटक असे लोक त्या समाजांत असणें अपरिहार्य आहे. हे लोक बुद्धीनें कमी असले म्हणून राष्ट्रानें त्यांची अवहेलना करणें आत्मघातकीपणाचें असल्यामुळें वरील तीनही वर्णांबरोबरच समाजांत त्यांना स्थान मिळणें अगत्याचें आहे. प्राचीन आर्यांनीं चातुर्वर्ण्यांत या लोकांचा शूद्रवर्णांत समावेश करून, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य यांच्या बरोबरीचा मान वर्णव्यवस्थेमध्यें शूद्रांना दिला आहे आणि वरील तिन्ही वर्णांच्या कर्मांना मदत करणें हें त्यांचें कर्तव्य ठरविलें आहे.

गीताशास्त्रांत वर्णिलेली ही आर्यांची गुणकर्मसिद्ध वर्णव्यवस्था पुण्यश्लोक राजा युधिष्ठिरासारख्या महात्म्यांना पूर्णपणें मान्य होती. ( महाभारत–वनपर्व, अ. १८० पहा.) त्याचप्रमाणें गुणकर्मसिद्ध वर्णव्यवस्थेला उपनिषदांचीही मान्यता आहे. ( बृ. उ. अ. १, ब्रा. ४, खंड १० ते १६.) यावरून आर्यांची समाज-रचना किती तत्त्वग्राही होती व त्यावेळचे लोकनायक या सामाजिक तत्त्वांचा कसा काळजीपूर्वक विचार करीत असत हें पाहिलें म्हणजे सदभिमानपूर्वक आनंदानें हृदय उचंबळून जातें.

मनुष्य कोणत्याही वर्णाचा असो, तो जर आपल्या वर्णधर्मामध्यें निमग्न असेल तर तो धर्मच त्याला मोक्षदायक होतो. म्हणजे वर्णधर्माचरणाच्या मार्गानें या सर्व विश्वाची उत्पत्ति, स्थिति, लय करणाऱ्या जगच्चालक परमात्म्याची तो उपासना करील तर ती उपासनाच त्याला श्रेयस्कर होईल. स्वार्थत्यागपूर्वक निष्काम उपासना-

मय बुद्धीनें आचरिलेली ही वर्णधर्मात्मक ईश्वरोपासना हाच राष्ट्रधर्म होय. अशा राष्ट्रधर्मानेंच मनुष्याला आत्मकल्याण व लोककल्याण साधितां येतें. राष्ट्रधर्म हाच सर्वांत श्रेष्ठ धर्म होय. व्यक्तिधर्म व राष्ट्रधर्म यांत विरोध दिसूं लागल्यास व्यक्तिधर्म बाजूस ठेवून म्हणजे तो गौण आहे असें ओळखून, मनुष्यानें बुद्धियोगपूर्वक राष्ट्रधर्मच आचरण केला पाहिजे म्हणजे त्यांत व्यक्तीचेंही कल्याण सहजच होतें. मात्र या राष्ट्रधर्माचें आचरण करितांना ईश्वरभक्ति, शुद्ध बुद्धि, आत्मसंयमन, वैराग्य (स्वार्थत्याग), पावित्र्य व शांति या बुद्धियोगांतील सद्गुणांकडे दुर्लक्ष करितां कामा नये. अशा रीतीनें आचरिलेला राष्ट्रधर्म ब्रह्मज्ञानाच्या परिपाकास उपयोगी पडतो व त्यायोगें ब्रह्मसाक्षात्कार होऊन मनुष्य कृतार्थ होतो.

निःस्वार्थी, निर्विकार, सात्त्विक, शांत व ज्ञानविज्ञानसंपन्न अशी बुद्धि ही कार्याकार्य, नीति अनीति किंवा धर्माधर्म ठरविण्याची खरी कसोटी होय. अशा बुद्धीचा पुरुष आत्यंतिक श्रेयाच्या दृष्टीनें प्रसंग ओळखून जें श्रेयस्कर असेल तेंच करितो. अशा वेळीं तो सांगेल तोच धर्म होय, असा धर्मशास्त्राचाही सिद्धान्त आहे. व्यक्तिधर्मापेक्षां राष्ट्रधर्म श्रेष्ठ आहे, हें तत्त्व बुद्धीस पूर्णपणें पटल्यामुळेंच अर्जुन राष्ट्रधर्माचें आचरण करण्यास सिद्ध झाला, यावरून पूर्ण बुद्धियोग व कर्तव्यतत्परता यांची जोडी म्हणजे कृष्णार्जुनाचीच जोडी होय. ही जोडी ज्या राष्ट्रामध्यें वास करिते तें राष्ट्र स्वातंत्र्य, शुद्ध नीति, यशस्विता आणि वैभव यांनीं सुसंपन्न होतें.

व्यक्तीला काय किंवा समाजाला काय विपन्न स्थितींतून वर येण्याचा मार्ग दाखविणारें तत्त्वज्ञान कोणतें असेल तर तें भगवान् श्रीकृष्णांनीं अर्जुनाला उपदेशिलेलें गीताशास्त्र हेंच होय. अध्यात्मज्ञानाचे ग्रंथ जगांत पुष्कळच निर्माण झाले आहेत; परंतु ब्रह्मज्ञान, नीति, कर्तव्यतत्परता व ईश्वरभक्ति यांचें असें मधुर मीलन झालेलें कोणत्याही तत्त्वज्ञानाच्या ग्रंथांत आढळून येणार नाहीं. आत्मज्ञानांत रंगलेला शास्त्रकार कर्तव्यनिष्ठेस विसरतो व नीतितत्त्वांचें विवेचन करणाऱ्या शास्त्रकारास नीतीचा ब्रह्मविद्येशीं कसा मेळ घालावयाचा यांचें कोडेंच येऊन पडतें; परंतु भगवान् श्रीकृष्ण व महर्षि व्यास यांनीं हें कोडें सोडवून जगांतील सर्व मानवी जातीवर अनंत उपकार करून ठेविले आहेत; आणि म्हणूनच कोणत्याही धर्माच्या अगर पंथाच्या विवेकशील मनुष्यास गीता हें एक अद्वितीय

शास्त्र आहे, असें वाटल्यावांचून रहावयाचें नाहीं. आर्यधर्माच्या या रहस्यग्राही गीताशास्त्राचें अध्ययन किंवा अध्यापन हा पवित्र ज्ञानयज्ञ होय. इतर कोणत्याही यज्ञापेक्षां या यज्ञानेंच परमात्मा लौकर प्रसन्न होतो. अशा ह्या अद्वितीय गीताशास्त्राचें आस्थापूर्वक अध्ययन करण्याकडे सर्व देशबांधवांची प्रवृत्ति वळो आणि तेणेंकरून, आमचें राष्ट्र अमृतत्वसंपन्न होवो, एवढीच परमेश्वरचरणीं अनन्यभावानें प्रार्थना आहे.

